383

देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण शिक्षणोत्तेजक संस्था प्रकाशन १ लें

# देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण परिचय-ग्रंथ

लेखक

विद्यानिधिः सिद्धेश्वरशास्त्री चित्राव

१९४४

किंमत तीन रुपये

देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण शिक्षणोत्तेजक संस्था प्रकाशन १ लें

# देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण परिचय-ग्रंथ

लेखक

विद्यानिधिः सिद्धेश्वरशास्त्री चित्राव

१९४४

किंमत तीन रुपये

श्रीमंत राजेसाहेब सर रघुनाथराव ऊर्फ
बाबासाहेब पंतसचिव



अधिपति संस्थान भोर.

॥ श्रीः ॥

स्वराज्य संस्थापन आणि संरक्षण करणाऱ्या

दे. ऋ. ब्रा. घराण्यांपैकीं

व स्वराज्याच्या अष्टप्रधानमंडळापैकीं

सचिव घराण्याचे विद्यमान प्रतिनिधि

आणि या समाजांतील एकमेव राजेसाहेब

# श्रीमंत सर रघुनाथराव पन्तसचिव

के. सी. आय्. ई.

अधिपति संस्थान भोर,

यांस त्यांचे ठिकाणीं असलेलें

समाजप्रेम, प्रजावात्सल्य, विद्यावृद्धीची आंवड,

सुजनता, औदार्य इत्यादि

गुणोत्कर्ष जाणून

पुणें दे. ऋ. ब्रा. शिक्षणोत्तेजक संस्थेकडून

" देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण परिचय ग्रंथ "

आम्हीं अत्यंत आदरपूर्वक अर्पण करीत आहोंत.

पुणें,
दि. २१ मे १९४४

राघवेन्द्रराव सदाशिवराव ऊर्फ
बाळासाहेब पुरंदरे
अध्यक्ष.



# प्रस्तावना

आपल्या समाजाचा परिचयग्रंथ लिहून प्रसिद्ध करावा अशी कल्पना पुण्याची संस्था स्थापन झाल्यापासून होती. आपल्या संस्थेच्या त्रैमासिक समाचाराच्या अंकांत शंभर रुपयांचें बक्षिस ठेवून या दृष्टीनें निबंधहि मागविण्यांत आले होते. पण अनेक वेळां जाहिरात देऊनहि तसे निबंध आले नाहींत. श्री. न. रा. पारसनीस एम. ए. बी. टी., टी. डी., श्री. फडणीस बी. ए. एलएल. बी. व ग. श्री. त्रि. स्मार्त यांनीं केलेले निबंध लिहिण्याचे प्रयत्न माहितीच्या अभावी पूर्णतेला जाऊं शकले नाहींत.

दे. ऋ. ब्रा. समाज महाराष्ट्राच्याच काय पण हिंदुस्थानच्या सर्व भागांत आज शेंकडों वर्षें पसरलेला आहे आणि त्याची एकसूत्रीपणानें माहिती मिळविण्यास सुलभ साधन डोळ्यापुढें नाहीं. खुद्द महाराष्ट्र सुद्धां वऱ्हाड, मध्यप्रान्त, निजामहद्द वगैरेंत विभागल्यामुळें त्यांत बराच अलग-पणा उत्पन्न झाला आहे. अशा स्थितींत हा विषय लिहावयास घेणें आणि तो व्यवस्थितपणें मांडणें जरा कठीणच आहे. तथापि हा विषय हातीं घेऊन कोणीं तरी मांडणें आवश्यक होतें. त्याप्रमाणें येथें भरणाऱ्या परि-षदेच्या निमित्तानें या ग्रंथाचें काम करण्याचें आम्हीं ठरविलें आणि येथील संस्थेनेंहि हा ग्रंथ प्रसिद्ध करण्याचें आश्वासन दिलें. त्यामुळें हा ग्रंथ आज आपल्या हातांत अशा स्वरूपांत समारंभानें देण्याचा योग येत आहे.

ग्रंथांत केलेलें तात्विक विवेचन पूर्ण आहे असें म्हणण्याचें धाडस

आम्हांला करवत नाहीं. तथापि आपल्या सामाजिक इतिहासाचा उपक्रम, या दृष्टीनें या ग्रंथाकडे पाहिलें पाहिजे. अनेक ठिकाणीं तात्त्विक मतभेद होणें स्वाभाविक आहे. तथापि सिद्धान्तभूत गोष्टी लिहाव्यात व मतभेद टाळावेत असा प्रयत्न आम्हीं केला आहे. आमचा प्रारंभीं संकल्प होता त्याप्रमाणें आम्ही तात्विक विवेचनाचा भाग पूर्ण करूं शकलों, परन्तु ऐतिहासिक व प्रसिद्ध घराण्यांची माहिती आम्हांला प्रायः देतां आली नाहीं. याचें कारण तशी माहिती लोकांकडून पुरवली गेली नाहीं, आणि जी माहिती आली ती ऐतिहासिक लेखनपद्धतीच्या दृष्टीनें अपुरी वाटली. तथापि कांहीं घराण्यांची माहिती आम्हीं शेवटीं जोडली आहे. पुढें अशा प्रकारें व्यवस्थित माहिती एकत्र करून छापण्याची आमची इच्छा आहे.

व्यक्तींच्या चरित्राबाबतहि बहुतेक तशीच स्थिति आहे. आमच्या भोंवतालच्या प्रान्ताबाहेरील चरित्रें प्रायः आमच्याकडे आलीं नाहींत. तशीं चरित्रें छापणें बरोबर झालें नसतें अशी आमची समजूत आहे. म्हणून आलेलीं तेवढींच चरित्रें आम्हीं छापलीं नाहींत. तथापि समाजांतील प्रमुख व्यक्तींचा परिचय करून देण्याचें कार्य ग्रंथांत अंशतः केलें आहे. असा प्रयत्न पुनः संधि घेऊन करावा आणि आपल्या समाजांतील सर्वप्रान्तीय प्रतिनिधिभूत व्यक्तींचा समावेश करणारा चरित्रग्रंथ प्रसिद्ध करावा असा आमचा संकल्प आहे.

अशा कामास सध्यां किती प्रतिकूलता आहे हें सांगण्याची जरूरी नाहीं. कागदाचा प्रश्न डेक्कन पेपर मिल्सचे व्यवस्थापक श्री. स. के. भावे, बी. ए. यांनीं सहानुभूतिपूर्वक सोडविला नसता तर हेंहि काम आपल्यापुढें येऊं शकलें नसतें.

तसेंच आमचे मित्र श्री. बा. भा. जोशी, मालक ज्ञानविलास छापखाना यांनींहि ग्रंथाबद्दल वाटणाऱ्या अगत्यामुळें ग्रंथ वेळेवर छापून देण्याकरतां पुष्कळ श्रम घेतले आहेत.

तसेंच आमचे मित्र श्री. वि. के. खासनीस यांचा तगादा व सर्व प्रकारची साहाय्यता नसती तर हा ग्रंथ बाहेर पडणें अशक्यच होतें. पण त्यांनीं त्यांच्या नेहमींच्या चिकाटीनें हा ग्रंथ आमच्या हातून करवून घेतला आहे.

तसेंच श्रीमंत सरदार ग. ना. ऊर्फ आबासाहेब मुजुमदार व श्री. के. पां. जोशी यांचाहि येथें अगत्यपूर्वक उल्लेख केला पाहिजे. कोणतेंहि काम करण्याची त्यांची सतत तयारी असते. त्यामुळें ग्रंथनिर्मितीला अत्यंत साहाय्य झालें आहे.

घराण्यांचें प्रकरण तर श्रीमंत सरदार मुजुमदारांच्या तडफदार प्रयत्नामुळेंच येवढें तरी येऊं शकलें. शरीररचनेचा भाग श्री. हातवळणे यांनीं लिहिला आहे.

प्रो. वि. वि. देशपांडे, बनारस, यांनींहि आम्हीं मागविल्यापैकीं कांहीं माहिती अगत्यपूर्वक कळविली.

त्याप्रमाणें कोणतीहि माहिती पुरविण्याच्या कामीं व लेखनाच्या कामीं साहाय्य करणारे डॉ. ग. रं. धडफळे, श्री. श्री. ना. ताडपत्रीकर, श्री. श्री. ग. भालेराव, श्री. दि. मो. हातवळणे, श्री. प. गं. उसेंकर, व राव. सा. पां. ज्ञा. कुलकर्णी यांचे आम्ही अत्यंत आभारी आहोंत.

पुणें.<br>ता. ५।५।४४ } सिद्धेश्वरशास्त्री चित्राव

# देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण परिचय ग्रंथ

## विषयानुक्रम



## कांहीं प्रमुख ऐतिहासिक घराणीं.

### प्रथम खण्ड

# देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण-परिचय-ग्रंथ

## प्रकरण १ लें

## भूमिका व विषयप्रवेश

**समजले आणि वर्तले। तेचि भाग्यपुरुष झाले॥**

—दासबोध.

### १ भूमिका—

महाराष्ट्र ब्राह्मणांतील एका वर्गाला 'देशस्थ ऋग्वेदी' या नांवानें अनेक शतकें ओळखण्यांत येतें. हा समाज आज तरी महाराष्ट्र व महाराष्ट्राच्या बाहेर सर्वत्र पसरलेला आहे. विद्या, धर्म, समाज व राष्ट्र याविषयींच्या सर्व क्षेत्रांत व घडामोडींत या समाजांतलि व्यक्ति प्रामुख्यानें चमकल्या. पांडित्याप्रमाणेंच मुत्सद्दीपणा, आचाराप्रमाणेंच त्याग आणि विनयाप्रमाणेंच नीतिमत्ता हे गुण या समाजांत विशेष प्रकारें दृष्टोत्पत्तीस येतात. धर्मभीरुतेबरोबरच अचाट साहस करण्याचे प्रसंगहि या समाजांतील व्यक्तींनीं वाया घालविलेले नाहींत. काल ओळखून समाजाचें नेतृत्व पत्करून नव्या विचारांची ध्वजा यांनीं उभारली आहे. तसेंच जुन्या विचारांचें समर्थन करण्याची किचकट कामगिरीहि या समाजांतील व्यक्तींनीं निर्भयपणें बजाविली आहे. वैदिक धर्मांतील लोकांचें पुढारीपण स्वाभाविकपणेंच ब्राह्मणांकडे येतें. त्याप्रमाणें

सर्वसाधारण समाजाचें नेतृत्व साधुसंतकवि यांनाच प्राप्त होतें. त्याग, विद्वत्ता, कर्तृत्व आणि नीतिमत्ता यांच्या जोरावर या दोन्ही स्थानांवरचा पहिला अधिकार या समाजांतील व्यक्तींनीं संपादन केला असून त्याची परंपरा आजपर्यंत अखंडित चालू ठेविली आहे. ती परंपरा इतकी उज्वल व अखंडित आहे कीं, जणूंकाय या समाजाचाच तो परंपरागत धर्म बनला आहे. अशा या देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण समाजाची सर्व माहिती एकत्र पाहावयास मिळणें अत्यंत आवश्यक वाटूं लागलें आहे.

कोणत्याहि समाजाची पाहणी करतांना तात्विक विचारसरणी, धार्मिक आचारविचार आणि सामाजिक व राजकीय भूमिका या सर्व गोष्टींचा संकलित विचार करावा लागतो. केवळ एकाच बाजूचा विचार करून त्या समाजाचें यथार्थ दर्शन होत नाहीं. विचार, आचार आणि भूमिका यांचा मेळ नसल्यास त्या पुरुषाची किंवा समाजाची योग्यता किंवा स्थान संशयित झालें असें समजण्यास हरकत नाहीं. सोनें घासून, तापवून व छेदून पारखण्याची पद्धत आहे. त्याप्रमाणें विचार, आचार व भूमिका या दृष्टींनीं तपासून समाजाची योग्यता व स्थान ठरवावयास पाहिजे. या दृष्टीनें देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणांचा समाज तपासून त्याचा इतिहास आपणांस द्यावयास पाहिजे. कर्त्या पुरुषांची बुद्धिमत्ता अजमावयास पाहिजे. स्वार्थ व परार्थ विषयक त्यांच्या तारतम्य दृष्टीचा आपणांस उलगडा करावयास पाहिजे. तसेंच राष्ट्रांत उत्पन्न झालेल्या आणीबाणीच्या आघाडीवर दाखल होतांना व झाल्यावर प्रगट केलेल्या युक्तिबुद्धीवरून त्यांची वृत्ति पारखून राष्ट्रीय आघाडीवरील त्यांचें स्थान ओळखलें पाहिजे.

## २ चातुर्वर्ण्यांत ब्राह्मण—

आपला हिंदुसमाज अनेक लहानमोठ्या जातींनीं युक्त आहे. त्याचेंच पृथक्करण वेदकालीं ब्राह्मण, क्षत्रिय वैश्य व शूद्र अशा चातुर्वर्ण्यात्मक

संघटनेंत करण्यात आलें. हिंदुसमाजांतील जाती या वेदपूर्वकालीं निर्माण झाल्या किंवा वेदानंतर निर्माण झाल्या, या वादांत न शिरतां, त्यांना समाजोपकारक रूप देण्याचें काम चातुर्वर्ण्यसंस्थेनें खास केलें आहे यांत शंका नाहीं. शरीर कार्यक्षम होण्यास शरीराचे सर्व अवयव–हात-पाय तोंड इत्यादि–एक जुटीनें असावे लागतात. त्याप्रमाणें समाजरूपी राष्ट्रपुरुष कार्यक्षम राहावयास ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र हे सहकार्यानें कामाला लागणें अवश्य असतें. यापैकीं एकहि विकल, ढिला किंवा बेदिल झाल्यास राष्ट्राची हानि झाली म्हणून नक्की समजावें. अशी ही हिंदूंची समाजरचना आहे. समाज परिपूर्ण असावयास चारहि वर्णांची सर्वत्र सारखी जरूरी आहे आणि त्यांचा एकविचार असणेंहि तितकेंच आवश्यक आहे. ज्ञान, विद्या व बुद्धि यांचें काम ब्राह्मणांनीं करावयाचें असून त्याबद्दल त्याला समाजानें फक्त मान द्यावयाचा आहे. अलौकिक ज्ञान, अखंड विद्याव्यासंग व तरल बुद्धि जागृत राहण्याकरितां त्यांनीं सर्व उपभोगांपासून अलिप्त राहून नियमपूर्वक आपलें ज्ञानसंपादनाचें कार्य करीत राहावयाचें आहे. क्षत्रियांनीं अन्तर्बाह्य शत्रूंपासून राष्ट्राचें व राष्ट्रांतलि सर्व प्रकारच्या संपत्तीचें रक्षण करावयाचें असून, या अत्यंत जोखमीच्या कार्याच्या मोबदल्यांत त्यानें राज्यपदाचा म्हणजे सर्व सत्तांचा उपभोग घ्यावयाचा आहे. वैश्य हा राष्ट्राचा खजिना असून त्यांनीं बुद्धीनें अर्थशास्त्र हाताळून संपत्तीचे ओघ आपल्या राष्ट्राकडे वळवून राष्ट्र संपन्न करावयाचें आहे आणि शूद्रांनीं या सर्वांशीं सहकार्य करून-आपल्या राष्ट्रांतील उत्पादन वाढवावयाचें व आपल्या गरजा पूर्ण करावयाच्या आहेत. या चारी वर्णांनीं एकमेकांस पूरक राहून राष्ट्राला उत्कर्षाला न्यावयाचें, अशी चातुर्वर्ण्याची व्यापक योजना आहे. मूलभूत आवश्यकतांचें संशोधन करून व मान, सत्ता, द्रव्य व अन्न यांच्या मोबदल्यांत उभारलेली ही योजना आहे. ती आज हजारों वर्षें बऱ्याच प्रमा-

णांत यशस्वी झालेली आपणांस दिसते. तिच्यापैकीं ब्राह्मणांचा इतिहास म्हणजे बौद्धिक इतिहास होय. क्षत्रियांचा इतिहास म्हणजे राजकीय इतिहास होय. वैश्यांचा इतिहास म्हणजे अर्थशास्त्र किंवा व्यापारधंद्याचा इतिहास होय. त्यालाच औद्योगिक इतिहास म्हणतां येईल. आणि शूद्रांचा इतिहास म्हणजे उत्पादनाचा इतिहास होय. यापैकीं राजकीय इतिहास थोडाफार लिहिण्याची आपणांकडे पद्धत आहे, पण बाकीच्या वर्णांचे इतिहास लिहिण्याची पद्धत आपणांकडे नाहीं. पण आतां त्याची आवश्यकता उत्पन्न झाली आहे. त्यापैकीं महाराष्ट्रब्राह्मण असें ज्यांना अन्वर्थकेतेनें म्हणतां येईल अशा देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणांचा सर्वांगीण इतिहास लिहिण्याचा आज प्रथमच प्रयत्न होत आहे.

**३ व्याप्ति—**

देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण या शब्दाच्या मर्यादा आपल्या नेहेमीं ध्यानांत असल्या पाहिजेत. ब्राह्मणसमाजांत साधारणतः प्रमुख असे गट पडलेले आहेत. एक शुक्ल यजुर्वेद्यांचा आणि दुसरा ऋग्वेद्यांचा. शुक्लयजुर्वेदी लोक मातुलकन्यापरिणय वर्ज्य मानतात, एवढेंच नव्हे, तर ते मातुलगोत्रहि विवाहाच्या बाबतींत वर्ज्य करतात. त्यामुळें ऋग्वेदी व यजुर्वेदी ब्राह्मणांचे एका मोठ्या मुद्यावर भिन्नमत आहे आणि या कारणानें ब्राह्मण समाजांत दोन अलग गट निर्माण होतात. बाबाबत उत्तरेकडील शुक्लयजुर्वेदी माध्यंदिनांचा एक पक्ष असून दुसरा दक्षिणेंतील देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणांचा आहे. पहिल्या गटांत फक्त शुक्लयजुर्वेदाच्या माध्यंदिनादि शाखेशिवाय कोणीहि सामील झालेलें आढळत नाहीं. पण देशस्थ ऋग्वेदी ब्राम्हणांच्या गटांत शुक्लयजुर्वेदाच्या गटाशिवाय सर्व कृष्णयजुर्वेदी, अथर्ववेदी व सामवेदीसुद्धां सामील झालेले दिसतात. त्यामुळें देशस्थ ऋग्वेदी ब्राम्हण म्हटले कीं, या सर्व ब्राह्मणांचा त्यांत समावेश आहे असें समजलें पाहिजे. आतां महाराष्ट्रांत यापैकीं

कोणी फारसे लोक नाहींत हें निराळें, पण ते महाराष्ट्रांत असोत किंवा महाराष्ट्राच्या बाहेर दक्षिणेंत कोठेंहि असोत, ते देशस्थ ऋग्वेद्यांच्या गटांत रोटीबेटी या दोन्ही व्यवहारांच्या दृष्टीनें पूर्णपणें सामील होतात.

याशिवाय केवळ रूढीनें आणि कांहीं विशिष्ट समजुतीनें कांहीं छोटे-मोठे गट अलग राहत असले तरी ते गट शुक्लयजुर्वेदी लोकांपेक्षा देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणांशीं अधिक जवळ आहेत, असें समजावयास पाहिजे. सध्यां देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण म्हणजे परंपरेनें देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणांशीं रोटीबेटीव्यवहार करण्यास योग्य समजले जाणारे लोक असें आम्ही समजत आहोंत. इतकें स्पष्टीकरण पुरेसें आहे.

देशस्थ, कऱ्हाडे, कोकणस्थ हीं नांवें वसाहतीच्या स्थानांवरून पडलेलीं स्पष्ट दिसतात. देशांत राहणारा तो देशस्थ आणि कोकणांत राहणारा तो कोकणस्थ. देशस्थांत ऋग्वेदी व कृष्णयजुर्वेदी लोक आहेत, तसेंच कोकणस्थांतहि आहेत. त्यामुळें देशस्थ व कोकणस्थ हे शब्द भेद दर्शविण्याकरितां वापरणें आवश्यक झालें. पण शुक्लयजुर्वेदी लोकांना देशस्थ हें विशेषण लावण्याची आवश्यकता नाहीं. कारण कोकणस्थांत ऋग्वेदी व कृष्णयजुर्वेदी आहेत तसे शुक्लयजुर्वेदी नाहींत. त्यांमुळें व्यवहारांत व सरकारी शिरगणतीच्या वृत्तान्तांत देशस्थ हा शब्द शुक्लयजुर्वेद्यांना लावण्यांत येतो तो चुकीचा आहे. हे दोन्ही शब्द मराठेशाहीच्या उदयानंतर व्यवहारांत आलेले आहेत. शिवाजीच्या वेळीं कृष्णज्योतिष्यानें आपणांस देशस्थ ऋग्वेदी म्हणवून घेतलें आहे (सन १६५७) व पहिल्या बाजीरावाच्या वेळीं कोकणस्थ ब्राह्मणांना ‘ चिपळोणे ’ किंवा ‘ चित्पावन ’ म्हटलेलें आढळतें. स्कंदपुराणापैकीं सह्याद्रि खंडांत ‘ चित्पावन ’ शब्द आहे. पण सह्याद्रिखंड विश्वासार्ह नाहीं, असें समजण्यात येतें. चित्पावनापेक्षा कोकणस्थ हा शब्द व्यापक व सोज्वळ आहे. कोकणस्थ ब्राह्मण हे कोकणांतून निघून पेशवाईच्या मध्यकालांत विशेष संख्येनें घाटावर येऊं लागले.

आम्हांला या व इतर सर्वच ब्राह्मणांचा निर्देश लिहिण्याच्या ओघांत करावा लागेल, क्वचित् तुलना करावी लागेल आणि माहिती द्यावी लागेल; तथापि आमचा मुख्य उद्देश देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणांची माहिती देणें हा राहील.

**४ संख्या—**

देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणांची लोकसंख्या नक्की कळण्यास आज कोणतेंहि निश्चित साधन नाहीं. सरकारतर्फे होणाऱ्या शिरगणतीचे वृत्तांत अशा कामीं प्रमाण मानण्यास योग्य असतात. पण त्या वृत्तांतांत देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण या सदराखालीं अलीकडे माहिती देण्यांत येत नाहीं. त्यामुळें नक्की आकडा काढण्याचा निश्चित मार्ग बंद झालेला आहे. सन १९४१ च्या शिरगणतींत ब्राह्मणांच्यापैकीं देशस्थ, कोकणस्थ व कऱ्हाडे अशी, आकडे देण्याकरितां स्वीकारलेली, विभागणी बंद केलेली असली तरी, त्यापूर्वीच्या शिरगणतींत देशस्थ, कोकणस्थ व कऱ्हाडे असे जिल्हावार ब्राह्मणांचे आकडे :दिलेले आहेत. तथापि ते आकडे देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणांचे आकडे निश्चित कळण्यास उपयोगी नाहींत. कारण त्यांत देशस्थ या शीर्षकाखालीं ऋग्वेद्यांप्रमाणें शुक्लयजुर्वेदीहि घेतलेले आहेत. त्यामुळें देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणांचे आंकडे शेवटीं अंदाजानेंच काढावे लागतात. वऱ्हाड, मध्यप्रांत व निजामहद्द या भागांतील शिरगणतीच्या आंकड्यांत तर केवळ ब्राह्मण या एकाच शीर्षकाखालीं ब्राम्हणांच्या शिरगणतीचे आंकडे दिले आहेत. त्यामुळें देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणांचे आंकडे अंदाजानें काढावे लागतात या गोष्टीस उपाय नाहीं.

पण महाराष्ट्राच्या बाहेर तंजावर वगैरे दक्षिणेकडील भागांत व काशी, प्रयाग, गया वगैरे क्षेत्रांत वसाहतीच्या दृष्टीनें देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण मराठेशाहीच्या पूर्वींच स्थिर झालेला आहे. आणि मराठेशाहीच्या अंमलांतहि शिंदे, होळकर वगैरे सरदारांच्या आश्रयानें इतर

कोणत्याहि ब्राह्मणांपेक्षा देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण इंदूर, देवास, ग्वाल्हेर, जयपूर, जोधपूर, बुंदेलखंड, दिल्ली, लाहोर वगैरे भागांत अधिक पसरले व तिकडेच स्थायिक झाले. त्यांचीहि गणती देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणांच्या शिरगणतींत करावयास पाहिजे. पण त्यांचा आकडा अंदाजी धरण्याशिवाय सध्यां तरी गत्यन्तर नाहीं.

या सर्व गोष्टी लक्षांत घेऊन देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणांची लोकसंख्या आपणांस काढावयाची आहे. वसाहतीचा क्रम पाहतां कृष्णानदीचा कांठ हा देशस्थ ऋग्वेदी लोकांच्या वसाहतीचा प्रांत असून गोदांकांठ हा शुक्लयजुर्वेदी लोकांच्या वसाहतीचा प्रांत आहे. देशस्थ ऋग्वेदी लोक सर्व प्रांतभर पसरलेले असले तरी त्यांच्या बहुसंख्येचा, फार काय बहुतेक त्यांच्याच वस्तीचा प्रांत दाक्षिणमहाराष्ट्र आहे. पुणें जिल्ह्याच्या निम्म्या भागाच्या पुढें शुक्लयजुर्वेदी माध्यंदिन लोक पसरलेले नाहींत. कर्नाटक व मद्रास वगैरे भागाकडे तर फक्त शुक्लयजुर्वेद्यांपैकीं काण्व शाखेचे लोक आढळतात. माध्यंदिनांचें नांवहि नाहीं. शुक्लयजुर्वेदी माध्यंदिन लोक जों जों उत्तरेकडे सरकावें तों तों अधिक आढळतात. दाक्षिणमहाराष्ट्र देशस्थ ऋग्वेदी-प्रधान धरल्यास मराठवाड्यांतील निम्माभाग व वऱ्हाडमध्यप्रांताचा बराच भाग शुक्लयजुर्वेदीप्रधान धरावा लागेल. एकूण पांच लक्ष देशस्थ ब्राह्मणांत दोन लक्ष देशस्थ ऋग्वेदी व तीन लक्ष शुक्लयजुर्वेदी माध्यंदिन अशी महाराष्ट्रांतील लोकसंख्येची विभागणी होईल. यांत बृहन्महाराष्ट्रांतील म्हणजे इंदूर, ग्वाल्हेर, तंजावर, काशी, प्रयाग, गया, जोधपूर, जयपूर वगैरे ठिकाणची मिळून एक लक्ष वस्ती धरल्यास देशस्थ ऋग्वेदी ब्राम्हणांची संख्या तीन लक्षांपेक्षां अधिक होणार नाहीं, असा अंदाज करतां येतो. ही स्थिति सन १९३१ च्या खानेसुमारीच्या सरकारी वृत्तांताचा आधार गृहीत धरून व अनेक अभ्यासकांच्या ठोकळ पाहणीवरून लिहिण्यांत येत आहे. स. १९४१ च्या खानेसुमारींत हिंदुस्थानच्या सर्वच

लोकसंख्येची वाढ झाली. त्या प्रमाणांत ब्राह्मणांच्या लोकसंख्येचीहि वाढ झाली असली पाहिजे. दहा वर्षांत ३३ कोटीची ४० कोटी लोकसंख्या झाली. त्यांत हिंदूंची लोकसंख्या २५ कोटीची ३२ कोटी झाली असें सरकारी शिरगणतीच्या वृत्तान्तांत प्रसिद्ध झालें. त्याप्रमाणें १॥ कोटी ब्राह्मणांची संख्या सुमारें १॥। कोटीवर जावयास पाहिजे. आणि त्या प्रमाणांत १० लक्ष मराठी भाषा बोलणाऱ्या ब्राह्मणांची संख्या १२ लक्षावर जावयास पाहिजे आणि त्याच प्रमाणांत देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणहि ३ लक्षावरून ३ लक्षावर जावयास पाहिजेत. पण अनेक कारणांनीं ब्राह्मणांची संख्या वाढण्याऐवजीं घटत आहे. निदान नेहमीच्या प्रमाणांत वाढत नाहीं असा तज्ञाचा अंदाज असून त्यांना जुने खानेसुमारीचे वृत्तान्तहि पुराव्यादाखल उपयोगी पडतात.

**५ एकत्व—**

हिंदुस्थानच्या सर्व प्रान्तांत पसरलेल्या ब्राह्मणांची लोकसंख्या सुमारें दोन कोट असून मराठी भाषा बोलणाऱ्या ब्राह्मणांची संख्या दहा लक्ष आहे. त्यांत देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण समाजाची लोकसंख्या तीन लक्ष अशी साधारणपणें येते असा आपण अंदाज केला आहे. हिंदुस्थानांतल्या सर्व प्रान्तांत पसरलेल्या ब्राह्मणांचें ऐक्य सिद्ध करण्यास पुरेशीं प्रमाणें आपणांस उपलब्ध होतात. त्यांचे प्रमाणग्रंथ एक आहेत. श्रुतिस्मृतिपुराण हे त्यांचे धर्मग्रंथ होत. याबद्दल कोणच्याहि प्रान्तांत मतभेद नाहीं. तसेंच श्रुति, स्मृति व पुराणग्रंथ कोणते याबद्दलहि मतभेद नाहींत.

याशिवाय कांहीं प्रान्तांतल्या लोकांनीं आगमग्रंथ अधिक प्रमाण मानले आहेत. आगमग्रंथाची व्याख्याहि प्रसिद्ध आहे. ते आगम ग्रंथ उपासनामूलक आहेत. उपासनेबद्दल वैदिक ग्रंथांत पूर्ण स्वातंत्र्य आहे. त्यामुळें उपासनांचा विविधपणा आणि त्या विषयींच्या ग्रंथांचें प्रामाण्य हें वेदमूलकच असल्याबद्दल मतभेद नाहीं. मनुष्याचा स्वभाव लक्षांत घेऊन

वैदिक धर्मांनीं ही स्वभावाला पटेल अशी देवता निवडण्याची व्यवस्था करून ठेवली आहे. त्यामुळें मनाचें समाधान आणि अन्तिम साध्य संपादण्याच्या बाबतींत मनाला पटणारी साधनानुकूलता अशी दुहेरी सोय झालेली आहे.

संस्कारांची एकरूपता हा सुद्धां मुद्दा अत्यंत महत्त्वाचा म्हणून सांगतां येईल. हिंदुस्थानांतल्या कोणत्याहि प्रान्तांतल्या ब्राह्मणांचे वैदिक सोळा संस्कार एक प्रकारचे आहेत. त्या संस्कारांतील गौण व मुख्य भाग व ते करण्याची पद्धति सुद्धां एकस्वरूपाची आहे. संस्कारांत पावित्र्याकरितां म्हणावयाचे मंत्र एक असून त्याबद्दलची भावनासुद्धां एक प्रकारची आहे. हे संस्कार वैदिक धर्माचें अत्यंत महत्त्वाचें अंग असून ते केल्याशिवाय शरीराला शुद्धता व ब्राह्मण म्हणवून घेण्याची योग्यता प्राप्त होत नाहीं याबद्दल सर्व प्रान्तांत सारखेंच मत आढळून येतें.

या संस्कारांचे आधारभूत असणारे मूळ ग्रंथ सुद्धा सर्वांचे एकच आहेत. त्यांना गृह्यसूत्रें असें म्हणतात. गृह्यसूत्रें व त्यावरील परंपरागत भाष्यें व टीका यांच्या आधारानें त्या सूत्रांचा अर्थ निश्चित केला जातो. त्या अर्थ करण्याच्या पद्धतीला मीमांसापद्धति किंवा समन्वयपद्धति या नांवानें संबोधण्यांत येते. ती पद्धति आज हजारों वर्षें चालू असून तिच्या मान्यतेबद्दल शंका नाहीं. हीं सूत्रें शाखाभेदानें निराळीं असलीं तरी त्या त्या शाखेच्या लोकांचें एकच सूत्र आहे. आणि सूत्रांची रचना करणारांनीं मूळभूत तत्त्वांचें ऐक्य टिकविण्याकडे पूर्ण लक्ष दिलेलें असतें. यावरून हजारों वर्षांची प्राचीन परंपरा भिन्न प्रान्तांत पसरलेल्या बुद्धिमान् ब्राम्हणांनीं कशी एकस्वरूपांत राखण्याचा प्रयत्न केला आहे हें चांगलें ध्यानांत येतें.

संस्कृतभाषा ही सुद्धां सर्व प्रान्तांतील ब्राह्मणांनीं आपलें धर्मविधींतील माध्यम म्हणून एकमतानें मान्य केलेली आहे. हिंदुस्थानांतल्या कोणत्याहि प्रान्तांतल्या कोणत्याहि जातीच्या माणसाचे सर्व धर्मविधि संस्कृतभाषेंतच

तिलक



केले जातात. विवाह--अन्त्येष्टि यांसारखे संस्कार ज्याप्रमाणें ब्राह्मणापासून अतिशूद्रांपर्यंत संस्कृतभाषेंत केले जातात त्याप्रमाणें कोठल्याहि तीर्थावरचा संकल्प किंवा सत्यनारायणाची पूजाकथासुद्धां संस्कृतभाषेंतच असते. हें संस्कृतभाषेचें धर्मविधींतील माध्यम सर्व हिंदुसमाजाचें म्हणून मान्य करण्यात आलें आहे.

संस्कार किंवा धर्मविधि यांची भाषा संस्कृत म्हणून एकमतानें मान्य करण्यांत आली, त्याप्रमाणेंच ग्रंथभाषा म्हणूनहि तिलाच मान्यता देण्यांत आली. वेदापासून पुराणापर्यंत असणारे आबालवृद्धांचे ग्रंथ संस्कृत भाषेंत आहेत. सर्व शास्त्रांचे ग्रंथ संस्कृत भाषेंत लिहिले गेले. वैद्यकापासून परमार्थापर्यंत आणि अर्थशास्त्रापासून कामशास्त्रापर्यंत सर्व ग्रंथ संस्कृत भाषेंतच लिहिण्यांत आले. ही परंपरा मध्येंच कोणीं सुरू केली असें नव्हे. अनादि कालापासून विसाव्या शतकापर्यंत महत्त्वाच्या विषयावर लिहितांना संस्कृत भाषेचा आश्रय करण्याची प्रथा अबाधित आहे. जैनबौद्धांनीं धर्मप्रसाराच्या सोयीकरितां पाली, मागधी वगैरे देशभाषांचा आश्रय केला तरी त्यांच्या अनुयायांना संस्कृत भाषेंत ग्रंथ असल्याशिवाय त्यांचा सार्वत्रिक प्रचार होत नाहीं असें दिसून येतांच त्यांनीं आपले मूळ सूत्रग्रंथहि संस्कृत भाषेंत केले. श्वेतांबर जैन व महायान बौद्ध यांच्या इतिहासांत ही गोष्ट स्पष्ट आहे. कनिष्कासारख्या परकीय बौद्ध धर्मीय सम्राटांनीं आपलीं शासनें संस्कृत भाषेंत काढलीं. यावरून वैदिक धर्म, ब्राह्मण, धार्मिक व सांस्कृतिक ग्रंथ व संस्कृतभाषा यांचा हिंदुस्थानच्या अखंडत्वाच्या दृष्टीनें कसा संबंध आहे हें चांगल्या प्रकारें ध्यानांत येईल. धर्मग्रंथ, विधि, संस्कार व भाषा या दृष्टीनें अखिलभारतीय ब्राह्मण कसे एक आहेत, हें एकत्व कसें हजारों वर्षें अबाधित आहे आणि एकत्वाची कल्पना कशी सातत्यानें चालत आलेली आहे, या गोष्टी सहज ध्यानांत येतात. शेंडी, जानवें व तिलक या खुणाहि अखिल भारतांत एकस्वरूपांत आहेत. तसेंच

स्त्रियांच्या मंगल चिन्हाच्या बाबतींतहि प्रतिपादतां येईल. त्यांत कांहीं फरक आढळत असले तरी त्यांतील मूलभूत तत्त्वांत फरक पडलेला नाहीं.

**६ भिन्नत्व—**

अखिल हिंदुस्थानांतील प्रत्येक प्रान्तांत ब्राह्मण पसरलेले असून त्या त्या प्रांन्तातील कायमे रहिवाशांत त्यांची गणना होते. आपण बाहेरून आल्याची पुसट सुद्धां कल्पना त्यांच्यांत नाहीं. त्यांची भाषा जशी प्रांतिक आहे, तसाच त्यांचा आहारहि त्या त्या प्रान्ताशीं एकरूप आहे. त्यांचा पोषाख जसा प्रांतापेक्षां निराळा नाहीं, त्याचप्रमाणें त्यांचे रिवाजहि प्रांतांतील लोकांशीं अत्यंत जमते आहेत. वैदिक आचारविचाराबरोबरच प्रान्तिक आचारविचारांशीं अन्तर्बाह्य एकरूप होण्याचा ब्राह्मणांनीं प्रयत्न केला असला तरी या दुहेरी कसरतींत वैदिक ब्राह्मणसंस्थेपासूनहि ते थोडे अलग झाले आणि प्रान्तिक लोकांशींहि ते पूर्णपणें एकरूप होऊं शकले नाहींत. आपलें वैशिष्ट्य कायम ठेवण्याचीहि त्यांची इच्छा दिसते. तसेंच लोकांनीं आपल्यावर पूर्ण विश्वास टाकावा असाहि त्यांच्या वर्तनांतील प्रकार दिसतो.

प्रत्येक प्रान्तांतील भाषा त्यांनीं अशी कमाविली कीं, तिच्यांतील आद्य ग्रंथकार, व्याकरणकार, कवि आणि समाजाला नवीन कालाचा दिव्य संदेश देणारे साधुसंत हे प्रायः त्यांच्यांतून निर्माण झाले आणि त्या त्या भाषा बोलणारांवर त्यांनीं कायमचें न फिटणारें ऋण करून ठेवलें. तसेंच धर्मसंस्कृति प्रसृत करणाऱ्या व राष्ट्रभाषापदवी पावलेल्या संस्कृत भाषेवरहि त्यांनीं आपली पक्कड अशी कायम ठेवली कीं, तिच्यांतील ग्रंथादिकांची निष्पत्ति सारखी यांच्या द्वाराच चालू राहिली. असा सव्यसाचीपणा ब्राह्मण समाजानें अखिल भरतखंडांत आज हजारों वर्षें अव्याहत चालविला आहे आणि यशस्वीपणें ही परंपरा अखंड राखिली आहे. त्यामुळें लहान गांवांत धार्मिक क्षेत्रांतील तिथिवार सांगणाऱ्या गांवजोशापासून तों काशी-

सारख्या अखिलभारतीय विद्यापीठांत मिरवणाऱ्या त्रिखंडपंडित विद्वानापर्यंत याच ब्राह्मणांनीं आपलें अग्रेसरत्व कायम टिकविलें आणि लोकांना मान्य करावयास लावलें. प्रांतिक भाषेंत साधे पण रसाळ ग्रंथ करणाऱ्या कवीपासून राष्ट्रीय कवीची पदवी मिळविणाऱ्या कालीदास भवभूतीपर्यंत सर्व जागा या ब्राह्मणांनीं आपल्या प्रतिभाशाली कवित्वानें, अलोट तपश्चर्येनें आणि अपरिमित श्रमसाहसानें अशा प्रकारें आत्मसात् केल्या कीं त्यांवर कोणी हक्क सांगण्याचें साहस करूं शकत नाहीं.

असें करतांना ब्राह्मणांत दाक्षिण आणि उत्तर असे प्रमुख भेद दिसूं लागले. प्रान्ताप्रान्तामधील भेद त्याआधींच निर्माण झाले असले पाहिजेत. कारण प्रान्तभेदानें भाषा व आचार यांमध्यें फरक पडणें अगदीं नैसर्गिक असतें. आणि अशा भेदानें प्रांतवार जे भेद निर्माण झाले त्यांचीच दाक्षिण व उत्तर अशा दोन भेदांत विभागणी झाली. दाक्षिण व उत्तर हे दोन्ही भेद द्रविड व गौड या नांवानें संबोधले जातात. त्यांच्यांत डोळ्यांत भरण्यासारखा मुख्य फरक हिंसा व अहिंसा हा आहे. गौड ब्राह्मणांपैकीं बरेच भेद उघड मांसाशन करणारे आहेत व द्रविडांना तें अगदीं वर्ज्य आहे. हा मांसाशनाचा फरक नाहीं असें म्हणतां येण्यासारखी स्थिति नाहीं. मातुलकन्यापरिणय, पैतृष्वसेयीपरिणय वगैरे मुद्यांवरूनहि हा फरक मूळांत होतच. असे हे भेद पडत असतांनाच इतरहि भेद त्यांच्यांत उदय पावले.

प्रथम सर्व ब्राह्मण, वेद म्हणत असले, तरी वेदांचे ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद व अथर्ववेद असे सोयीवार भेद पाडण्यांत आले आणि आपआपल्या आवडीप्रमाणें व सोयीप्रमाणें कोणत्या तरी एका वेदाचें ब्राह्मण अध्ययन करूं लागले व तसें अध्ययन करतांना अनेक परंपरा निर्माण झाल्या आणि शाखा नांवानें प्रसिद्धीस आल्या. अशा वेदभेद, शाखाभेद प्रान्तभेद व भाषाभेद वगैरेनीं ब्राह्मणांत अनेक भेद उत्पन्न झाले असले

तरी ब्राह्मण हे मूळचे सर्व एकच असून त्यांच्यांत उच्चनीच वगैरे भावना असण्याचें कारण नाहीं. पण आज मनुष्यस्वभावाला अनुसरून उत्पन्न झालेले भेद लक्षांत घेऊन व वास्तविक ब्राह्मणमात्र सर्व एकच हीहि गोष्ट न विसरतां देशस्थऋग्वेदी ब्राम्हणांचा सर्वांगीण इतिहास आपणांस लिहावयाचा आहे.

---

## प्रकरण २ रें

# वैदिकांचें मूलस्थान

**नाना पूर्वपक्ष सिद्धांत ॥ प्रत्ययें पहावे नेमस्त ॥**

—दास. २९-२-४

**१ पंजाब-**

वैदिक ब्राह्मणांचें मूलस्थान कोणतें हा संशोधक लोकांतील एक अत्यंत महत्वाचा चर्चेचा विषय आहे. ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद आणि अथर्ववेद असे एकंदर चार वेद आहेत. हे सर्वच प्राचीन असून ऋग्वेद तर अतिप्राचीन आहे. ऋग्वेद हाच जगांतील पहिला ग्रंथ असून त्यापूर्वीचा किंवा त्याच्या समकालीन असा एकहि ग्रंथ जगांत उपलब्ध नाहीं. यजुर्वेदादि वेदग्रंथ ऋग्वेदानंतर बऱ्याच कालानें निर्माण झाले आहेत. हे वेदग्रंथ कानामात्रेचा पाठभेद न होऊं देतां सांभाळण्यांत ब्राह्मणांनीं अलौकिक परिश्रम केले आहेत. आज आपणांला किंवा जगाला हे ग्रंथ अशा स्वरूपांत देण्याचें श्रेय सर्वस्वी ब्राह्मणांच्या त्यागवृत्तीला, बुद्धीला आणि तपश्चर्येलाच द्यावयास पाहिजे.

या वैदिक ग्रंथांत अनेक स्थलांचा निर्देश आहे, त्यांत पुष्कळ सुप्रसिद्ध नद्या आहेत, सरोवरें आहेत, पर्वत आणि पर्वतांचीं शिखरेंहि आहेत. त्यापैकीं

ऋग्वेदांतील स्थलांचा व नद्यांचा विचार केला तर आपणांस असें निश्चित विधान करतां येतें कीं, ऋग्वेद हा ग्रंथ छंदोबद्धस्वरूपांत पंजाब प्रान्तांत रचला गेला असला पाहिजे. सध्यांच्या पंजाब प्रान्तालाच तेव्हां 'सप्तसिंधु' या नांवानें संबोधण्यांत येत होतें. सध्यांचा काबूल म्हणजे कुभानदीपासून गंगायमुनांच्या दुआबापर्यंत हा प्रांत होय. 'इमं मे गंगे यमुने सरस्वति शुतुद्रि स्तोमं सचता परुष्ण्या । असिक्न्या मरुद्वृधे वितस्तया आर्जीकीये शृणुह्या सुषोमया ॥ ( ऋ. १०.७५.५ ) इत्यादि मंत्रानीं ऋग्वेदांत ज्या प्रमुख नद्यांचा स्पष्ट निर्देश केलेला आहे, त्या नद्या आजहि आपणांस ऋग्वेदांतील मंत्र आमच्याच तीरावर वसिष्ठ--विश्वामित्र--भारद्वाज--अत्रि--गौतम--आंगिरस वगैरे ऋषींनीं प्रथम म्हटले हें सांगण्यास समर्थ आहेत.

यावरून ऋग्वेदाचें जें मूळ उत्पत्तिस्थान तें आपल्या वैदिक धर्माचें व आपलें मूलस्थान होय. व तसें अनेक देशी व परदेशी विद्वानांनीं प्रतिपादलेंहि आहे. तसेंच अनेक भूगर्भशास्त्रवेत्त्यांनींहि जगांत प्रथम मनुष्य-प्राणी उत्पन्न होण्यासारखी जागा हिंदुस्थानांतील गंगेच्या उत्तरेकडील पंजाबमधील प्रदेश होय ही गोष्ट मान्य केलेली आहे. तथापि आपणांस ' मनुष्यांचें मूलस्थान ' समजावून घेण्यापेक्षां ' वैदिकांचें मूलस्थान 'कोणतें हें ग्रंथोक्त व संभवनीय उपपत्तीवरून थोडक्यांत पाहावयाचें आहे.

जर्मन भाषाशास्त्रज्ञ अडेलुंग यानें हिंदुस्थानचें नंदनवन म्हणून प्रसिद्ध असलेला काश्मीरप्रान्त हें वैदिक लोकांचें मूलस्थान म्हणून ठरविलें ( स. १८०६ ).

कै. ना. भ. पावगी यांनीं 'आर्यावर्त हेंच आर्यांचें मूलस्थान' हें भूगर्भ-शास्त्रादिकांच्या आधारें जोरदारपणें मांडलें आणि डॉ. अविनाशचंद्र दास यांनीं तोच सिद्धांत 'ऋग्वेदिक इंडिया' या ग्रंथांत फिरून पुढें मांडला. व बाबू संपूर्णानंदांनीं प्रायः याच मताचा हिंदींत अनुवाद केला. (१९४१).

परंतु पावगी व दास या दोघांहि विद्वानांना ऋग्वेदांतील

उत्तरध्रुवविषयक प्रमाणें खोडून काढतां आलीं नाहींत. सबब त्यांनीं आर्यावर्तांतील वैदिक लोक उत्तरध्रुवाकडे वसाहतीकरितां गेले होते, पण त्यांचें मूलस्थान आर्यावर्तच होय असें मानलें आहे.

२ हिमालय—

यानंतर हिमालयाला मूलस्थान मानण्यास पुरेशीं गमकें वैदिक लोकांचा आचार व व्यवहार यांत जीं आढळतात, त्यांचें थोडक्यांत दिग्दर्शन आपण करूं.

हिमालय, तिबेट, चीन, जपान वगैरे प्रान्तांतील लोक पीतवर्णीय असून त्यांना दाढीमिशांचे केस प्रायः नसतात. आमच्या देवतांच्या मूर्तींना दाढी-मिशा काढूं नयेत अशी रूढि आहे.

सोन्याचा रंग पिवळा असून त्याला सुवर्ण असें नांव संस्कृतभाषेंत आहे. इतर अनेक रंग आकर्षक असतांना व ते संस्कृतज्ञांना परिचितहि असतांना त्यांना सुवर्ण न म्हणतां सोन्याच्या पिवळ्या रंगालाच वैदिकांनीं दिलेलें सु + वर्ण हें नांव त्यांच्या पिवळ्या रंगाबद्दल विशेष आदर किंवा आसक्ति दर्शवितें.

पीतवर्ण हा वैदिकांनीं अत्यंत शुभ मानला असून सर्व शुभ कार्यांत त्या रंगाचीं वस्त्रें वगैरे ते वापरतात, हें लग्नमुंजीसारख्या अत्यंत शुभ मानलेल्या विधींत वापरलेल्या वस्त्रादिकांच्या वरून आपले ध्यानांत येईल.

सुवर्णगौर वर्ण हा सुंदरपणाच्या बाबतींत आपल्या लोकांनीं विशेष आकर्षक मानलेला आहे.

वैदिक लोकांच्या सर्व देवतांचें वसतिस्थान हिमालय आहे, पवित्र गंगा आणि शिव यांचें मूलस्थान हिमगिरिच आहे. हिमालयाच्या पाठीशीं असणाऱ्या तिबेटाला त्रिविष्टप हें स्वर्गवाचक नांव हिंदूंनीं दिलेलें आहे. हिमालय व त्यापासून निघालेली गंगा ही सर्व आर्यवर्तांतील लोकांना पूज्य व पवित्र आहे. हिमालयांतून पुढें आलेल्या शांपु या चिनी नदीस ब्रह्म-

पुत्रा असें नांव प्राप्त झालेलें आहे. यावरून जगाचें आदिकारण जें ब्रह्म, त्याचाच ब्रह्म हा शब्द हिमालयास लावला असून त्यापासून निघालेल्या नदीस ब्रह्मपुत्रा म्हटलेलें आहे.

तसेंच आमचे सर्व ज्ञानी तपस्वी हिमालयांत असून शेवटीं पांडव हिमालयांत गेले व आम्ही सर्व भारतवासीय हिमालयाकडे जाण्याचा प्रयत्न करतों. निदान आयुष्यांत एकदां तरी हिमालयांतून वाहत येणाऱ्या गंगेंत स्नान करण्यास काशीस जातों. आणि शक्य तर हरिद्वार, हृषीकेश, व बद्रिकेदारापर्यंत जातों आणि तेथें जातांना देहपात झाल्यास सार्थक मानतों.

प्रलयकालीं मनु हा सप्तर्षि व इतर आवश्यक वस्तु यांना घेऊन मत्स्याच्या आश्रयानें हिमालयावर गेला आणि जलप्रलय ओसरतांच ' मनोरवसर्पण किंवा ' नावप्रभ्रंशन ' नांवाच्या हिमालयाच्या शिखरावरून खालीं उतरून, सृष्टीची उत्पत्ति, समाजाची व्यवस्था आणि राज्यसंस्थाही पुनः त्यानें सुरू केल्याची कथा वैदिक ग्रंथांत असून पुराणांनीं तिचा विस्तार केला आहे.

सृष्टि स्वायंभुव मन्वन्तरांत उत्पन्न झाली आणि सृष्टि उत्पन्न करण्याचें काम ब्रह्मदेवापूर्वी रुद्रावर सोंपविण्यांत आलें होतें. पण रुद्रानें सृष्टि उत्पन्न करण्याचें काम बरोबर बजाविलें नाहीं. त्यानें आपल्यासारखीच विरक्त, स्मशानवासी, ब्रह्मचारी व प्रजोत्पादनाकडे दुर्लक्ष करणारी प्रजा निर्माण केली. म्हणून पुढें रुद्राकडून तें काम काढून घेऊन ब्रह्मदेवाकडे तें प्रजोत्पादनाचें कार्य सोंपविण्यांत आलें. त्यानें स्त्रीपुरुषात्मक प्राणिसृष्टि उत्पन्न करून, काम-विकारानें सृष्ट प्राण्यांत आकर्षण उत्पन्न करून सृष्टीचें कार्य अखंडित चालण्याची व्यवस्था करून ठेवली. यापैकीं रुद्राचें स्थान हिमालय असून ब्रह्मयाचें स्थानहि तेंच आहे. रुद्राचें स्थान हिमालयाच्या माथ्यावर असून रुद्राचे अनुयायी भूत यांचें जें स्थान भूतान हें हिमाल-

याच्या पायथ्याशीं आहे. आणि ब्रह्याचें स्थान त्या दोघांच्यामध्यें आहे. ही स्वायंभुव मन्वंतरांतील सृष्टीच्या अगदीं आरंभींच्या काळाची कथा, सृष्टीचा आरंभ, मूलस्थानाच्या दृष्टीनें हिमालयांत झाला आणि वैदिक धर्माचें मूलहि तेंच स्थान होय, असें दर्शविते.

३ ब्रह्मदेश—

ऋग्वेदांत 'आंगिरस' यांना पुष्कळ ठिकाणीं 'पितरः' म्हटलेलें आहे. मनूला क्वचित् पिता म्हटलेलें आढळतें. आंगिरसांच्या कुळांतील अनेक व्यक्तींनीं ऋग्वेदांतील मंत्र केलेले आहेत. आंगिरस कुलांतील बृहस्पति, भारद्वाज, वामदेव, भृगु, अथर्वन्, गौतम, कण्व, कक्षीवान्, व दीर्घतमस् ह्या प्रमुख व्यक्तींनीं व अयास्य, रहूगण, प्रियमेध, सोमाहुति व सव्य इत्यादि पोटशाखांतील व्यक्तींनीं ऋग्वेदांतील सूक्तरचना केलेली आहे. हिंदुस्थानांत या कुलांतील बहुसंख्य ब्राह्मण आहेत. अत्रि, विश्वामित्र, वसिष्ठ व काश्यप हेहि आंगिरसकुलाशीं वंश किंवा शिष्य म्हणून संबद्ध असावेत असें दिसतें. कारण त्यांनीं आंगिरसांबद्दल अत्यंत पूज्यभाव व्यक्त केलेला आहे. यावरून आंगिरस कुळाच्या या शाखा असाव्यात असें दिसतें. म्हणजे आंगिरस हा मूळ ऋषि आणि इतर बहुतेक प्रमुख ऋषि त्याच्याच वंशांतील, म्हणजे हा सर्व सप्तर्षींचा वंशविस्तार आंगिरस कुळाचा विस्तार होय. आतां या आंगिरसांचें मूलस्थान कोणतें असावें तें पाहूं.

विद्यमान भौगोलिक दृष्ट्या विचार केला तर 'आंगिरस' हें नांव एका मोठ्या प्रदेशाचें असावें. कारण ब्रह्मदेशाच्या उत्तरेस चीन व तिबेट यांचेमध्यें 'अंगिराक्ष' या नांवाच्या पर्वतासभोंवतालचा प्रदेश आहे.[1] आशियाखंडाच्या नकाशांत आपणांस आत्रेय पर्वत, भृगु (एल् बुर्ग),

१. अमेरिकन नॅशनल जिऑग्राफीकल सोसायटीतर्फे सन १९३३ सालीं प्रसिद्ध झालेली नकाशाची प्रत पहा.

अगस्त्यपठार, ताक्ष्य ( काश्यप ), गौतम वगैरे पर्वत आजहि सांपडतात. त्या दृष्टीनें अंगिराक्षपर्वत व चीन-तिबेट यांच्या सभोंवतालचा प्रदेश यांत आंगिरसांची वसाहत झाली होती असें म्हणावयाचें. तेथून आंगिरसांच्या बृहस्पतिशाखा उत्तर ब्रह्मदेशांतून तिबेटकडे, गौतमशाखा हिमालयांतून हिंदुस्थानकडे अशा गेल्या, व पुढें त्यांचा उत्तर आशियाभर प्रसार झालेला दिसतो. पश्चिम आशियांत अंगारा शहर आहे, तर पूर्वेकडे अंगिरा नदीहि आहे.

असे हे आंगिरस आशियांत तरी कोठून आले? या प्रश्नाचें उत्तर आपणांस ऋग्वेदांत सापडतें. आंगिरस पितरांचा राजा यम हा होय.[1] आशियाच्या नकाशामध्यें आग्नेयीस व दक्षिणेस योमा, यामा, यिमा अशा नांवाचे पर्वत व बेटें सांपडतात. आराकान-योमा व पेगू-यामा हे पर्वत ब्रह्मदेशाचे नैऋत्येस आहेत. जपानमध्यें फूजियामा नांवाचा ज्वालामुखी पर्वत आजहि आहे. जपानचे दक्षिणेस फिलिफाइन्सपर्यंत पुष्कळ ज्वालामुखी असलेलीं 'यिमा' आहेत. हीं नांवें यम या आद्य नांवाचेच अपभ्रंश असावेत. यमाची दिशा दक्षिण व वाहन रेडा आहे. यावरून त्याची वसाहत विषुववृत्तावर कांहीं काळ होती असें दिसतें.

नकाशांत सांपडणाऱ्या बेटांच्या नांवांवरून हें स्पष्ट होतें कीं, आंगिरस हे आग्नेयीकडून आशियामध्यें आले व आजच्या इंडोचायनामध्यें उतरले. चीनमधील गांवांच्या नांवांत ऑंग अगर ङ हा अवयव फार प्रामुख्यानें दिसून येतो. याचें कारण चीनचें प्राचीन नांव आंगिरस असावें. आंगिरस हा शब्द अग्निरस याला अगदीं जवळचा असून आंगिरस हे अग्निवंशी होते.[2] अग्नीचा शोध यांनींच प्रथम लावला.[3] आशियाचे आग्नेयीस ओशियानिया व आस्ट्रेलेशिया यांचा समावेश करणारें एक मोठें खंड होतें. तें आज समुद्राच्या तळाशीं आहे. त्याचीं शिखरें व पठारें

१ ऋ. १०.१४.४; २ ऋ. १.३१.१; ३ ऋ. १.८३.४.

बेटांचे रूपानें समुद्रांत आढळतात. हें बुडालेलें खंड आंगिरसांचा मूळ प्रदेश होय असें म्हणावें काय ?

अंगिराक्ष पर्वताचे दक्षिणेस ' नमस्ते ब्रह्मन् ' ( नमचा बरवा ) नांवाचें पूर्व हिमालयाचें एक २५००० फूट उंचीचें शिखर आहे. त्या ठिकाणीं असणाऱ्या आंगिरसांनीं ब्राह्मणधर्म स्थापन केला. या ठिकाणापासूनच सांपू नदीला ब्रह्मपुत्रा नांव मिळालेलें आहे. संध्येंतील दश-दिशावंदनांत ' उर्ध्वायै दिशे ब्रह्मणे नमः ' एवढ्या दिग्वंदनावरूनहि तो प्रदेश निश्चित होतो ( गो. चिं. अनगळ ).

" H. D. Daunt " कृत "सेन्टर ऑफ् एन्शन्ट सिव्हिलायझेशन्" या ग्रंथाचा सारांश पुढें देण्यांत येत आहे.

इजिप्त, असिरिया वगैरे भागांतील संस्कृति हीच सर्वांत प्राचीनतम असा आजपर्यंतच्या संशोधकांचा सिद्धांत आहे. याबद्दल या पंडिताचें म्हणणें असें कीं, या देशांतील संस्कृतीचे आधार जे तेथील राजे वगैरे समाजांतील प्रमुख, ते त्या देशांत परकीय म्हणूनच आलेले दिसतात. या देशांतील इष्टिकालेख वगैरेवरूनहि तेथील संस्कृति ही मूळ तेथें उत्पन्न झालेली नसून ती परकीयांनीं येऊनच त्या भागांत स्थापिली, असें अनुमान प्राचीन अवशेषांचा अभ्यास करून निघतें. त्याप्रमाणें चीनमधील संस्कृतिहि अशीच परक्या ठिकाणाहून आलेली दिसते. इष्टिकालेखांतील निरनिराळे उल्लेख वगैरेंच्या आधारांनीं या पंडितानें असें सिद्ध केलें आहे कीं, ही पश्चिम आशियांत पसरलेली संस्कृति मूळ आर्यावर्ताच्या ईशान्य कोपऱ्याला असलेल्या आसाम, मणिपूर वगैरे भागांतून आलेली असावी. येथील संस्कृतीचे पुरस्कर्तेच प्रथम समुद्रमार्गें पश्चिमेकडील देशांत वसाहती, व्यापार वगैरे निमित्तांनीं पसरले व तेथें त्यांनीं राज्येंहि स्थापिलीं. पश्चिम आशियांतील अवशेषांत सांपडणारीं दरींच स्थाननामें, हत्तीच्या शिकारीचे वगैरे उल्लेख, यांवरून हा अतिपूर्वेचा संबंध पश्चिमेकडे पोंचतो

व बायबलमधील जुन्या करारांतील उल्लेखाचीहि या सिद्धांतानें व्यवस्थितपणें जुळणी बसवितां येते.

अर्थात् हें सर्व संशोधन त्या प्राचीन अवशेषांतून आढळून येणाऱ्या लिपींतील शब्दसाम्यावरूच विशेष भर देऊन केलें आहे. याचें नमुन्यासाठीं म्हणून एक उदाहरण दिलें असतां नीट कल्पना येईलः–' तेल-अल-अमाना ' येथें सांपडलेल्या एका इष्टिकालेखांत उरुसलेम हें शहर ज्यांत सलिम नांवाच्या उरसं म्हणजे महादेवाचें अधिष्ठान आहे तेथून लिहिला असल्याचें सांगितलें आहे. उर, बर, कल, सल इत्यादि शब्दांचा समानार्थ महान् असा होतो. त्यामुळें, उरुम, सरुम, बरुम हेहि शब्द समानार्थकच होतात. म्हणून उरूसलेमचा महादेव सलेम, हा आर्यांचा बरम-ब्रह्म-ओम् हाच मानतां येईल. या ब्रह्माचेच पूजक ब्राह्मण होत. ब्रह्मदेशांतील प्राचीन राज्यकर्त्यांना या असीरियांतील लेखांतून अरमु किंवा उरुमु म्हटलेलें आढळतें. त्यावरून हा सर्व निर्देश पूर्वेकडे ब्रह्मदेशाचाच मानावा लागतो. हे अरमु नांवाचे राज्यकर्ते पूर्वेकडील इतर भागांतहि असल्याचें दिसतें. तिसरा 'तिरुगाथ पिलेसर' म्हणतो कीं, उक्नी किंवा सिंधूच्या तीरावर, सुरपी तथा गंगेच्या तीरावर, इदिकलात किंवा ब्रम्हपुत्रा, बुरत तथा इरावती इत्यादि भागांत हे राज्यकर्ते आपापलीं राज्यें संभाळून होते.

**४ उत्तरध्रुव—**

वैदिक लोकांचें मूल वसतिस्थान पंजाब किंवा त्याच्या आसपासच्या मुलखांत नसून तें उत्तरध्रुवावर असलें पाहिजे, हा सिद्धान्त मान्य केल्याशिवाय ऋग्वेदांतील कांहीं मंत्रांचा अर्थच लागत नाहीं. ऋग्वेदांत असलेल्या नद्यांच्या व स्थलांच्या निर्देशांवरून ऋग्वेदांतील मंत्र जरी पंजाब प्रान्तांत म्हटले गेले असें जरी निश्चित ठरत असलें, तरी उत्तरध्रुवावरील परिस्थितीचा परिणाम त्यांच्या मनांवर झालेला होता असें स्पष्ट दिसतें.

उत्तरध्रुवावरील सध्यांचें हवामान इतकें थंड आहे कीं, तेथें सतत बर्फ

असल्यानें तो प्रदेश सध्यां मनुष्यवस्तीस अगदीं अयोग्य आहे. पण दहा हजार वर्षांपूर्वी तो प्रदेश मनुष्यवस्तीस योग्य होता व तेथें वनस्पतींची योग्य प्रमाणांत वाढहि होत असे.

पण क्रान्तिवृत्तांत फरक होऊन व इतर कारणांनीं हवामान बदललें आणि तो प्रदेश बर्फमय होऊन मनुष्यवस्तीस आणि वनस्पतींच्या वाढीस अयोग्य झाला, म्हणून तेथील कांहीं लोकांची वस्ती हटत हटत मध्य-आशियांत आली.

उत्तरध्रुवाच्या अगदीं टोंकाच्या प्रदेशांत एका वर्षांत एकच दिवस व एकच रात्र होती व हल्लींहि आहे. तीनशें पासष्ट दिवसांपैकीं एकशें चौऱ्याण्णव दिवस सूर्य आकाशांत असतो, म्हणजे साधारण हवामानाच्या प्रदेशांतील एकशें चौऱ्याण्णव दिवसांचा एक दिवस उत्तरध्रुवाच्या प्रदेशांत असतो. उरलेल्या एकशे एकाहत्तर दिवसांची रात्र असते. ही संपूर्ण रात्र अंधकारमय नसते. दिवस सुरू होण्यापूर्वी सत्तेचाळीस दिवस अरुणप्रकाश व रात्र सुरु होण्याचे पूर्वी अठ्ठेचाळीस दिवस संधिप्रकाश असतो. अशा रीतीनें पूर्ण अंधारी रात्र फक्त शहात्तर दिवसांची असते. सूर्य दक्षिणेकडे उगवतो. तारे उगवत नाहींत व मावळतहि नाहींत, तर क्षितिजावर फिरत राहतात. उत्तरध्रुवापासून जों जों दूर जावें, तों तों या स्थितींत थोडाथोडा फरक पडत जातो.

प्रदीर्घ दिवस व रात्र यांचे उल्लेख ऋग्वेद व अवेस्ता ग्रंथांत सांपडतात. उत्तरायण ( देवांचा दिवस ) व दक्षिणायन ( देवांची रात्र ), तसेंच मरणानंतर जीवाचा मार्ग दाखविणारे देवयान व पितृयान हे दोन मार्ग, ऋग्वेदांत सांगितले आहेत. त्यांचें मूळ उत्तरध्रुवावरील लांबलचक दिवस व दीर्घकालीन रात्र यांतच सांपडतें. दक्षिणायनांतील मृत्यु अशुभ व उत्तरायणांतील मृत्यु शुभ मानण्याचें कारणहि हेंच होय.

ऋग्वेदांतील उषादेवतेचें विशेष वर्णन, ' उषासः ' हा बहुवचनी

प्रयोग, सूर्याचें 'सप्ताश्व' व 'सप्तचक्र' हें वर्णन सात महिन्यांच्या दिवसांची कल्पना केल्याशिवाय जमण्यासारखें नाहीं.

भृगु, अथर्वन् आणि आंगिरस हीं ऋषिकुळें उत्तरध्रुवाकडे होतीं. ग्रीक व पर्शियन भाषांत हे शब्द आढळतात. यापैकीं आंगिरसांचे 'नवग्व' व 'दशग्व' असे दोन प्रकार होते. याचा अर्थ हे उत्तर ध्रुवाकडील ज्या प्रदेशांत होते, तेथें यांना नऊ व दहा महिन्यांत यज्ञ संपवावा लागे. कारण तेथें तेवढाच दिवस होता. तसेंच ममता व उतथ्य यांचा मुलगा 'दीर्घ-तमस् (सूर्य) हा 'दशमे युगे' म्हणजे दहाव्या महिन्यांत अंध व वृद्ध झाला असतां, त्याच्या मुलांनीं त्याला खड्ड्यांत टाकलें, तेथून त्याला 'अश्विनौ' नीं सोडविलें. अशा ऋग्वेदान्तर्गत अनेक उदाहरणांवरून हे लोक दहा महिन्यांचा दिवस असलेल्या प्रदेशांत होते असें दिसतें.

पाणी, प्रकाश किंवा गाई मिळविण्याकरितां वृत्राशीं ( अंधाराशीं ) चाललेलें इंद्राचें प्रतिवार्षिक युद्ध आणि त्या युद्धांत इन्द्रानें जय मिळविल्यानें जलमार्गानें सूर्याचें येणें, विष्णूच्या तीन पावलांपैकीं दोन दृश्य व एक अदृश्य ही कल्पना, तसेंच दुःखितांचें दुःख व रोग दूर करणारे उषेचे अग्रदूत 'अश्विनौ' देवता यांचें ऋग्वेदांतील वर्णन यांची उपपत्ति, फक्त उत्तरध्रुव हें वैदिकांचें मूळ वसतिस्थान मानल्यानें लागण्यासारखी आहे.

उत्तरध्रुवावरील मनुष्याच्या मूलस्थानाची कल्पना प्रथम डॉ. वारेन यांनीं 'पॅराडाइज फाउंड' या ग्रंथांत मांडली व लो. टिळक यांनीं ती आर्यांच्या पुरती मर्यादित अशी 'आर्टिक होम इन दि वेदाज्' या ग्रंथांत वेद, अवेस्ता, यांतील बलवत्तर प्रमाणांनीं समर्थन केली.

**५ दक्षिण हिंदुस्थान—**

अगदीं प्राचीन काळीं म्हणजे स्वायंभुव मन्वन्तराच्या प्रारंभीं दक्षिण हिंदुस्थानांत प्रथम मनुष्यप्राणी व उच्च संस्कृति निर्माण झाली, असें प्रतिपादन करणाऱ्या पुराणांत अनेक गोष्टी आहेत. त्यापैकीं हिरण्याक्ष, हिरण्य-

काशिपु, वृत्र, बलि, पौलस्त्य, पुलह, क्रतु, बाण वगैरेंच्या कथांना प्राधान्य दिलें पाहिजे.

यापैकीं बहुतेक कथा स्वायंभुव-मन्वन्तराच्या आरंभीं घडलेल्या आहेत. स्वायंभुव-मन्वन्तर हें सृष्टीच्या अगदीं आरंभींचें मन्वन्तर होय. पृथ्वीवरील बहुतेक संस्था त्यानंतर निर्माण झाल्या आहेत. त्यानंतर स्वारोचिष, उत्तम, तामस, रैवत व चाक्षुष इतकीं मन्वन्तरें झालीं. सध्यां वैवस्वत-मन्वन्तरांतलि चतुर्युगाचा अठ्ठाविसावा फेरा चालू आहे.

हिरण्याक्ष व हिरण्यकशिपु हे देवविरोधी होते. त्यांचीं राज्यें सर्वत्र पसरलेलीं होतीं. तरी त्यांचीं स्थानें दक्षिणेकडे होतीं. समुद्राशीं त्यांचा अत्यंत निकटचा संबंध होता. विष्णु त्यांच्या विरोधी पक्षांतील होता. प्रल्हाद शत्रुपक्षाशीं संगनमत करी. त्याला नरसिंहानें साहाय्य केलें. नरसिंहानें हिरण्यकाशिपूचा वध उत्तरेस गंगेच्या तीरावर केला व नंतर तो दक्षिणेस गोदावरीच्या तीरीं आला. नरसिंह ही देवतासुद्धां दक्षिणेकडील आहे. तिचे उपासक व मंदिरें दक्षिणेकडेच आहेत.

बलीची कथा मूळ दक्षिणेकडील वसाहत दर्शविणारी आहे. बलीचें राज्य सर्व हिंदुस्थानभर व हिंदुस्थानच्या बाहेरहि पसरलेलें होतें. त्याच्या सत्यवचनीपणाचा फायदा घेऊन वामनानें त्याला शब्दांत पकडलें आणि त्याचें राज्य मिळविलें. ही गोष्ट दक्षिणेंत नर्मदेच्या तीरीं भडोच येथें झाली. यांच्या पत्नीचें नांव विंध्यावली आहे. हें नांवसुद्धा याचा दक्षिणेकडील संबंध दर्शवितें. याची बलिपूर किंवा महाबलिपूर ही राजधानी दक्षिणेकडे प्रसिद्ध आहे.

याचें राज्य घेऊन वामनानें याला दक्षिणेकडे पाताळांत लोटलें. पाताळ म्हणून समजल्या जाणाऱ्या दक्षिणेकडील बेटांत याच्या नांवाचें बलिद्वीप हें बेंट जावासुमात्राजवळ प्रसिद्ध आहे. दक्षिण हिंदुस्थानांतील शेतकरी आपण बळीचे वंशज आहोंत असें अझून म्हणावितात व ‘ बळीचें राज्य

मिळो.' असा मुलांना आशीर्वाद देतात. त्याचा अर्थ 'नीतिधर्मानीं चालणारें अटळ राज्य' असा आहे.

दुसऱ्या अनुवंशांतील बलीचें राज्यसुद्धां दक्षिण हिंदुस्थानांत असून त्याच्या मुलांच्या नांवांमुळेंच अंग, वंग, कालिंग, सुह्म व आंध्र हीं नांवें ब्रह्मदेशापासून तेलंगणापर्यंतच्या देशाला प्राप्त झालीं आहेत.

या बलीच्या वंशापासूनच 'बालेय क्षत्रिय' व 'बालेय ब्राह्मण' दक्षिण हिंदुस्थानांत आजहि प्रसिद्ध आहेत.

पुराणकारांनीं ही अत्यंत पुरातन, वेदांतील मंत्रकालाच्या पूर्वीची म्हणून परंपरागत माहिती दिली आहे. ती परंपरा आपल्या वंशाला जोडून अभिमानानें बाळगणारे लोकहि दक्षिण हिंदुस्थानांत आज आहेत.

याप्रमाणेंच पौलस्त्य, पुलह, क्रतु व त्यांच्या वंशांत झालेल्या रावण वगैरेंच्या कथा दक्षिण हिंदुस्थानच्या अत्यंत पुरातन परंपरेवर प्रकाश पाडणाऱ्या आहेत. वरील तीनहि गोत्रें दक्षिण हिंदुस्थानांतील असून रावण हा पौलस्त्य गोत्री वेदपठण करणारा ब्राह्मण होता. सूर्यवंशांतील राजांशीं त्याचा राजकीय व तात्त्विक विरोध होता. अगस्त्य हा उत्तरेकडून दक्षिणेकडे विंध्य पर्वत ओलांडून आलेला होता. उत्तरेकडील अयोध्येतील राजांवर व दक्षिणेकडील रावण वगैरेंवर त्याचें सारखेंच वजन होतें. त्यांनीं दक्षिण व उत्तर हिंदुस्थानांतील राजघराण्यांचा, समाजांचा आणि धर्मांचा एकोपा घडवून आणला व मतभेद नाहींसे केले. त्याला हा एकोपा करण्याच्या कामीं इतकें अपूर्व यश आलें कीं, पौलस्त्य, पुलह व क्रतु हीं अत्यंत प्राचीन असणारीं दक्षिणेतील ब्राह्मणगोत्रें अगस्त्य गोत्रांत सामील झालीं. हें अगस्त्यगोत्र ऋग्वेद्यांपैकीं कोकणस्थ वगैरे ब्राह्मणांत नसून फक्त देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणांतच आहे. महाराष्ट्रांतील शुक्लयजुर्वेदी लोकांत हें अगस्त्यगोत्र आढळत असलें तरी ते लोक वेद, परंपरा व वसाहत या सर्वच दृष्टीनें उत्तरकालीन आहेत.

**६ भाषेवरून मूलस्थान—**

आतां हिंदुस्थानांत आपणांस प्रथम कोणते लोक उपलब्ध होतात, हें पाहावयाचें आहे. वैदिक संस्कृत भाषा आणि द्राविड भाषा अशा अगदीं दोन स्वतंत्र भाषा आपणांपुढें उभ्या आहेत. त्यांचीं स्वरूपें अगदीं भिन्न आहेत. वर्णमाला आणि उच्चार सुद्धां भिन्न आहेत. त्यांचें मूळहि भिन्न असलें पाहिजे. हिंदुस्थानांतील रानटी लोकांत म्हणजे कोल, संताळ, मुंडा, वडार, कातकरी, भिल्ल वगैरे लोकांत प्रचलित असणाऱ्या भाषा द्राविड भाषेचें वर्चस्व असलेल्या आहेत. हिंदी, बंगाली, गुजराथी, मराठी, राजस्थानी, सिंधी वगैरे भाषा संस्कृताला प्राधान्य देणाऱ्या आहेत. द्राविड भाषांत अत्यंत जुनी असणारी भाषा तामील होय. तेलगू, कानडी, मल्याळी, तूल, तोड, कोटा, गोंड, खोंड व कुंड या नऊ भाषा द्राविडभाषा असून त्या तामीळ भाषेचा प्राचीनपणा मान्य करतात व तामीळभाषासाहित्य आपलेंच म्हणून उपयोगांत आणतात. ऊर्दू भाषेचा फार्शीवर जसा हक्क आहे, तसाच हा संबंध आहे.

द्राविड भाषा व्याकरणविषयक तुलनेनें 'सिथियन' भाषासमूहांतील आहेत. सिथियन भाषा मध्य व उत्तर आशियाखंडांत पसरलेल्या आहेत. सिथियन भाषासमूहांत फिनिश, टार्किश, मोंगोलियन व टुंगुशियन हे भाषासमूह अन्तर्भूत होतात. या सर्व भाषा एकाच व्याकरणपद्धतीनें बनलेल्या आहेत आणि त्यांतील सामान्य नियम एकच आहेत. द्राविड भाषांचा सिथियन भाषासमूहाशीं संबंध प्रथम प्रो. रास्क यांनीं दाखविला.

आतां द्राविड भाषा बोलणाऱ्या या दोन गटांचा पूर्वी संबंध होता आणि तो संस्कृभाषेच्या प्रभावानें तुटला, असें कांहीं लोक म्हणतात. याकरितां बलुचिस्थानांतील ब्राहुवी भाषेचा प्रश्न अगोदर ध्यानांत घेतला पाहिजे. कारण ब्राहुवी भाषा ही मूळची द्राविड भाषा आहे. एका वेळीं द्राविड भाषा बोलणारे लोक बलुचिस्थानापर्यंत पसरलेले असले

पाहिजेत, हेंच यावरून दिसून येतें. मोहेंजोदारो व हरप्पा येथील उत्खननानें प्राप्त झालेल्या शोधांनीं द्राविड संस्कृतीच्या प्रसारावर नवा प्रकाश पडलेला आहे.

### ७ मोहेंजोदारो व हरप्पा—

सिंधूनदीच्या खोऱ्यांत लारखाना जिल्ह्यांतील वरील गांवीं उत्खनन करून भूमिगत बांधकामाचे सात थर शोधून काढण्यांत आले आहेत. त्यांत पहिले तीन अर्वाचीन ( खि. पू. २७५० ), दुसरे मध्यकालीन तीन थर (खि. पू. ३०००) व तिसरा प्राचीन एक थर ( खि. पू. ३२५० ) असें कालदृष्ट्या निश्चित ठरविण्यांत आलें. कांहीं वस्तूंचा काळ तर खि. पू. ४००० वर्षें ठरविण्यांत आला आहे. सुमेरियन संस्कृतींतील सांपडलेल्या प्राचीन अवशेषांचें येथें सांपडलेल्या अवशेषांशीं पूर्ण साम्य आहे.

शहररचना, शिक्के, ताम्रपट, पृथ्वीदेवतेचीं चित्रें, योगासन घातलेली शिवमूर्ति, लिंगपूजा, प्राणी, अलंकार, आयुधें, आहार, वस्त्र व प्रेतव्यवस्था अशा विभागानें त्यांचें वर्गीकरण करून पाहणी करण्यांत आली आहे आणि असा सिद्धांत काढण्यांत आला आहे कीं, ही संस्कृति अत्यंत सुधारलेल्या लोकांची असून ही द्राविड संस्कृति आहे. वैदिकांच्या संस्कृतीपैकीं या उखननांत कांहीं सांपडलेलें नाहीं. सुमेरियन व द्राविड एकच होत.

### ८ आर्य व द्रविड—

वैदिक लोक व द्रविड लोक यांच्यांत मूलतःच फरक मानण्यांत येतो. वैदिक लोकांच्या देवता वेदांमध्यें प्रसिद्ध आहेत. अग्नि, इंद्र, वरुण, मित्र, उषा, भग, अर्यमन्, पूषन् वगैरे या वैदिकांच्या देवता होत. उलट लिंगपूजा, नागपूजा, वृक्षपूजा व प्राणिपूजा यांचा प्रचार द्रविडांत होता. वैदिकांनीं लिंगपूजा त्याज्य मानलेली आहे. नाग किंवा वृक्ष यांची पूजा वेदांत मागाहून घेतलेली आहे. देवतांविषयीं हा फरक बराच महत्त्वाचा मानण्यांत येतो.

आर्य हा शब्द ऋग्वेदांत आला आहे. द्रविड हा शब्द ऋग्वेदांतच काय पण इतर वैदिक वाङ्मयांत व त्यानंतरच्या सूत्रग्रंथांतसुद्धां नाहीं. त्यापुढील वाङ्मयांत द्रविड शब्द आढळतो. ऋग्वेदांतील आर्यशब्द गुण-दृष्टीनें श्रेष्ठ अशा अर्थाचा आहे. 'कोणीहि आर्य होऊं शके व आर्याचे अनार्य होत.' इत्यादि निर्देशावरून ऋग्वेदांत आर्यशब्द वंशवाचक नाहीं असें ठरतें. आर्यविरुद्ध ऋग्वेदांत दस्यु दिसतात. दस्यु कसे होते याचें वर्णन निश्चित स्वरूपांत आढळत नाहीं.

ऋग्वेदांत विरोधी लोकांचें 'देव न मानणारे, यज्ञ न करणारे, अ-धार्मिक, भलत्याच देवतांची उपसना करणारे, नकटे, चमत्कारिक भाषा बोल-णारे व कच्चें मांस खाणारे' असें मोघम वर्णन आहे. यापैकीं कांहीं विशेषणें ते आपल्यापैकीं माणसाची निन्दा करतांना त्या निन्द्य माणसाला लावतात. फक्त निर्णायक असें 'शिश्नदेव' हें लिंगपूजक अशा अर्थाचें विशेषण दिसतें. लिंगपूजा ही मूळ द्रविडांतील होय. ती पुढें वैदिकांनीं स्वीकारली.

वेदानुयायांनीं यापैकीं कांहींना नष्ट केलें, कांहींना रानटी स्थितींत राना-वनांत शिल्लक ठेवलें आणि कांहींशीं वैदिक एकरूप झाले असें दिसतें. ऋग्वेदांत लिंगपूजकांचा तिरस्कार केलेला आहे, पण पुढें लिंगाचा रुद्र म्हणून स्वीकार करून, शिव आणि उमा यांना ब्रह्म आणि माया यांच्या पदवीला पोचविलें. वृक्षांची पूजा यज्ञांतच स्वीकारली आणि नागालाहि देवत्व दिलें. अशा प्रकारें द्रविडांनीं वैदिकांची भाषा स्वीकारली आणि वैदिकांनीं द्रवि-डांची संस्कृति आत्मसात् केली. तथापि द्राविड भाषेंतील किती तरी शब्द वैदिकांना टाळतां आलेले नाहींत. ते अत्यंत अर्थवाहक म्हणून वेदांतहि त्यांना स्थान प्राप्त झालें. ही गोष्ट जैमिनि, कुमारिलभट्ट वगैरे मीमांसकांनीं नमूद केलेली आहे. याचा अर्थ असा होतो कीं, द्रविडांचें हिंदुस्थान हें मूळस्थान असून बहुतेक वैदिक वाङ्मयहि द्रविडांनींच किंवा द्रविडांच्या वर्चस्वाखालीं तयार झालेलें आहे.

## प्रकरण ३ रें

# ऋग्वेदांतील मंत्र व ऋग्वेद यांचा काळ

ऐसें हें अवघेंचि ऐकावें। परंतु सार शोधूनि घ्यावें॥
असार तें जाणोनी टाकावें। या नांव श्रवणभक्ती॥
—दास ४-१-२९

### १ वेदांचें अनादित्व व अपौरुषेयत्व—

वेद हे नित्य, अनादि आणि अपौरुषेय आहेत. आणि हीं विशेषणें या ग्रंथांना अगदीं प्राचीन तत्त्वज्ञान्यांनींहि दिलेलीं आहेत. व्यावहारिक कारणानें वेदमंत्र निर्माण झाल्याचें कांहीं सूक्तांत वर्णन आढळत असलें,तरी ऋक्, यजुः, साम हे तिन्ही विराट् पुरुषापासून उत्पन्न झाले असें त्याच ग्रंथांत स्पष्ट म्हटलेलें आहे.[1] म्हणजे वेदांच्या अनादित्वाची किंवा अपौरुषेयत्वाची कल्पना वेदाइतकीच प्राचीन आहे असें म्हणावें लागतें. ब्राह्मणें व उपनिषदें यांत हेंच मत दृष्टीस पडतें. ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेद हे अनुक्रमें अग्नि, वायु व सूर्य यांपासून झाले असें त्यांत सांगितलें आहे.[2] वेद हे परमात्म्याचें निश्वासित होत,[3] प्रजापतीनें दैवी वाचेपासून वेद निर्माण केले, हेंच मत स्मृति व पुराणें यांत प्रतिपादन केलें आहे.

कल्पान्तीं होणाऱ्या प्रलयांत इतर सर्व वस्तूंप्रमाणें वेदहि नष्ट होतात, पण पुढच्या कल्पाच्या प्रारंभीं ब्रह्मदेव स्वतः त्यांचें पुनरुज्जीवन करतो व

१. तस्माद्यज्ञात् सर्वहुतः ऋचः सामानि जज्ञिरे
छन्दांसि जज्ञिरे तस्माद्यजुस्तस्मादजायत॥ ऋ. १०.९०.९

२. श. ब्रा. ११.५.८.१, ऐ. ब्रा. ५.३२.३४, छां. उ. ४.१७.१.

३. बृ. उ. २.४.१०.

लहान प्रलयांतून ऋषि त्यांचें संरक्षण करतात असें मत आहे.[1] मागील युगाच्या अन्तीं नष्ट झालेले वेद व इतिहास महर्षींनीं स्वयंभू ब्रह्म्याच्या अनुज्ञेनें तप करून पूर्वी परत मिळविले, म्हणून ऋषि मंत्रांचे कर्ते नसून द्रष्टे आहेत. तैत्तिरीय, काठक इत्यादि वेदांच्या शाखा व्यक्तीच्या नांवानें प्रसिद्ध असल्या तरी ते त्या शाखांचे प्रचारक होत.

आतां हे वेद शब्दशः नित्य आहेत का अर्थतः नित्य आहेत, याबद्दल जैमिन्यादि शास्त्रकारांत सूक्ष्म मतभेद असले तरी 'एकाच जातीच्या अर्थक्रमाचा प्रवाह कधीं बंद पडत नाहीं.' असें अर्थतः नित्यत्वाचें प्रतिपादन पतंजलीनें केलें आहे, आणि जैमिनि शब्द व अर्थ दोन्ही नित्य मानतो. या दोन मतांच्या मध्यावर बाकीच्या आचार्यांचीं मतें बसतात. यावरून वेद, त्यांची शब्दरचना, अर्थ वगैरेसंबंधीं प्राचीन काळापासून असलेली गाढ श्रद्धा आणि त्यांच्यावर असलेला चिकित्सक शास्त्रज्ञांचाहि विश्वास दिसून येतो. आतां त्यांतील मंत्र व ऋक्संहिताग्रंथ यांच्या काळासंबंधीं झालेल्या व संभाव्य प्रयत्नांचा आपण थोडक्यांत परिचय करून घेऊं.

ऋग्वेदसंहितेनंतर थोड्याथोड्या अंतरानें बाकीच्या संहिता व इतर ब्राह्मणादि ग्रंथ झालेले आहेत.

**२ संकल्पांतील सृष्टीच्या आरंभापासूनची कालगणना—**

कलियुगाचें मान ४३२,००० वर्षें आहे. ह्याच्या अनुक्रमें दुप्पट, तिप्पट, चौपट द्वापार, त्रेता व कृत हीं युगें आहेत. या चार युगांमिळून एक महायुग होतें. अर्थात् तें कलियुगाच्या दसपट असतें. व त्याचें मान ४३२०००० वर्षें आहे. अशीं १००० महायुगें मिळून कल्प होतो. हा ब्रह्मदेवाचा दिवस. एका कल्पांत चवदा मनु होतात. कल्पारंभापासून वर्तमान महायुगारंभापर्यंत सहा मनु व सत्तावीस महायुगें गेलीं आणि पुढें अठ्ठावि-

१. युगान्तेऽन्तर्हितान् वेदान् सेतिहासान् महर्षयः। लेभिरे तपसा पूर्वमनुज्ञाताः स्वयंभुवा॥ शांतिपर्व २१० श्लो. १९.

साव्या महायुगांतील कृत, त्रेता, द्वापार हीं तीन युगें जाऊन सांप्रत कलियुग चाललें आहे. प्रत्येक मनु ७१ महायुगांचा असतो. शिवाय प्रत्येक मनूच्या आरंभीं कृतयुगाएवढा मनुसंधिकाल असतो. म्हणजे ब्रह्मदिनारंभापासून वर्तमान कलियुगारंभापर्यंत ४५६७ कलियुगांइतका काळ गेला. म्हणजे वैवस्वत मन्वन्तराला आरंभ होऊन आज१२०९०१०४४ इतकीं वर्षें झालीं. आणि सृष्टि उत्पन्न होऊन एक अब्ज, सत्त्याणव कोटि, एकोणतीस लक्ष, एकूणपन्नास हजार, चव्वेचाळीस वर्षें झालीं आणि चतुर्युगाची ३८,९३०४४ इतकीं वर्षें गेलीं. ही वर्षसंख्या आम्हीं वैदिक लोकांनीं मान्य केलेली असून त्याप्रमाणें आम्ही ' विष्णोराज्ञया प्रवर्तमानस्य द्वितीये परार्धे श्रीश्वेतवाराहकल्पे वैवस्वतमन्वन्तरे ' इत्यादि नित्य संकल्पांत म्हणतों. पंचांगांत याप्रमाणेंच कालगणना करण्याची आमची पद्धत आहे. ही कालगणना सृष्टीच्या आरंभापासून मोजण्यास सुरवात केलेली आहे. प्रथम वेद झाले आणि नंतर सृष्टि झाली असा वैदिकांचा सिद्धांत आहे. या सिद्धांतांतील सांकेतिक अर्थ ध्यानांत घेणें जरूर असतें. भूगर्भशास्त्रवेत्ते आणि भूस्तरशास्त्रवेत्ते यांना मात्र यापेक्षांहि अधिक वर्षें सृष्टीच्या उत्पत्तीस झालीं असतील असें वाटतें. पुराणें, मनु व महाभारत या ग्रंथांतहि याच कालगणनेचें प्रतिपादन आहे, असें शं. बा. दीक्षित यांनीं दाखविलें आहे ( भा. ज्यो. इ. पा. १०,१०२,१०३,१४१,१४३ ). भारतीय ज्योतिषग्रंथकारांनीं ही पुराणांतील पद्धतिच घेतली आहे. लो. टिळकांना मात्र युगकालाच्या या प्रचंडसंख्या मान्य नाहींत. त्यांनीं दैवी वर्षगणना न घेतां मानुषी वर्षगणना घ्यावी अशी सूचना केली आहे ( आर्यांचें मूलस्थान पा. २९०-२९१ ). पण या दैवी वर्षगणनापद्धतीनेंच टिळकांच्या वेदकालनिर्णयाला कसा पाठिंबा मिळतो हें आम्हीं पुढें दाखविलें आहे.

**३ उत्तर ध्रुवावरील वसाहतीचा काळ** ( ख्रि.पू. १०००० वर्षें ). वैदिकांची वसाहत उत्तरध्रुवावर होती असें लो. टिळकांनीं अनेक

आधारांनीं सिध्द करण्याचा प्रयत्न केला आहे. त्या मताला आणखी एक नवा पुरावा पुढें नुकताच आणण्यांत आला आहे. चित्रावसु हा शब्द तैत्तिरीय संहितेंत रात्र अशा अर्थानें आला आहे. वैदिक लोक रात्रीला फार भीत असत. आणि रात्र सुखानें पार पडावी म्हणून प्रार्थना करीत असत. ' वसु ' हा शब्द रात्रवाचक असतां चित्रावसु असा मोठा शब्द रात्रीकरितां वापरणें, रात्रीच्याबद्दल भीति बाळगणें आणि चित्रावसु शब्द अत्यंत प्राचीन म्हणून दुर्बोध झाल्यानें वेदांतच त्याच्या अर्थाचा प्रयत्न असणें या सर्वच गोष्टी या शब्दाच्या अर्थाकडे लक्ष वेधण्यास कारण होतात.

आपल्या येथें रात्रिदिवसाचें चक्र सारखें चालू आहे. उत्तरध्रुवावर रात्र आली कीं सारखी रात्र, व दिवस आला कीं सारखा दिवसच असतो. दिवसांची गणना करावयाची तर सूर्याचीं चक्राकार भ्रमणें मोजावयाचीं व रात्रींच्या गणनेकरितां नक्षत्रचक्रांचीं भ्रमणें मोजावयाचीं. तेथें दिवसाचा आरंभ वसंतसंपातावर व्हावयाचा व रात्रींचा आरंभ शरत्संपातावर व्हावयाचा. वर्षाचे कालखंड दोनच. अशा प्रकारें दिवस व रात्री यांचे पर्याय मोजतां आले तरी रात्रीचे पोटखंड मोजण्याकरितां. नक्षत्रांचा उपयोग केलेला दिसतो. चित्रा नक्षत्रानें सुरवात होणाऱ्या रात्रीला चित्रावसु अशी संज्ञा दिसते. चित्रा नक्षत्रावर रात्र सुरू व्हावयास सूर्य रेवती नक्षत्रावर यावयास पाहिजे. हा शरत्संपाताचा आरंभ होय. अर्थात् वसंतसंपात चित्रावर येणार. मृगावर वसंतसंपात खि. पू. ४००० वर्षें होता. तो चल असून मागें येत चित्रावरून मृगावर येण्यास सुमारें ७००० वर्षें लागतील. म्हणजे चित्रावसु ही संज्ञा खि. पू. ११००० वर्षें उत्तर ध्रुवावर वस्ती असतांना रूढ असली पाहिजे ( भा. इ. सं. मं. पुणें त्रैमासिक २०.१– लेखक महाराष्ट्रीय ).

उत्तर ध्रुवावर प्रथम वैदिकांची वस्ती १३००० वर्षांपूर्वी होती. तेथें हिमप्रलय झाल्यानंतर उत्तर ध्रुवावरची वस्ती उठून गेली. हिमप्रलय खि.

पू. १०००० वर्षांपूर्वी झाला. कारण सांगतां येत नसलें तरी उत्तरध्रुवा-वरील हवा बदलून थंड होऊं लागली व क्रमानें त्याचें पर्यवसान हिम-प्रलयांत झालें. हें कार्य हळूहळू होत असल्यानें अनेक शतकें चाललें असलें पाहिजे. या प्रलयांत तेथील लोकांची वाताहात झाली. एवढेंच नव्हे तर जवळजवळ तेथली संस्कृतिच नष्ट झाली. त्यापूर्वींच्या कांहीं आठवणी तदुत्तर कालांतील ऋग्वेदांत ग्रथित केल्या. त्यावरून उत्तर ध्रुवावर वैदिकांच्या पूर्वजांची वस्ती असावी किंवा परंपरेनें तेथील वस्तीशीं संबंध असावा असें मानणें भाग पडतें. मग ती वस्ती मूलस्थान म्हणून असो, किंवा मूलस्थान सप्तसिंधूसारखा एकादा आर्यवर्तांतील प्रान्त असून नंतर येथून तेथें गेलेल्या लोकांची झालेली वसाहत असो. उत्तर ध्रुवावरील दिवसरात्र-विषयक विशेष प्रकारांचा ऋग्वेदांत आठवणीसारखा अपुरा व तुटक निर्देश आहे यांत संशय नाहीं.

**४ वेदांतील मंत्रांचा पुराणप्रमाणें काळ—**

वेदांतील मंत्र अनादि असून अपौरुषेय आहेत असा वैदिक ऋषींचा आणि व्यास-जैमिनि-पतञ्जलि यांचा सिद्धान्त आहे. पुराणांतील कालक्रमाप्रमाणें वेदांची उत्पत्ति वैवस्वतमनूच्या पूर्वींच्या मन्वंतरांत झालेली दिसत नाहीं. वेद प्रथम निर्माण झाले आणि सृष्टि नंतर निर्माण झाली असा वेदांचा सिद्धान्त आहे. सृष्टीची निर्मिति स्वायंभुव मन्वंतराच्या आरंभीं झाली. पण स्वायंभुवापासून चाक्षुष मन्वंतरापर्यंत सृष्टीचें कार्य झाल्यावर जलप्रलय झाले आणि त्यांत वेदांसुध्दां सर्व सृष्टि नष्ट झाली. ती वैवस्वत-मनूनें पुनः पहिल्यापासून उत्पन्न केली. सुप्रसिद्ध जलप्रलयाची कथा वैवस्वत मनूशीं संबद्ध आहे. जलप्रलयानंतर वेद निर्माण झाले. ऋग्वेदांत वैवस्वत मनूखेरीज इतर मनूंचा निर्देश नाहीं. वैवस्वतमनूचे पुत्र नाभाग, दिष्ट, धृष्ट, नृग, शर्याति वगैरेंचीं सूक्तें ऋग्वेदांत आहेत. तींच ऋग्वेदांतील प्राचीन सूक्तें होत. वैवस्वत मनूच्यापूर्वी सध्यांच्या प्रसिद्ध असलेल्या सप्त-

र्षींचा आणि सध्यांच्या वेदांचा पुराणांतील परंपरासंबंध दाखवीत नाहीं. १ स्वायंभुव, २ स्वारोचिष, ३ उत्तम, ४ तामस, ५ रैवत, ६ चाक्षुष हीं सहा मन्वतरें पूर्वीं होऊन गेलेलीं आहेत. त्यांच्यांतील सप्तर्षि, देव, इंद्र, अवतार, मनुपुत्र यांची यादी पुराणापैकीं तेरांत विस्तारपूर्वक दिलेली आढळते. त्यावरून पौराणिकांना परंपरेनें प्राप्त झालेली कांहीं तरी विशेष अशी माहिती होती. ते वेदकालापूर्वींचीहि अत्यंत महत्त्वाची माहिती पुरवतात. त्यांत त्यांनीं अंगिरस, अत्रि, क्रतु, पुलस्त्य, पुलह, मरीचि आणि वसिष्ठ यांना अगदीं प्राचीन ऋषि मानले आहेत. वैवस्वतांत अत्रि, कश्यप, गौतम, जमदग्नि, भरद्वाज, वसिष्ठ व विश्वामित्र यांना सप्तर्षि मानलें आहे. देवगण तर प्रत्येक मनूंत अत्यंत भिन्न आहेत. वैवस्वत मनूंत वैदिक देवतांपैकीं अश्विनी, आदित्य, मरुत्, रुद्र, वसु या देवता आहेत. शिवाय आंगिरस, भृगु व साध्य यांना देव मानलें आहे. इंद्र महाबल असून अवतारापैकीं वामनावतार दिला आहे. ही प्रत्येक मन्वन्तरांतील अधिकाऱ्यांची यादी अत्यंत महत्त्वाची असून त्यांत वैवस्वतमन्वन्तरानंतर सध्यांच्या वेदांची परंपरा सुरू झाली असें स्पष्ट दर्शित केलें आहे. श्वेतवाराहकल्पांतील वैवस्वत मन्वन्तरांत चतुर्युगाच्या अठ्ठाविसाव्या फेऱ्यापैकीं कलियुगांतील युधिष्ठिर शकाचीं आज ५०४६ इतकीं वर्षें झालीं आहेत. यापूर्वींचा काल मंत्रकाल होय. वैवस्वत मनूपासून भारती युध्दापर्यंत ऋग्वेदांतील मंत्राचा काळ होय असें आपण वर सिध्द केलें. कारण त्यानंतरचे व्यासानें संकलित केलेले संहिताग्रंथ शुद्ध स्वरूपांत आज आपणांस मिळतात. त्यापूर्वींच्या कालनिर्णयाचा प्रश्न पुराणांतील वंशावळी सोडवूं शकतात. पुराणें वंश, वंशानुचरित व मन्वन्तर सांगण्याकरितां लिहिलेले ग्रंथ आहेत. माहात्म्याकरितां लिहिलेलीं पुराणें सोडल्यास पुराणांत आश्चर्यकारक एकवाक्यता सांपडते. आणि पुराणांच्या मागें इतिहास संभाळण्याची एक विशेष परंपरा आहे असें आढळून येतें. तिची तपासणी करितां वैवस्वत-

मनूपासून भारतीयुध्दापर्यंत शंभर ते एकशेंदहा पिढ्या इक्ष्वाकुवंशांत आढळतात. सर्वांत मोठा व अधिक पुरुष दिलेला हाच वंश आहे. यांतील आरंभींचा वैवस्वतमनुपुत्र इक्ष्वाकु व शेवटला क्षेमक आणि मधला भारतीयुद्धाच्या वेळचा बृहद्बल हे निश्चित आहेत. मधल्यांचा समकालीन पाहून पुराणांतील सर्व वंशावळींचा मेळ घालतां येतो. व त्यावरून पिढ्या मोजून काळ ठरवितां येतो. पिढी अनेक घराण्यांचे हिशेब करून दहाबारा वर्षांपेक्षां जास्त धरूं नये असें पार्गिटरचें म्हणणें आहे. त्यावरून वैवस्वत मनूपासून बृहद्बलापर्यंत (१००×१०--१०००) सुमारें एक हजार वर्षांचा हा इतिहास आहे असें ठरतें. पिढीचें प्रमाण दुपटीनें किंवा तिपटीनें वाढविल्यास तीन हजार वर्षांपेक्षां हा काळ अधिक होणार नाहीं. भारतीयुध्दपूर्व तीनहजार, युद्धोत्तर ख्रिस्ती शकापर्यंत तीन हजार दोन व त्यानंतरचीं सध्यांचीं १९४४ वर्षे आपल्यापुढें आहेत. त्यापैकीं भारतीयुद्धपूर्वकाळ हा ऋग्वेदमंत्रकाळ होय. ही विचारसरणी पार्गिटर, सीतानाथ प्रधान यांनीं आपल्या ग्रंथांत[१] व आम्हीं प्राचीन चरित्रकोशांत मांडली आहे.

यावर पुराणांत सर्व पिढ्या दिलेल्या नाहींत, असें खुद्द पुराणेंच सांगतात, हा मोठा दोष आहे. त्यामुळें ही विचारसरणी सरळ असूनहि सर्वस्वीं ग्राह्य होत नाहीं. तथापि त्यावरून कालानुक्रम बरोबर समजतो. आणि पूर्वापर क्रम उलगडल्यानें कार्यकारणप्रतिपादन करणें सुलभ होतें. या दृष्टीनें पुराणें आणि त्यांतील इतिहास हा अत्यंत महत्त्वाचा आहे यांत शंका नाहीं.

### ५ दासांचा ऋग्वेदमंत्ररचनेचा काळ ( ख्रि. पू. २५००० )

सरस्वती नदी समुद्रास मिळते असा ऋग्वेदांत उल्लेख आहे.[१] तसेंच सरस्वती व शुतुद्रि ( सतलज ) या दोन्ही नद्या समुद्रास मिळत असल्याचा दुसऱ्या ठिकाणीं निर्देश आहे.[२] हल्लीं सरस्वती नदी वाळवंटांत गुप्त

१ सरस्वती आ समुद्रात् ऋ. ७.९५.२, २ ऋ. ३.३३.२.

झाली आहे हें प्रयाग येथें त्रिवेणीसंगमावर आपणांस प्रत्यक्ष पाहावयास मिळतें. आणि सतलज नदी सिंधूस मिळते. तेव्हां ऋग्वेदकालीं राजपुतान्याचे जागीं समुद्र असला पाहिजे हें उघड होतें. राजपुताना हा वालुकामय प्रदेश आहे आणि जगांतील वालुकामय प्रदेश पूर्वी समुद्राच्या पाण्याखालीं असले पाहिजेत आणि त्यामुळें सरस्वती व शुतुद्रि या दोन्ही नद्या ऋग्वेदकालीं समुद्रास मिळत होत्या. भूस्तरशास्त्रांत या गोष्टींचें शास्त्रशुद्ध विवेचन पाहावयास मिळतें. त्या वेळीं पंजाबची हवाहि अतिशय थंड होती. हा काळ खि. पू. ५०००० ते २५००० वर्षांचा होय. तेव्हां ऋग्वेदकाल खि. पू. २५००० वर्षांपूर्वी तरी धरावयास पाहिजे, असें ऋग्वेदांतील वचनांवरूनच डॉ. अविनाशचंद्र दास यानीं आपल्या 'ऋग्वेदिक इंडिया' ग्रंथांत प्रतिपादन केलें आहे.

**६ टिळकांचा ऋग्वेदमंत्ररचनेचा काळ** ( खि. पू. ६०००ते४००० )

दिवस, रात्र, पक्ष, महिना व वर्ष ही कालगणना सूर्यचंद्रांमुळें निर्माण होते आणि तिचा आपण उपयोग करतों. पण शतकाहून मोठी कालगणना मोजण्यास यापेक्षां संपातबिंदूची पद्धति चांगली उपयोगी पडते.

भूमध्यरेषा व क्रान्तिवृत्त यांना सांधणाऱ्या बिंदूस संपात म्हणतात. हा चल आहे. हे संपात दोन आहेत; एक वसंतसंपात व दुसरा शिशिरसंपात होय. वसंतसंपाताचें क्रान्तिवृत्तावरील एक संपूर्ण वर्तुळ ढोकळमानानें २६००० वर्षांत संपूर्ण होतें. आणि निरनिराळ्या नक्षत्रांवरील त्यांच्या गतीवरून कालगतीचीं लहान प्रमाणें उपलब्ध होतात.

संपातबिंदु हे क्रान्तिवृत्ताच्या उलटगतीनें बदलत असतात. हल्लीं वसंतसंपात उत्तराभाद्रपदा नक्षत्राच्या मागें आहे. एकामागून एक नक्षत्रांतून तो या ठिकाणीं आला आहे. म्हणजे तो पूर्वी क्रमानें मागें उत्तराभाद्रपदा, रेवती, अश्विनी, भरणी, कृत्तिका, रोहिणी, मृगशीर्ष इत्यादि नक्षत्रांत होता.

वसंतसंपात अश्विनी व कृत्तिका नक्षत्रांत असल्याचे स्पष्ट उल्लेख संस्कृत वाङ्मयांत आहेत. संपातबिंदु नक्षत्रावरून मागें मागें जाण्यानें ऋतुहि मागें मागें जात असतात. प्राचीन संस्कृतवाङ्मयाच्या काळापेक्षां सध्यां ऋतु एक महिना मागें सरकले आहेत.

वैदिकांनीं क्रान्तिवृत्त २७ नक्षत्रांत विभागलें आहे. ३६०÷२७= १३$\frac{१}{२}$ अंशांचें प्रत्येक नक्षत्र आहे. संपातबिंदु एक अंश मागें जाण्यास जवळजवळ ७२ वर्षें लागतात. म्हणजे ७२×१३$\frac{१}{२}$ =९६० वर्षें सामान्यतः संपातबिंदु एक नक्षत्र मागें जाण्याला लागतात. या गणनेप्रमाणें संपातबिंदूच्या हल्लींच्या स्थितीवरून कृत्तिकानक्षत्रांत संपातबिंदु असण्यास किती काळ लागेल हें काढतां येईल. हा काळ ( ९६०×५=४८००–१९४४=२८५६ ) या हिशेबानें सुमारें खि. पू. २५०० हा शतपथब्राह्मणाचा काल होय.

वसंतसंपात मृगशीर्ष नक्षत्रांत असल्याचे अनेक संदर्भ ऋग्वेदांत आढळतात. त्यामुळेंच मृगशीर्ष नक्षत्रास ' आग्रहायण ' ( अग्र + हायन = वर्षारंभींचें नक्षत्र) अशी संज्ञा वैदिक ग्रंथात आढळते. त्या वेळीं नक्षत्रांचीं यादी अश्विनी, भरणी अशी सुरू न होतां मृग नक्षत्रापासून सुरू होत असली पाहिजे.

' फल्गुनी पौर्णिमा हें वर्षाचें मुख आहे ' असें विधान तैत्तिरीयसंहितेंत आलें आहे. असेंच विधान इतरहि ब्राह्मणग्रंथांत आलें आहे. त्यावरून दक्षिणायनाचा शेवट फल्गुनी नक्षत्रांत होत असतांना वर्षारंभ होत असे. ज्याअर्थी त्या वेळीं फाल्गुनी पौर्णिमेस वर्षारंभ असे, त्याअर्थी वसंतसंपात मृगशीर्षांत असला पाहिजे. ' आग्रहायण ' शब्द त्या कल्पनेला अत्यंत पोषक आहे.

---

१. एताः ( कृत्तिकाः ) ह वै प्राच्यै दिशो न च्यवन्ते । सर्वाणि ह वा अन्यानि नक्षत्राणि प्राच्यै दिशश्च्यवन्ते ॥ श.ब्रा. २-१-२-३

' आग्रहायण ' हें नांव ' ओरायण ' अशा स्वरूपांत ग्रीक वाङ्मयांत आढळतें. रुद्रानें प्रजापतीचा शिरच्छेद केल्याची व इंद्रानें हरिणरूपी वृत्राचा शिरच्छेद केल्याची कथा या वसंतसंपात मृगशीर्षांत असल्याच्या सूचक आहेत.

ग्रीक वाङ्मयांतहि ' अपोलो' नें ' ओरायन ' चा शिरच्छेद केल्याची कथा आली आहे. मृगशीर्ष नक्षत्राच्या ताऱ्यांवर या कथांची उभारणी झाली आहे. हा पडताळा महत्वाचा आहे. कारण ग्रीक लोक हे पार्श्यां-प्रमाणें व पार्श्यांच्या पूर्वीच वैदिकांतून निघून ग्रीसमध्यें गेलेले आहेत.

कृत्तिका नक्षत्रापासून मृगशीर्ष तिसरें आहे. म्हणजे दोन नक्षत्रें अन्तर वाढलें. तेव्हां ९६० × २=१९२० वर्षें मागील खि. पू. २५०० मध्यें मिळविलीं असतां ठोकळ मानानें खि. पू.४५०० वर्षें हा काळ निघतो. हा लो. टिळकांनीं आपल्या मृगशीर्ष ( ओरायन ) नांवाच्या ग्रंथांत ठर-विलेला ऋग्वेदांतील मंत्रांचा काळ होय.

वसंतसंपात पुनर्वसुनक्षत्रांत असल्याचें वैदिकांना माहित होतें, असें तैत्तिरीय संहितेंतील चित्रापौर्णिमेच्या निर्देशावरून वाटतें. पुनर्वसुनक्ष-त्राची अदिति ही देवता आहे. सूर्य पुनर्वसुनक्षत्रांतून उत्तर गोलार्धांत आला व त्यामुळें देवयान सुरू झालें, ही वस्तुस्थिति देवमाता अदितीच्या कथेशीं बरोबर जुळते. आर्य संस्कृतीचा सर्वांत प्राचीन काळ म्हणजे अदितिकाळ म्हणतां येईल व तो ठोकळ मानानें खि. पू. ६०००--४००० असा सांगतां येईल.

पण लो. टिळकांनीं त्याज्य ठरविलेल्या काळगणनापद्धतीनेंहि त्यांच्या या कालनिर्णयास कसा आश्चर्यकारक दुजोरा मिळतो हें थोडक्यांत पुढें दाखविलें आहे. वैवस्वत मन्वन्तरातील सत्तावीस चतुर्युगें आतां संपून अठ्ठाविसाव्या चतुर्युगांतील तीन युगें संपून कलीचीं आतां ५०४६ वर्षें गेलीं. कलियुग सुरू होतांना आणि द्वापार संपतांना प्रत्येक चतुर्युगांत वेगळा व्यास निर्माण

होतो आणि तो उपलब्ध असणाऱ्या वेदमंत्रांची, संहितादि ग्रंथरूपानें बांधणी करून लोकांना सोयीस्कर पडेल अशी विभागणी करतो. सध्यां आपल्या हातांत असणाऱ्या वेदाच्या संहिता कृष्णद्वैपायन व्यासानें संस्कार केलेल्या आहेत. त्याचा काळ आपल्या संकल्पांतील आणि पौराणिक काळगणने-प्रमाणें गतकलि ५०४६ येतो. यांत स. १९४४ वर्षें वजा घातलीं म्हणजे ख्रि. पू. ३१०२ हा काळ येतो. या वेळेपर्यंत मंत्ररचना चालू असते. व्यास प्रत्येक चतुर्युगांत वेगळा होतो आणि तो उपलब्ध असणाऱ्या वेदमंत्रांच्या संहिता तयार करतो. ही पुराणांनीं प्रतिपादलेली गोष्ट लक्षात आल्याबरोबर लो. टिळकांच्या ऋग्वेदकालास पौराणिक मताची आश्चर्यकारक संमति लाभते.

**७ दाशराज्ञ युद्धाचा ( मंत्रकाल ) काल** (ख्रि. पू. ४००२ वर्षें सुमारें )

ऋग्वेदाचा काल निश्चित करण्यास अगदीं एक नवें गमक मराठी ज्ञान-कोशांत पुढें करण्यांत आलें आहे. तें ऋग्वेदांत निर्दिष्ट केलेलें दाशराज्ञ-युद्ध हें होय ( ऋ. ७. १८. ३३ ). ' दाशराज्ञयुद्ध' या शब्दाचा अर्थ दहा राजांचें युद्ध असला तरी, त्यांत दहा शब्दाचा पुष्कळ राजे असाच अर्थ घ्यावयास पाहिजे. नांवाबद्दल कितीहि मतभेद असला तरी त्या युद्धांत दहापेक्षां अधिक राजांचा समावेश झालेला स्पष्ट दिसतो. पैजवन सुदासाचें हे तीस राजांशीं युद्ध झालें. शिम्यु, अनु, द्रुह्य, भृगु, यदु, तुर्वश, मत्स्य, पक्थ, भलानस, भेद, वैकर्ण, यक्षु, शिग्रु, श्रुत, मन्यु, पृथु, वैकर्ण, याद्व, अलिन, शिव व विषाणिन् इत्यादि ते राजे होत.

हें युद्ध परुष्णी नदीच्या कांठीं झालें. तृत्सु भरत हे सुदासाचे अनुयायी होते. प्रथम विश्वामित्र हा पैजवन सुदासाचा पुरोहित होता. परंतु ती जागा पुढें वसिष्ठानें घेतली. विश्वामित्र उलट बाजूला जाऊन मिळाला. पुरोहित हा त्या वेळीं राजाच्या मंत्र्यासारखा असे. वसिष्ठामुळें सुदासाला इंद्राचें साहाय्य मिळालें. सुदास परुष्णी नदी तरून गेला. तुर्वशांनीं त्यांचा

पाठलाग करण्याचा प्रयत्न केला पण ते नदींत बुडाले. या युद्धांत सहा हजार द्रुह्य व सहाशें अनु ठार झाले.

ऋग्वेदांतल्या दाही मंडळांत आणि अनेक सूक्तांत या युध्दाचा प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष निर्देश आहे. इंद्रानें सुदासाला मदत केली तशी आम्हांला मदत करावी अशीहि पुष्कळ सूक्तांत प्रार्थना आहे. त्यावरून ऋग्वेदसंहितेंत आलेल्या मंत्रांपैकीं पुष्कळच मंत्रांची रचना या युध्दानंतर झालेली आहे, हें स्पष्ट होतें. आणि ऋग्वेदसूक्तांचा काळ ठरविण्याला त्याची फार मदत होते.

भारतीयुध्दापूर्वी सुमारें तीस पिढ्या हें युध्द झालें ( ३० × ३० = ९०० – ३१०२ = ख्रि. पू. ४००२ ) त्या वेळीं उत्तरपांचालांतील राजवंशांत सुदास, दिवोदास वगैरे सुप्रसिध्द व्यक्ति होत्या. त्यांनीं निपाट्शुतुद्रि ( रावी-सतलज ) संगमापासून यमुनेपर्यंत अनेक राजांना तोंड देऊन आपलें साम्राज्य स्थापन केलें. ही घटना ऋग्वेदसूक्तांच्या रचनेच्या वेळीं सर्वांच्या डोळ्यांपुढें असल्यानें वारंवार त्या घटनेचा उल्लेख आला आहे. त्यानंतर बहुतेक ऋग्वेद रचला गेला. त्या वेळेपासून भारतीयुध्दाच्या अखेरपर्यंत आर्यावर्तांत पांचालांचें वर्चस्व होतें. त्यामुळें वैदिक वाङ्मयांत पांचालांचा वारंवार उल्लेख येतो. ऋग्वेदी ब्राह्मणांच्या रोजच्या ब्रह्मयज्ञांतील तर्पणांत येणारा बाभ्रव्य पांचाल राजाच ऋग्वेदाचा क्रमकार आहे.

**८ ऋग्वेदसंहितेचा पौराणिक मतानें काळ** ( ख्रि. पू. ३००२ )—

ख्रि. पू. ३००२ या वर्षी भारतीय युध्द संपून युधिष्ठिराचा जय झाला, आणि इंद्रप्रस्थ येथें त्याला राज्याभिषेक करण्यांत आला. तेव्हां युधिष्ठिरशक सुरू झाला. तो आजपर्यंत पंचांगांत वापरण्याची चाल आहे. युधिष्ठिरशक चालू झाला त्या वेळीं कृष्णद्वैपायन व्यास हे पीठावर होते. यांनीं वेदांचे सध्यां उपलब्ध असणारे ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद व अथर्व-

वेद असे विभाग करून त्यांच्या संहिता बनविल्या. वैदिक मंत्र पूर्वीच तयार होते. त्यांची फक्त सध्यां उपलब्ध होणारी पृथक्करणात्मक विभागणी त्यांनीं केली. म्हणजे मंत्रांचा काळ त्यापूर्वी वेगवेगळा असला तरी संहितांचा अगर समान महत्त्वाचे मंत्र एकएका वेदांत एकत्र करण्याचा काळ हा होय. त्यानंतर या संहिताग्रंथांत नव्या मंत्रांचा समावेश करणें अशक्य झालें. पोटशाखा आणि ब्राह्मणादि ग्रंथांचें स्वरूपहि यानंतर पक्कें करण्यास सुरवात झाली. आणि क्रमानें तें कामहि लवकरच पूर्ण करण्यांत आलें. संहिताग्रंथांत परंपरा टिकविण्याकरितां झालेल्या प्रयत्नांचा विशेष निर्देश नाहीं. पण ब्राह्मणादि ग्रंथांत गुरुशिष्यपरंपरा देऊन परंपरेलाहि महत्त्व दिलेलें आहे. त्यावरून भारतीयुध्दानंतर संहिता ग्रंथ झाले. आणि त्यानंतर ब्राह्मणादि उपनिषदान्त ग्रंथ पक्के करण्यांत आले. संहितेनंतर अमुक इतक्या पिढ्यांत उपनिषदान्त ग्रंथ झाले असें त्या ग्रंथांत दिलेल्या शिष्यपरंपरेवरून ठरतें.

संहिताकाल कोणता हें ठरविल्यानें त्यापूर्वीचा मंत्रकाळ होय हें स्पष्ट होतें. पौराणिक प्रतिपादनाप्रमाणें प्रत्येक द्वापाराच्या शेवटीं व्यास उत्पन्न होऊन तो वेदांची संहितात्मक रचना करतो आणि नंतर कलियुग सुरू होतें. द्वापारयुग संपून कलियुगाची सुरवात युधिष्ठिरशकानें मानण्यांत येते. कौरवपांडवांत भारतीयुध्द होऊन युधिष्ठिराला राज्याभिषेक झाला आणि युधिष्ठिरशक सुरू करण्यांत आला. या सर्व वेळीं कृष्णद्वैपायन व्यास प्रत्यक्ष उपस्थित होते. खि. पू. ३००२ हा तो काळ होय. त्यापूर्वी मंत्ररचना झाली. आणि वरील युधिष्ठिरशकाच्या सुमारास संहिताग्रंथ झाले. लो. टिळकांच्या ज्योतिषविषयक शोधानींहि हाच काळ येतो.

---

प्रकरण ४ थें

# वैदिक ग्रंथांचा परिचय

पैं अहितापासुनि काढिती । हित देऊनि वाढविती ॥
नाहीं श्रुतीपरौती । माउली जगा ॥ —ज्ञाने. १६-४६२

## १ ऋग्वेदपरिचय—

आपण आपणांस 'ऋग्वेदी' ब्राह्मण म्हणवून घेतों. ऋग्वेद नांवाच्या सुप्रसिद्ध ग्रंथाचे अनुयायी म्हणून आपण ऋग्वेदी असें विशेषण आपणांला लावून घेतलें आहे. याप्रमाणेंच यजुर्वेदाचे अनुयायी 'यजुर्वेदी', सामवेदाचे 'सामवेदी' आणि अथर्ववेदाचे अनुयायी 'अथर्ववेदी' होत. या सर्वच वेदांचा थोडक्यांत परिचय आपणांस असला पाहिजे. त्यांचें महत्त्व आपण कधींहि विसरतां उपयोगी नाहीं. त्यांपैकीं ऋग्वेदाची थोडक्यांत अन्तर्बाह्य माहिती पुढें देण्यांत येत आहे.

आपण 'ऋग्वेदी' म्हणून ऋग्वेदाची माहिती प्रथम देण्यांत येत आहे, असें नाहीं. 'ऋग्वेद' हा जगांतील पहिला आद्वितीय ग्रंथ आहे. त्याच्यापेक्षां जुना तर राहोच, पण समकालीनसुद्धां असलेला एकहि ग्रंथ जगांत नाहीं. आपली व आपल्या पूर्वजांची अशी दृढ श्रद्धा आहे कीं, वेद अपौरुषेय आणि अनादि आहेत. जुन्या आणि नव्या शास्त्रज्ञांना अनेक प्रकारें संशोधन करूनहि हे ग्रंथ आदि न सांगतां येण्याइतपत प्राचीन आणि ईश्वरप्रणीत म्हणण्याइतपत अगाध ज्ञानाचे भांडार आहेत असेंच म्हणावें लागतें.

इतर धर्मांच्या ग्रंथांप्रमाणें हे ग्रंथ एका व्यक्तीनें केलेले नाहींत. ऋग्वेदांत एक हजार अठावीस लहानमोठीं सूक्तें आहेत. सूक्तें म्हणजे भक्तिभावानें म्हटलेलीं ईश्वराविषयक कवनें होत. हीं सूक्तें साधुसंतांच्या अभंगां-

प्रमाणें असून त्यांत अन्तःकरणाची तळमळ ओतप्रोत भरलेली आहे. त्यांत कोणत्याहि तत्त्वाचा किंवा मताचा आग्रह नाहीं. किंवा आपल्याशिवाय ज्ञान सांगण्याचा अधिकार नसल्याचा देखावाहि त्यांत केलेला नाहीं. नीति, धर्म आणि ज्ञान यांचा निर्मळ प्रवाह त्यांच्या वर्णनशैलींत अनुभवास येतो. ज्ञानाचा संग्रह करण्यास आणि तें आपलें ज्ञान तपासून घेण्यास ते सतत विनयपूर्वक तत्पर दिसतात.

त्या सूक्तकर्त्यांत वसिष्ठ-वामदेवांसारखे साक्षात्कारी पुरुष आहेत. त्या-प्रमाणेंच रोमशा, लोपामुद्रा, अपाला, विश्ववारा, शाश्वती, इंद्रसेना वगैरे लहानमोठ्या घराण्यांतील स्त्रियाहि आहेत. मनु, ययाति यांसारखे मोठाले क्षत्रिय राजे आहेत. तसेंच कवष ऐलूष, पणी, बृबु, तक्षन् वगैरे सारखे जातीनें हलके समजलेले लोकहि आहेत. उच्च विचार कोठूनहि येवोत त्याचें त्यांनीं अन्तःकरणपूर्वक स्वागत केलेलें आहे, असें दिसून येतें. श्रद्धा आणि चिकित्सा यांचा मनोहर संगम त्यांच्या सूक्तांत अनुभवास येतो.

अनुभव आणि साक्षात्कार यावर त्यांची विचारसरणी उभारलेली आहे. अन्तिम सत्याचा शोध करतांना साक्षात्काराशिवाय त्यांचें समाधान होत नाहीं. शाब्दिक लटपटीला त्यांच्याजवळ वाव नाहीं. निर्मळ आणि साध्या भाषेंत स्पष्ट आणि ठसठशीत बोलण्याची त्यांची पद्धत आहे. त्यामुळें उच्च पातळीवर गेलेल्या हजारों महात्म्यांचे प्रांजल अनुभव म्हणजे वेद होत असें म्हणावें लागतें.

ऋग्वेदांत एकाच देवतेचीं सूक्तें नाहींत. त्यांत अग्नि, इंद्र, वरुण, मरुत्, पूषन्, अश्विनी, उषा वगैरे अनेक देवतांचीं सूक्तें आढळतात. विविध देवतांचीं सूक्तें वाचत असतांना परस्परविरोधाचा किंवा स्पर्धेचा तेथें गंधहि आढळत नाहीं. वेगळाल्या अधिकाराचे लोक आपले ईश्वरविषयक अनुभव त्यांत नमूद करतांना आढळतात. त्यामुळें कोणत्याहि अधि-काराच्या माणसाला ऋग्वेद वाचतांना निराश होऊन विन्मुख होण्याचा

प्रसंग येत नाहीं. सर्वांभूतीं परमेश्वर पाहाणाऱ्या महात्म्यापासून ऐहिक ऐश्वर्याकरितां हपापलेल्या व्यवहारी माणसापर्यंत सर्वांचें समाधान करण्याची शक्ति ऋग्वेदांत हजारों वर्षांपासून आहे. म्हणून हे वेद ' विश्वतोमुख ' आहेत. ' त्यांचा अमकाच अर्थ आहे, असें सांगण्याची शक्ति आमच्यांत नाहीं. ' असें जयतीर्थासारख्या बृहस्पतीला प्रांजलपणें कबूल करावें लागलें.

ऋग्वेदासारख्या ग्रंथाचें अनादि आणि व्यापक तत्त्वज्ञान अनन्त असल्यामुळेंच कालहि त्याला धक्का लावूं शकत नाहीं. कालाच्या ओघांत मोठमोठालीं साम्राज्यें मुळासकट उखडलीं जाऊन नांवानें सुद्धां शिल्लक राहिलीं नाहींत. अनेक तत्त्वज्ञानी उदयास आले आणि निस्तेजहि झाले. युगप्रवर्तक समजल्या जाणाऱ्या धर्मग्रंथांचें आकर्षक स्वरूपहि फार काळपर्यंत लोकांचें लक्ष वेधून घेऊं शकलें नाहीं. आणि आमचे वैदिक ग्रंथ मात्र कालाच्या ओघांत निस्तेज होऊं शकत नाहींत याचें कारण शोधलें पाहिजे; आणि त्यांतील मुख्य कारण म्हणजे नवीन कालांत उत्पन्न होणाऱ्या आधिभौतिक शोधांपुढें टिकण्याची शक्ति असणें हें आहे. संकुचित पायावर उभारणी असल्यानें ज्ञानाच्या नव्या प्रकाशांत इतर धर्मांचें तत्त्वज्ञान फिकें पडलें आणि आधिभौतिक शोधांनीं तर त्यांना जगांतून कायमचें उठवलें. वैदिक तत्त्वज्ञानाची उभारणी मूलग्राही पद्धतीवर आहे. मनुष्यस्वभाव आणि मानव प्राण्याच्या संकुचित ज्ञानाचा उथळपणा त्यांनीं केव्हांहि दृष्टिआड केलेला नाहीं. ज्ञान हें अमर्याद असून मनुष्यप्राण्याच्या अनुभवालाहि मर्यादा घालतां येत नाहीं. लहानथोरांचे अनुभव जसे लक्षांत घेणें आवश्यक आहे, त्याप्रमाणेंच जुन्या अनुभवांबरोबर नव्या अनुभवांनाहि सन्मानानें जागा राखून ठेवली पाहिजे. एवढी व्यापक भूमिका ऋग्वेदसंहितेंत व इतर वैदिक ग्रंथांत स्वीकारलेली आहे. म्हणूनच संहिताग्रंथांपासून उपनिषद्ग्रंथांपर्यंत वैदिक-

ग्रंथांची वाढ झाली आणि पुढेंहि प्रत्येक तत्त्वज्ञानाच्या तत्त्वज्ञानाला आणि अनुभवाला वैदिक धर्मांत मानाचें स्थान राखून ठेवलेलें आहे. त्यामुळें अनादि कालापासून वैदिक धर्माची परंपरा रक्षण करण्यांत आली आणि युगानुयुगें या व्यापक आणि मानव धर्माला कोणीहि धक्का लावूं शकणार नाहीं. हिमालयांतून निर्मळ पाण्याचा अखंड प्रवाह गंगेच्या रूपानें जोंपर्यंत वाहत आहे, तोंपर्यंत त्रैलोक्याला पावन करण्याची गंगेची शक्ति कितीहि अशुद्ध प्रवाह मिसळल्यानें कमी होत नाहीं; त्याप्रमाणें जुनें जागतिक आणि व्यापक धोरण सुटलें नाहीं तोंपर्यंत कितीहि नव्या अडचणी उत्पन्न झाल्या तरी वैदिक धर्माच्या उच्चतेला धोका नाहीं. सोन्याप्रमाणें वैदिक धर्म सर्व चिकित्सांचें आणि परीक्षांचें नेहमी स्वागतच करीत आलेला आहे.

अशा ऋग्वेदांत अनेक संवाद आहेत. त्यापैकीं अगस्त्यलोपामुद्रा-संवाद, यमयमीसंवाद व उर्वशीपुरुरवासंवाद फारच महत्त्वाचे मानण्यांत येतात. अनेक कथाउपकथांचा ऋग्वेदांत निर्देश आहे. त्यापैकीं बऱ्याच कथाउपकथांचा अद्यापि उलगडा झालेला नाहीं. अद्यापि ज्यांचा अर्थ लागलेला नाहीं अशा ऋचासुद्धां ऋग्वेदांत पुष्कळ शिल्लक आहेत. पुष्कळ शब्दांच्या मुळाशीं काय कल्पना आहे याचाहि अद्यापि नीट उलगडा होत नाहीं. त्यामुळें ऋग्वेदाचें वाचन संगतवार वाटत नाहीं. ही स्थिति आज तीन हजार वर्षांपासूनची आहे. निरुक्तकार यास्काच्या वेळींहि ऋग्वेदाचा अर्थ दुर्बोध झाला असें स्पष्ट दिसतें. त्यांतील देवतांच्या बाबत सुद्धां कांहीं ठिकाणीं अशीच स्थिति आहे. उदाहरणार्थ अश्विनौ ही काय देवता आहे याची नीटशी कल्पना अद्यापि येत नाहीं. आधुनिक संशोधकांच्या अभ्यासामुळें कांहीं ठिकाणीं नवा प्रकाश पडत आहे, पण अजून फार प्रयत्नांची अपेक्षा आहे.

या सूक्तांतून राजकीय व तत्त्वज्ञान वगैरेंची माहिती वर्णनाच्या ओघांत

कशी मिळते ती पहा.

राजा व प्रजा—

राजा व प्रजा यांचे संबंध कसे होते, हें समजण्यास कांहीं गमकें आहेत. दहाव्या मंडलांत राजकीय परिस्थितीची कल्पना देणारीं दोन सूक्तें आहेत ( १७३, १७४ ). त्यावरून राजासंबंधीं काय कल्पना असेल, हें समजून येतें. राष्ट्राच्या संरक्षणाची जबाबदारी राजावर आहे. राजाला जर कसली मोंठी भीति असेल तर ती राज्य सोडावें लागण्याचीच. यावरून लोकांविरुद्ध वागल्यास त्याला पदच्युत व्हावें लागे. यावरून लोकांचाहि अधिकार व्यक्त होतो. शत्रूचा पाडाव करतां येणें हा राजाचा मुख्य गुण दिसतो. राज्याभिषेकाची पद्धति दिसते. राजाची आदर्शदेवता इंद्र असावी. ‘ विशस्त्वा सर्वा वांच्छन्तु ’ सर्व लोक तुझी इच्छा करोत अशी राजाविषयीं भावना व्यक्त केली आहे. राजा लोकांना हवासा वाटला पाहिजे. तसेंच राजापासून लोकांची अपेक्षा ‘ इह राष्ट्रमुधारय ’ ( १०· १७३. २ ) या शब्दांनीं व्यक्त केली आहे. येथें राष्ट्र शब्द वापरला आहे. राजाचें काम राष्ट्रांतील व्यक्तींच्या गुणाचा विकास करणें, ही भावना या शब्दांनीं व्यक्त केलेली दिसते. दुसऱ्या एका ठिकाणीं ‘ बहुपाय्ये स्वराज्ये यतेमहि ’ ( ऋ. ५,६६.६ ) असें सुंदर आणि स्पष्टार्थक वाक्य आहे. त्यांतील स्वराज्य शब्दाचा अर्थ आपल्या मनांत अपेक्षित असलेलाच दिसतो. पण त्यापेक्षां ‘ बहुपाय्ये ’ हें स्वराज्य शब्दाचें विशेषण फार महत्वाचें आहे. त्याचा सायणाचार्यांनीं ‘ बहुभिः पालनीये ’ असा अर्थ केला आहे. यावरून अनेकांच्या मतानें चालणारें लोकसत्ताक राज्य असा या शब्दाचा अर्थ ठरतो. ऋग्वेदाच्या शेवटीं जे राष्ट्रीय प्रार्थनेचे मंत्र आहेत, त्यांत ‘ समानो मंत्रः समितिः समानी ’ अशी प्रार्थना आहे. त्यावरून अगदीं सध्यांच्या पद्धतीची लोकसत्ता त्या वेळीं नसली तरी लोकांची सत्ता चांगलीच वर्चस्व गाजवीत असावी, केवळ व्यक्तितंत्र राज्याला तितकासा वाव

नसावा असें दिसतें. राजा हा प्रजेपासून कर घेत असे, असें 'बलिहृतः' या शब्दावरून दिसतें. लोकांचा दाब असे तरी राज्य करणारे वंशपरंपरेनें असलेले आढळतात. पुरोहित हा राजाचा प्रधान असे. तो आपल्या सर्व प्रकारच्या सामर्थ्यांचा राजाला उपयोग करून देई. राजा त्यांना बदलीत असे. वसिष्ठ, विश्वामित्र हे वेगळाल्या पक्षाकडे असलेले दिसतात.

तत्त्वज्ञान—

तत्त्वज्ञानविषयक बरींच सूक्तें ऋग्वेदांत आलीं आहेत. त्यापैकीं विशेष वाटणाऱ्या कल्पना पुढें नमूद केल्या आहेत. जगाच्या मुळाशीं अविनाशी असें एकच तत्व असून त्यापासून हा सर्व नामरूपात्मक प्रपंच उत्पन्न झाला आहे. त्या अमर तत्वालाच अग्नि, इंद्र, यम, मातरिश्वा इत्यादि अनेक नांवांनीं शहाणे लोक संबोधितात. हा सिद्धान्त वैदिक मंत्रांत वारंवार उच्चारलेला दिसतो.[1] तसेंच हें सर्व जग कशापासून उत्पन्न झालें, आणि त्याकरितां साधनें कोणतीं घेतलीं यासंबंधींची त्यांची जिज्ञासा सतत जागृत असे.[2] सत् आणि असत् शब्द उपनिषदांतील वाक्याप्रमाणेंच एका अर्थानें वापरलेले आढळतात. असे तत्वज्ञानाच्या अगदीं खोलांतील विचार सहज व्यक्त झालेले आहेत. तसेंच जीव आणि शिव यांचें स्वरूप स्पष्ट करणारा सुप्रसिद्ध मंत्रहि आढळतो. कर्ममार्गाच्या प्रक्रियेंतील ऋत्विज, यज्ञपात्रें, सोम, हवन या गोष्टीहि मधून मधून आलेल्या आहेत. उपासनेच्या दृष्टीनें विचार केल्यास तुकारामादिकांच्या अभंगांप्रमाणें ही सर्व संहिता अनेक महर्षींच्या

१ एकं सद् विप्रा बहुधा वदन्त्यग्निं यमं मातरिश्वानमाहुः। १·१६४·४६
सुपर्णं विप्राः कवयो वचोभिरेकं सन्तं बहुधा कल्पयन्ति। १०·११४·५.

२ को अद्धा वेद क इह प्रवोचत् कुत आजाता कुत इयं विसृष्टिः।
अर्वाग्देवा अस्य विसर्जनेनाथा को वेद यत आबभूव॥ १०·१२९·६.
किं स्विद्वनं क उ स वृक्ष आस यतो द्यावापृथ्वी निष्टतक्षुः। १०·३१·७.

भक्तिपूर्ण स्तोत्रांनीं भरलेली आहे. फार काय, नाममाहात्म्यहि वर्णन केलेलें आढळतें. खालीं दिलेला पहिला मंत्र आद्यशंकराचार्यांनीं विष्णुसहस्रनाम-भाष्यांत नाममाहात्म्यपर म्हणूनच दिलेला आहे.[1]

२ ऐतरेय ब्राह्मण परिचय—

मंत्र आणि ब्राह्मण असे वेदाचे दोन भाग आहेत. मंत्रात्मक भागाला संहिता म्हणतात. आणि गद्यात्मक भागाला ब्राह्मण असें म्हणतात. मंत्र म्हणजे छंदोबद्ध भाग होय. त्यालाच ऋच् किंवा ऋचा असें म्हणतात. त्या मंत्र किंवा ऋचा यांना बोलणारा ब्रह्म असा शब्द आहे. त्या ब्रह्मा-संबंधीं विवेचन करणारा जो ग्रंथ त्यास ब्राह्मण असें म्हणतात. संहिता-ग्रंथांत एकत्र असलेल्या मंत्रांचा अर्थ किंवा उपयोग करणाऱ्या ग्रंथांस 'ब्राह्मण' असें म्हणतात. असे ऋग्वेदाचे दोन ब्राह्मणग्रंथ आज उपलब्ध आहेत. त्यांपैकीं एक 'ऐतरेयब्राह्मण' आणि दुसरा 'कौषीतकी ब्राह्मण.' कौषीतकी ब्राह्मणास 'सांख्यायनब्राह्मण' असें दुसरें नांव आहे. याशिवाय आणखीहि ब्राह्मणग्रंथ असले तरी ते आज उपलब्ध नाहींत.

ब्राह्मण ग्रंथांचा मूळ आधार वेदमंत्र आहेत. मंत्रांशिवाय ब्राह्मणग्रंथ असूं शकत नाहीं. म्हणजे प्रथम वेदमंत्र आणि नंतर त्या आधारावर झालेले ब्राह्मणग्रंथ होत. यावरून मंत्रांचा काल प्रथम आणि ब्राह्मण-ग्रंथांचा नंतर ही गोष्ट स्पष्ट होते.

मंत्रांचा उपयोग यज्ञकर्मांत करण्याची आणि त्या दृष्टीनें त्यांचें स्पष्टी-करण करण्याची पद्धत परंपरेनें चालू होती. मंत्रांचे संग्रह करून संहिता तयार करण्यांत आल्यावर महिदास ऐतरेयानें मंत्रांचें कर्मकाण्डविषयक स्पष्टीकरण एकत्र करून 'ऐतरेयब्राह्मण' तयार केला आणि आध्यात्मिक

[1] तमु स्तोतारः पूर्व्यं यथा विद ऋतस्य गर्भं जनुषा पिपर्तन । आस्य जानन्तो नाम चिद्विवक्तन महस्ते विष्णो सुमतिं भजामहे ॥ १·१५६·३ मनामहे चारु देवस्य नाम । १·२४·१-२.

स्पष्टीकरण एकत्र करून ' ऐतरेयआरण्यक ' तयार केलें. ऐतरेय आरण्यक आणि ऐतरेयउपनिषद् हे ग्रंथहि याचेच होत व ते ब्राह्मणग्रंथान्तर्गत असले तरी विषयभेदामुळें स्वतंत्र मानले जातात. ब्राह्मणग्रंथांचा विषय यज्ञसंबंधीं कर्मकांड, आरण्यकाचा विषय सृष्टीचें मूळकारण ब्रह्म, त्यापासून सृष्टीची उत्पत्ति आणि ब्रह्मस्वरूप हें प्रतिपादन करणें हें आहे. त्यांपैकीं ऐतरेयब्राह्मणाचा आपण प्रथम परिचय देऊं.

ऐतरेयब्राह्मणाचे एकंदर चाळीस अध्याय आहेय. प्रत्येक पांच अध्यायांला पंचिका असें म्हणतात. अशा चाळीस अध्यायांच्या आठ पंचिका आहेत. यांत ज्योतिष्टोम, गवामयन, आदित्यायन, आङ्गिरसामयन, आणि द्वादशाह इतक्या यज्ञांचा विधि सांगितलेला आहे. विशेषतः यज्ञांतील ' होता ' नांवाच्या ऋत्विजानें करावयाचें कर्म विस्तृतपणें सांगितलें आहे.

वैदिक लोकांची यज्ञ ही मुख्य धार्मिक संस्था होती. त्यामुळें ते सतत लहानमोठे यज्ञ करीत. त्या यज्ञांत हौत्रकर्म ऋग्वेदमंत्रांनीं, आध्वर्यव यजुर्मंत्रांनीं आणि गायन साममंत्रानीं करावें अशी योजना असे. हौत्रकर्म म्हणजे वेगवेगळ्या देवतांच्या स्तुतिपर असणारे मंत्र होत्यानें अध्वर्यूच्या सूचनेवरून म्हणणें. सामगायन सामवेद्यांनीं करावयाचें आणि अध्वर्यूनें यज्ञांतील सर्व क्रिया योग्य प्रकारें यजुर्वेदादि ग्रंथांच्या आधारें करावयाच्या असतात.

ऋग्मंत्रांनीं हौत्रकर्म करणाऱ्या होत्याच्या हाताखालीं १ मैत्रावरुण, २ ब्राह्मणाच्छंसी, ३ नेष्टा, ४ पोता, ५ अग्नीध्र, ६ अच्छावाक असे सहा आणखी ऋत्विज असतात. मनुष्ययज्ञ तर पूर्वींच बंद झालेले होते. पशुयज्ञाचा निर्देश असला तरी पशुयज्ञ बंद होत चाललेले दिसतात. कारण हवनीय द्रव्यें पशूंतून धान्यांत आल्याची गोष्ट त्यांत दिलेली आहे.

मनुष्यांत ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र अशा चार वर्णांचे स्पष्ट निर्देश आहेत. त्यांत ब्राह्मण क्षत्रियांच्याहि पूर्वींचे असा निर्देश आहे. त्याचप्रमाणें काव्य, अन्ध्र, पुण्ड्र, शबर, पुलिंद, मुतिब इतक्या निरनिराळ्या

जातींचा निर्देश या ग्रंथांत केला आहे. यांचा संबंध विश्वामित्रपुत्र म्हणून आला असून त्यांना दक्षिणेकडे पाठविल्याचा निर्देश आहे. याशिवाय भीम, वैदर्भ यासारख्या विदर्भ प्रांतांतील राजांचा निर्देश आढळतो.

सर्वचरु, कुरुक्षेत्र, अवचत्नुक, मष्णार, साचीगुण, वृत्रघ्न इतक्या देशांचीं नांवें या ग्रंथांत आढळतात.

तसेंच यांत पूर्वेकडील लोकांच्या राजांना सम्राट्, दक्षिणेकडील राजांना भोज, पश्चिमेकडील नीच्य आणि अपाच्य नामक लोकांच्या राजांना स्वराट् म्हटलेलें आहे. दक्षिणेकडील राजांना भोज म्हणत असें येथें म्हटलेलें आहे. ऋग्वेदांतहि भोजांचा उल्लेख आहे. तसेंच पश्चिमाभिमुख वाहणाऱ्या नद्या आणि दक्षिण हिंदुस्थान यांचा निर्देश स्पष्ट दिसतो.

विवाहसंस्था स्थिर झालेली होती. सून सासऱ्याला लाजत असल्याचा निर्देश आहे. पुरुष अनेक स्त्रिया करीत पण स्त्रियांना अनेक पति करितां येत नसत. जायेच्या ठिकाणीं प्रवेश करून पतिच पुनः पुत्ररूपानें जन्मास येतो. एवढ्याकरितां स्त्रीहि पतीला योग्य असावी लागते.

### ३ ऐतरेय आरण्यक परिचय—

वैदिक वाङ्मयांत संहिता व ब्राह्मण नांवाच्या ग्रंथांप्रमाणेंच 'आरण्यक' या नांवानें प्रसिद्ध असणारा एक भाग आहे. मूळ मंत्रांच्या संग्रहाला संहिता म्हणतात. संहितेंतील मंत्र यज्ञकर्मांत कसे उपयोगांत आणावेत आणि एकंदर यज्ञाची मांडणी कशी करावी, हें ब्राह्मणग्रंथांत सांगितलेलें असतें. आणि त्याच मंत्रांचा तत्त्वज्ञानात्मक अर्थ कसा होऊं शकतो हें आरण्यकांत सांगितलेलें असतें. या ग्रंथांत वेदांतील गूढ असणाऱ्या तत्त्वज्ञानाचें स्पष्टीकरण असल्यामुळें हे ग्रंथ वानप्रस्थाश्रम स्वीकारून अरण्यांत शिकावयाचे असतात, म्हणून यांस ' आरण्यकें ' किंवा ' अरणें ' असें म्हणतात. आजहि हे ग्रंथ गुरुजी विद्यार्थ्यांना घरांत न शिकवितां देवळांत शिकवितात.

ऐतरेय आरण्यकांत ऋग्वेदांतील मंत्रांचा तत्त्वज्ञानात्मक अर्थ कसा होतो हें कांहीं मंत्र उदाहरणादाखल घेऊन दाखविलें आहे. अग्नि, इंद्र यांचा यज्ञाच्या कर्मकाण्डांत देवता असा अर्थ असला तरी आध्यात्मिक दृष्ट्या त्या शब्दांचा अर्थ आत्मा, जीव असा आहे. हें कांहीं मंत्रांचा अर्थ करून या आरण्यकांत दाखवून प्रतिपादिलें आहे.

यावरून हें स्पष्ट होतें कीं, ऋग्वेदांतील मंत्रांच्या अर्थाविषयीं मंत्र-काळींच ज्ञान, कर्म, उपासना किंवा आध्यात्मिक, आधिदैविक आणि आधिभौतिक अशा परंपरा सुरू झालेल्या होत्या आणि अधिकारि-भेदानें मंत्रार्थ करण्याची पद्धति सुरू झाली होती. ही मंत्रविषयक विशेष प्रकारची आस्थाच मंत्र टिकविण्यास उपयोगी पडलेली आहे.

**४ ऐतरेय उपनिषद् परिचय—**

ऐतरेय उपनिषद म्हणजे वस्तुतः ऐतरेय आरण्यकाच्या दुसऱ्या विभागांतील चौथ्या अध्यायापासून शेवटपर्यंतचा भाग होय. याचे तीन अध्याय असून ते सर्व महत्त्वाचे आहेत. पहिल्या अध्यायांत मूळ आत्म्यापासून विराजद्वारें सृष्टीची उत्पत्ति कशी झाली याचें वर्णन केलें आहे. दुसऱ्या अध्यायांत वामदेवाच्या तीन जन्मांची मीमांसा केली आहे. ऋग्वेदांत वामदेवाचीं सूक्तें असून तेथें त्यानें आपल्या आत्मानु-भवाचें वर्णन केलें आहे.

देव, मनुष्य व ऋषि यांपैकीं ज्या कोणास आपल्या स्वतःची जाणीव उत्पन्न होते तो खरोखरच ब्रह्मरूप होतो. असें ज्ञान वामदेवास प्राप्त झालें होतें. भूतकाळचीं अनंत वर्षें ज्यास वर्तमानकालच्या अखंड टिकणाऱ्या एका क्षणाप्रमाणें वाटलीं, त्या वामदेवाच्या तोंडून पुढील उद्गार निघालेः— “ मनु मीच होतों. मींच सूर्यास प्रकाश दिला.[१] ”

हे उद्गार महाराष्ट्रीय संत ज्ञानेश्वर व तुकाराम यांच्या उद्गारासारखे

१ ‘ अहं मनुरभवम् ’ । अहं सूर्यः । —ऋ. ४·२६·१.

आहेत. ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात. 'आम्ही कृष्णाच्या सवंगड्यांपैकीं एक होतों.'[1]

तुकारामबोवा म्हणतातः– 'प्राचीन काळीं आत्मज्ञान मिळविण्यासाठीं शुक जेव्हां मेरु पर्वताच्या शिखरावर गेले व तेथें त्यांनीं समाधि लाविली, तेव्हां तें पाहण्यासाठीं शरीरानें नसलों तरी आत्मरूपानें आम्ही तेथें हजर होतों.'[2]

अमरत्व मिळविण्याची इच्छा करणाऱ्या साधकापुढें, या वाक्यांत वामदेवाचा तत्त्वज्ञानात्मक अनुभव प्रतिपादिलेला आहे.

सर्व सचेतन व अचेतन पदार्थ म्हणजे एकाच चैतन्याचीं रूपें होत, अशा प्रकारचीं अद्वैत तत्त्वज्ञानाचीं मूळतत्त्वें या उपनिषदाच्या शेवटच्या अध्यायांत प्रतिपादिलीं आहेत.

प्रज्ञानं ब्रह्म, अहं ब्रह्मास्मि, तत्त्वमसि, अयमात्मा ब्रह्म हीं ओळीनें ऋग्वेदादि चार वेदांचीं चार महावाक्यें आहेत. हीं सर्व ब्रह्मज्ञानप्रतिपादक असून सर्व वेदान्तांचें सार प्रतिपादणारीं आहेत. त्यापैकीं 'प्रज्ञानं ब्रह्म' हें महावाक्य ऋग्वेदाचें असून तें ऐतरेय उपनिषदांत आलेलें आहे. (ऐ. उ. ३.३). आणि इतर वाक्यांपेक्षां अधिक विवेचन करणारें हें वाक्य आहे. जीवशिवांच्या पलीकडे प्रज्ञानमय असें ब्रह्माचें स्वरूप या वाक्यांत प्रतिपादन केलेलें आहे. स्थूल अद्वैतापेक्षां अनुभवात्मक ज्ञानाची उच्च भूमिका यांत प्रतिपादन केलेली आहे. जीवशिवांचें ऐक्य इतर वाक्यांत प्रतिपादन केलेलें आहे. पण तें ऐक्य शुद्ध ज्ञानाशिवाय अनुभ-

---

१. गायी चालिल्या वनाप्रति। सवें पेंधा चाले सांगाती ॥१॥ ज्ञानदेव सवें सवंगडा लाटा। गायीं हांकितो गोठणातटा॥३॥ (ज्ञानदेवगाथा ८५)
२. ब्रह्मज्ञान जरी एके दिवशीं कळे + + + खोटें करुनियां लाविला अभ्यासीं । मेरुशिखरासी शुक गेला ॥ ४ ॥ जाउनिया तेणें साधिली समाधी । तुका म्हणे तंधी होतों आम्हीं ॥ ॥ (तुकारामगाथा २८१२.)

वाला येणें शक्य नाहीं. म्हणजे शुद्ध ज्ञान हेंच ब्रह्माचें स्वरूप ‘ प्रज्ञानं ब्रह्म ’ या महावाक्यानें प्रतिपादलें, हें याचें वैशिष्ट्य होय. ‘ साचचि बोलाचें नव्हे हें शास्त्र । पै संसार जिणतें शस्त्र ’ ॥ ( ज्ञाने. १५. ५००) या ज्ञानेश्वरमहाराजांच्या ओवींत हेंच प्रतिपादलें आहे.

**५ यजुर्वेदपरिचय—**

यानंतर आपणांस यजुर्वेदाचा परिचय करून घ्यावयाचा आहे. कालदृष्ट्या किंवा भूगोलदृष्ट्याहि यानंतर यजुर्वेदाचाच परिचय करून घेणें हें कसें क्रमप्राप्त आहे हें पुढील विवेचनावरून ध्यानांत येईल. यजुर्वेदाचा मुख्य आचार्य वैशंपायन होय. यानें याज्ञवल्क्यादि अनेक शिष्य तयार केले. वैशंपायनाचा वेद याज्ञवल्क्यानें परत करून सूर्यापासून नवा वेद मिळविला आणि गुरूच्या वेदाला कृष्णयजुर्वेद असें नांव देऊन आपल्या वेदाला शुक्लयजुर्वेद असें गौरवपर नांव घेतलें. वैशम्पायनानें स्वतः आणि आपल्या शिष्यशाखेच्या जोरावर याज्ञवल्क्याला निकराचा विरोध केला. पण याज्ञवल्क्य हाहि लेचापेचा नव्हता. तो तत्वज्ञानांतहि अत्यंत निष्णात असल्यामुळें हस्तिनापूरचा सम्राट् जनमेजय आणि विदेहाचा सम्राट् जनक यांना ताब्यांत घेऊन त्यानें आपल्या नव्या वेदाचा प्रचार अत्यंत धडाडीनें केला. आणि कृष्णयजुर्वेदी लोकांना उत्तरेकडे काश्मीरचा आणि दक्षिणकडे समुद्राचा आश्रय घेणें भाग पाडलें. पूर्वी इंद्रप्रस्थाच्या राजघराण्यावर वैशम्पायनाचें वर्चस्व होतें तेथें आतां याज्ञवल्क्याचें वर्चस्व स्थापन झालें. याचें थोडक्यामध्यें पण स्पष्ट वर्णन वायुपुराणासारख्या ग्रंथांत आजहि पाहावयास मिळतें. आणि याचें प्रत्यंतर दक्षिणेंत कृष्णयजुर्वेद्यांची बहुसंख्या आणि उत्तरेमध्यें ते काश्मीरशिवाय नाममात्रहि आढळत नाहींत यावरून आजहि येतें. क्षात्रियादि त्रैवार्णिकांचें सर्व धर्मकृत्य आजहि शुक्लयजुर्वेदानेंच होतें, याचें कारणहि याज्ञवल्क्यानें मिळविलेला मोठेपणाच होय. क्षात्रियादिकांचा वेद शुक्लयजुर्वेद व त्यांची

धर्मकृत्यें त्या वेदानें व्हावींत, ही गोष्ट पुढें धर्मशास्त्रांत नमूद झाली. याला फारच थोडे जयपूरसारखे अपवाद सांपडतात.

कृष्णयजुर्वेदाच्या सध्यां पांच शाखांच्या संहिता उपलब्ध आहेत. आणि आठ शाखांचीं श्रौतसूत्रें उपलब्ध आहेत. बाकीच्या ७८ शाखांचीं नांवें चरणव्यूहासारख्या ग्रंथांत आढळतात. तैत्तिरीय, मैत्रायणी, कठ, कापिष्ठल, या शाखांच्या संहिता छापून प्रसिद्ध झाल्या असून श्वेताश्वतर शाखेची संहिता अद्यापि प्रसिद्ध झालेली नाहीं. या शाखांपैकीं तैत्तिरीय शाखेचाच फक्त ब्राह्मणग्रंथ उपलब्ध आहे. आरण्यकहि तैत्तिरीय शाखेंचेंच असून त्यांतच तैत्तिरीय उपनिषदाचा समावेश होतो. याशिवाय बाकीच्या शाखांचीं उपनिषदें उपलब्ध आहेत. श्रौतसूत्रांपैकीं आपस्तम्ब, बौधायन, हिरण्यकेशी ( सत्याषाढ ), भारद्वाज, वैखानस, वाधूल, मानव ( मैत्रायणी शाखा ) आणि वाराह अशीं कृष्णयजुर्वेदाचीं आठ श्रौतसूत्रें उपलब्ध आहेत. आणि वाराहाखेरीज बाकीचीं छापूनहि प्रसिद्ध झालेलीं आहेत. कठ, भारद्वाज, वैखानस व वाधूल हीं अपूर्ण स्थितींत उपलब्ध आहेत. याच सूत्रांत गृह्यसूत्रांचाहि समावेश होतो. धर्मसूत्रें व कुंडादिकांकरितां भूमिति प्रतिपादणारीं शुल्बसूत्रेंहि याच ग्रंथांत एकेक प्रकरणांत दाखल केलेलीं आहेत. या शाखेचा तैत्तिरीयप्रातिशाख्य हा व्याकरणग्रंथ उपलब्ध असून त्यावर अनेक महत्वाच्या टीका प्रसिद्ध झाल्या आहेत. या प्रातिशाख्यांत इतर शाखांचाहि थोडक्यांत समावेश केलेला आढळतो.

याज्ञवल्क्यानें वैशम्पायनाचा वेद परत केल्यावर सूर्यकृपेनें नवा यजुर्वेद मिळविला आणि तो शुक्लयजुर्वेद या नांवानें विख्यात झाला. त्याच्या १५ शाखांपैकीं काण्व व माध्यंदिन या दोन शाखा व त्यांचे संहिता व ब्राह्मण ग्रंथ प्रसिद्ध आहेत. माध्यंदिन शाखेलाच वाजसनेय शाखा असेंहि म्हणतात. यांच्या संहितेचे ४० अध्याय आहेत आणि त्यांत पुढील विषयांचा समावेश झालेला आहेः–१–२ दर्शपूर्णमासमंत्र व पिण्डपितृयज्ञ, ३

नित्याग्निकर्म, अग्निप्रतिष्ठा, हवन व चातुर्मास्य यज्ञ, ४–८ सोमयज्ञ, पशुयज्ञ, राजसूय यांतील मंत्र, ९–१० सोमयज्ञ मंत्र, ११–१८ अग्निचयनविधि व मंत्र, १९–२१ सौत्रामणी वगैरे यागांतील मंत्र, २२–२५ अश्वमेधयज्ञमंत्र, २६–३० पुरुषमेध ( यज्ञरहस्य ). ३१ पुरुषसूक्त. ३२ तत्त्वज्ञान ( उपनिषद् ), ३३–३४ शिवसंकल्पोपनिषद्. ३५ अन्त्येष्टिमंत्र, ३६–३९ प्रवर्ग्यमंत्र, ४० ईशावास्योपनिषद्. २६ ते ३५ अध्यायांना खिल हें परिशिष्ट अर्थाचें नांव आहे. पुढील पांच अध्यायांतील विषयहि तात्त्विक असल्यानें निराळे वाटतात. अर्वाचीन अभ्यासक शेवटल्या १५ अध्यायांना निराळेपणामुळें ते मागाहून जोडले असावेत असें म्हणतात. या संहितेंत गद्य व पद्य असे दोनहि भाग आहेत. यांतील बहुतेक पद्यात्मक भाग ऋग्वेदांतहि आलेला आहे. गद्यात्मक अगदीं नवा आहे. त्याला यजुः असें म्हणतात. म्हणूनच या वेदाला यजुर्वेद असें नांव प्राप्त झालें आहे. यजुस् म्हणजे यज्ञ. यज्ञांत अध्वर्यु मुख्य असतो आणि त्याच्या नेतृत्वाखालीं इतर ऋत्विजांनीं कामें करावयाचीं असतात. यजुर्वेदांत अध्वर्यूच्या कामाचा समावेश प्रामुख्यानें केलेला असतो.

शुक्लयजुर्वेदाचा अत्यंत महत्त्वाचा ग्रंथ म्हणजे शतपथब्राह्मण होय. या प्रचंड ग्रंथाच्या काण्व व माध्यंदिन अशा दोन प्रती उपलब्ध आहेत. काण्वशाखेच्या या शतपथाचीं १७ काण्डें असून माध्यंदिन शाखेच्या या ग्रंथांचीं १४ काण्डें आहेत. या ग्रंथाच्या शेवटल्या कांडामध्यें सुप्रसिद्ध बृहदारण्यकोपनिषदाचा समावेश झालेला आहे. दोन्ही प्रतींत बरेंचसें साम्य असलें तरी वैषम्यहि पुष्कळ आहे. प्रायः हें वैषम्य पाठभेदाच्या स्वरूपाचें आहे असें म्हटलें असतां चालेल; पण शेवटल्या आचार्यपरंपरेंतहि फरक आढळतो.

या ग्रंथाचें महत्व वैदिक वाङ्मयामध्यें अनेक दृष्टींनीं दिसून येतें. इतर ब्राह्मण ग्रंथांप्रमाणें यांत विशिष्ट यज्ञाचें स्पष्टीकरण जरी केलेलें असलें

तरी जागोजाग केलेलें स्पष्टीकरण, शब्दांचे अर्थ सांगण्याची पद्धत आणि विशिष्ट मंत्रांचें अर्थबोधक स्पष्टीकरण हें अत्यंत उद्बोधक आहे. सर्व वैदिक वाङ्मयावर या ब्राह्मणग्रंथांमुळें विशेष तऱ्हेचा प्रकाश पडतो. तत्कालीन वेगवेगळ्या विद्यांत प्रवीण असणाऱ्या आचार्यांची नांवनिशी आपणांस या ग्रंथावरून उपलब्ध होते. ६ ते १० या काण्डांत वेदीच्या रचनेसंबंधानें विचार केलेला असून त्यांत शांडिल्याच्या मताला प्रामुख्य दिलें आहे. इतर भागांत साधारणतः याज्ञवल्क्याला प्राधान्य दिलेलें असून शेवटीं तर हा ग्रंथ याज्ञवल्क्यानेंच लिहिला असें नमूद करण्यांत आलें आहे. यांत गांधार, साल व केकय या वायव्य प्रदेशस्थ लोकांचा निर्देश असला तरी कुरु, पांचाल, कोसल, विदेह, सृंजय या प्रांतांतील लोकांचा प्रामुख्यानें उल्लेख, वैदिक संस्कृतीचें केन्द्र पंजाबांतून पूर्व हिन्दुस्थानांत शिरलें याचा निदर्शक आहे. १०० अध्याय असल्यामुळें या ग्रंथाला शतपथ असें नांव देण्यांत आलें. या वेळीं मिथिलेच्या विदेह राजांच्या दरबारांत अनेक मोठमोठाले वादविवाद होत. त्यांचें बरेंच विस्तृत वर्णन या ब्राह्मणांत, विशेषतः शेवटल्या बृहदारण्यकोपानिषद् या नांवानें प्रसिद्ध असलेल्या भागांत आढळतें. खुद्द याज्ञवल्क्य विदेहांतील असावा आणि पाश्चिमेकडील विद्वानांचा तो आपल्या ज्ञानानें पाडाव करीत असावा असें दिसतें. वैदिक लोकांचा वैश्वानर अग्नि पूर्वेकडील सदानीरा नदीपर्यंत जळत गेला, पण त्याच्या पलीकडे अग्नीनें जाण्याचें नाकारलें, अशा अर्थाची विदेघमाथवाची एक कथा या ब्राह्मणांत दिलेली आहे. त्यावरून वैदिकांचा पूर्व हिन्दुस्थानांत कोठपर्यंत प्रवेश झाला होता याबद्दल कल्पना करतां येते ( श. ब्रा. १. ४. १. १०–१७ ). ही सदानीरा नदी सध्यां कोसल व विदेह यांची मर्यादा दाखवीत आहे, पण तिचें नांव मात्र सध्यां गंडकी असें दिसतें. वैशंपायनाचे शिष्य आणि याज्ञवल्क्य यांच्यामध्यें उत्पन्न झालेला विरोध या ब्राह्मणांत कांहीं ठिकाणीं प्रतीत झालेला आहे.

याज्ञवल्क्यानें स्वतंत्र मार्ग काढून तो अत्यंत यशस्वी करून दाखविला. असें करतांना त्याला पूर्वींच्या लोकांचा विरोध सारखा होत असला पाहिजे. याज्ञवल्क्यानेंहि उघड वादविवाद करून जय मिळविलेले दिसतात. प्रतिपक्षाच्या यज्ञप्रक्रियेंतील दोषोद्घाटनहि या ब्राह्मणांत वारंवार केलेलें आढळतें. त्यांना चरक किंवा चरकाध्वर्यु अशा शब्दानें या ग्रंथांत संबोधलेलें आहे. या चरक शब्दानें कृष्णयजुर्वेदाच्या कठ, कापिष्ठल व मैत्रायणी वगैरे शाखांचा निर्देश ध्वनित होतो. चरक म्हणजे गुरु वैशंपायनाकरितां प्रायश्चित आचरणारे. एकदां वैशंपायनाच्या हातून ब्रह्महत्या घडली असतां त्याबद्दलचें प्रायश्चित त्यांनीं आपल्या शिष्यांना करावयास सांगितलें. त्या वेळीं याज्ञवल्क्य म्हणाला, ' मी एकटाच प्रायश्चित करितों, इतरांची जरूर नाहीं. ' या गर्वोक्तीबद्दल गुरूनें त्याला आपल्या शिष्यपरंपरेंतून काढून टाकिलें. ज्यांनीं प्रायश्चित्त केलें ते चरक आणि गुरूनें परंपरेंतून काढून लाविल्यामुळें स्वतंत्र पंथ उभारणारा याज्ञवल्क्य यांच्या विरोधाचा हा इतिहास मोठा मनोरंजक आणि स्फूर्तिप्रद आहे. या ब्राह्मणाच्या दोनहि प्रती सायणाचार्यांच्या भाष्यासह छापून प्रसिद्ध झाल्या आहेत. आणि त्यांचें इंग्रजी भाषांतरही ' सेक्रेड बुकस ऑफ दि ईस्ट 'मध्यें एजालिंगनें केलेलें प्रसिद्ध झालेलें आहे. पुढें उत्पन्न झालेल्या आसुरी वगैरे सांख्य मतांचा यांत उल्लेख आहे. कुरुवंशांतील सुप्रसिद्ध जनमेजय हा तर याज्ञवल्क्याचा पुरस्कर्ताच होता. त्याचेंहि उल्लेख या ब्राह्मणांत आहेत.

सुप्रसिद्ध प्रलयविषयक मनूची गोष्ट वैदिक वाङ्मयांतील फक्त याच ग्रंथांत आढळते. अथर्व वेदांत आणि कदाचित् ऋग्वेदांतसुद्धां त्या कथेचा उल्लेख आहे, पण इतका स्पष्ट निर्देश दुसरीकडे कोठेंहि आढळत नाहीं. ती कथा अशीः—मनूला एकदां एक मासा सांपडला. त्यानें आपलें पालनपोषण करण्यासाठीं मनूला विनंति केली आणि पुढें होणाऱ्या प्रलयामध्यें मी तुला वांचवीन असें मनूला त्यानें अभिवचन दिलें. जेव्हां

जलप्रलय सुरू झाला तेव्हां मनु एका नौकेमध्यें बसला आणि ती नौका या माशानें हिमालयाच्या एका टोकावर सुरक्षित नेऊन पोंचविली. त्या हिमालयाच्या टोकाचें नांव ' प्रभ्रंशन ' असें पडलें आणि हा मनु प्रलया-नंतर मानवजातीचा आद्य जनक झाला. अशा तऱ्हेनें हा ग्रंथ अनेक विद्यांचें आणि कथांचें माहेरघर आहे. त्याची भाषा स्पष्ट असून त्यांत यज्ञप्रक्रियेचें आणि अध्यात्माचें सुंदर विवेचन आहे.

६ सामवेदपरिचय—

वेदांपैकीं सामवेद हा तिसरा वेद होय. याला स्वतंत्र वेद म्हणण्यापेक्षां ऋग्वेदांतील मंत्रांच्या चालींचा संग्रह असें याचें वर्णन केलें असतां चालेल. त्यांत फक्त ७५ मंत्र ऋग्वेदापेक्षां निराळे आहेत. सामवेदाच्या १००० शाखा आहेत, असें महाभाष्यात पतंजलीनें म्हटलें आहे. पण सध्यां फक्त एकाच शाखेची संहिता संपूर्ण उपलब्ध आहे. आणि दुसरी शाखा अर्ध-वट स्वरूपांत उपलब्ध झालेली आहे. त्या शाखांचीं नांवें कौथुम व राणा-यनीय अशीं आहेत. ऋग्वेदी लोक ब्रह्मयज्ञांत या वेदाचें प्रारंभीचें वाक्य म्हणतात. तें वाक्य ' अग्न आ याहि वीतये ' हें होय. 'हजार शाखा' हा शब्द गौरवार्थ घातलेला असून तो अनेक म्हणावयाच्या चालींचा निद-र्शक असावा असें सत्यव्रत सामाश्रमीचें मत आहे.

या संहितेचे दोन भाग आहेत. पहिल्या भागाला आर्चिक अथवा ऋक्संग्रह आणि दुसऱ्या भागाला उत्तरार्चिक म्हणजे दुसरा ऋक्संग्रह असें म्हणतात. यांत एकंदर १८१० ऋचा आहेत. पुनरुक्ति सोडल्यास त्यांची संख्या १५४९ भरते. ज्या ७५ ऋचा नव्या आहेत असें वर म्हटलें त्या कांहीं ऋग्वेदाखेरीज इतर संहितांत व कांहीं विधिग्रंथांत सांपडतात. यज्ञांत सामवेद गाण्याचें काम करणाऱ्या व्यक्तीस ' उद्गाता ' असें म्हणतात. त्याला हे मंत्र वेगवेगळ्या चालीवर म्हणतां यावे लागतात.

या वेदाचे पुढील ब्राह्मणग्रंथ प्रसिद्ध आहेतः—१ पंचविंश ( प्रौढ

किंवा ताण्ड्य ), २ षड्विंश, ३ सामविधान, ४ आर्षेय, ५ मंत्र, ६ दैवताध्याय, ७ वंश, ८ संहितोपनिषद्, ९ जैमिनीय, १० जैमिनीयोपनिषद. हे सर्व ब्राह्मण ग्रंथ प्रसिद्ध झालेले आहेत. यांपैकीं पंचविंश ऊर्फ ताण्ड्य ब्राह्मणग्रंथ शतपथासारखाच विस्तारानें मोठा आहे. आणि त्यामध्यें अनेक महत्त्वाच्या गोष्टींचाहि समावेश झालेला आढळतो. वास्तविक पंचविंश, षड्विंश आणि छांदोग्योपनिषद् मिळून एक ग्रंथ होतो आणि त्याला महाब्राह्मण म्हणतात. आणि इतर ब्राह्मणांना अनुब्राह्मण असें म्हणतात, षड्विंश ब्राह्मणांतील शेवटल्या प्रकरणांत अद्भुत गोष्टींची चर्चा असल्यानें त्याला अद्भुतब्राह्मण असें म्हटलेलें आढळतें. जैमिनीय-उपनिषद्-ब्राह्मणांत दशोपनिषदांपैकीं सुप्रसिद्ध केनोपनिषदाचा समावेश झालेला आहे. तें सामवेदाच्या तलवकार शाखेचें उपनिषद् समजतात.

### ७ अथर्ववेदपरिचय—

चार वेदांपैकीं चौथा अथर्ववेद होय. अथर्वांगिरसानें हा वेद पाहिला, म्हणून याला अथर्ववेद असें नांव पडलें. वेदांत व इतर वाङ्मयांत प्रायः तीन वेदांचाच उल्लेख आढळतो. ( ऋ. १०-९०-९ ). तथापि यज्ञांतील ब्रह्मा नांवाच्या ऋत्विजाचें काम अथर्ववेदाशीं संबद्ध आहे. त्यामुळें यज्ञकर्मांत अथर्ववेदाचें महत्त्व कमी मानितां येत नाहीं. शिवाय ऋग्, यजु आणि साम हीं विषयदर्शक नांवें आहेत. त्यांत ऋग्वेदांत अथर्ववेदाचाही समावेश होऊं शकतो. म्हणूनच यास ब्रह्मवेद असेंहि दुसरें नांव आहे. या वेदाच्या नऊ शाखांपैकीं दोन शाखांच्या संहिता सध्यां उपलब्ध आहेत. त्यांना पिप्पलाद व शौनक असें म्हणतात. ऋग्वेदी लोक ब्रह्मयज्ञांत 'शं नो देवीरभिष्टये' असा अथर्ववेदाचा आरंभींचा मंत्र म्हणतात, तो पिप्पलाद शाखेचा होय. आपल्याकडे प्रसिद्ध झालेली अथर्ववेदसंहिता शौनक शाखेची असून तिचा प्रारंभींचा मंत्र 'ये त्रिषप्ता परियान्ति विश्वा' असा आहे. बाकीचे

भेद सध्यां उपलब्ध नाहींत. या संहितेंत तत्त्वज्ञानात्मक मंत्र असले तरी अभिचार, मंत्रतंत्र, जादूटोणा, वशीकरण, गंडे, तोडगे वगैरेंचे मंत्रहि पुष्कळ आहेत. आणि हे सिद्धमंत्र असल्यामुळें कौशिकसूत्रांत त्यांचीं अनुष्ठानें कशीं करावीं हेंहि सविस्तर सांगितलेलें आहे. कौशिकसूत्र टीकेसह अमेरिकेंत प्रसिद्ध झालें आहे. व्रात्यस्तोम सूक्तहि या वेदांतच आढळतें. ( १४ वें कांड )

सध्या आपल्याकडे सामवेदी व अथर्ववेदी ब्राह्मण लोक प्रायः आढळत नाहींत. सातारा जिल्ह्याच्या कांहीं भागांत या वेदाचीं घराणीं आतांपर्यंत होतीं. पण आतां त्यांनीं वेदाध्ययन सोडलेलें आहे व सोईकरितां ते ऋग्वेदी झालेले आहेत.

---

## प्रकरण ५ वें,

# महाराष्ट्राची वसाहत ( पूर्वार्ध )

**म्हणौनि दीर्घसूचनेचे लोक। त्यांचा पाहावा विवेक॥**
**लोकांकरितां लोक। शाहाणे होती॥** —दास १२-१-१६

### १ ब्राह्मणांचे प्रांतिक भेद—

मूलस्थान, काळ, वैदिक वाङ्मय यांची चर्चा केल्यानंतर महाराष्ट्रांतील वसाहतीसंबंधीं माहिती देणें आवश्यक आहे. वैदिक इतिहासांत मंत्रकाल, संहिताकाल, शाखाकाल असे तीन भाग स्पष्टच पडतात. मंत्रकालींच ऋग्, यजुः, साम या विशेष अर्थाच्या संज्ञा रूढ झालेल्या होत्या. ऋचा पाठ म्हणणारे, यज्ञक्रियेंत पारंगत असणारे आणि साम गाणारे असे अलग वर्ग आधींच निर्माण झाले होते. उपनिषदांतील तत्त्वज्ञानसुद्धां प्रतिपादणारे तत्त्वज्ञानीहि उत्पन्न झालेले दिसतात. रूढ असणाऱ्या मंत्रांचें संकलन

ऋग्वेदसंहितेंत करण्यांत आलें. यजुर्वेदापैकीं कृष्णयजुर्वेद प्रथम एकत्र करण्यांत आलेला आहे. त्यापैकींहि तैत्तिरीयसंहिता तत्पूर्वी निर्माण झाली असावी. सामवेदाचें संहितीकरण याच कालक्रमांत झालेलें आहे. याज्ञवल्क्यानें नवा व शुद्ध यजुर्वेद संपादन केल्यावर त्याला शुक्लयजुर्वेद हें नांव प्राप्त झालें आणि मंत्र व ब्राह्मण अशा सरमिसळ असलेल्या मूळच्या यजुर्वेदाला कृष्णयजुर्वेद असें नांव प्राप्त झालें. बाकीच्या अवशिष्ट भागाला अथर्ववेद असें नांव देण्यांत आलें. या सर्वांच्या सध्यांच्या संहिता भारती-युद्धानंतर कृष्णद्वैपायन व्यासानें केल्या.

हे चार वेद एका माणसालाहि पूर्वी येत असत आणि असे चार वेद एकाला येणें ही गोष्ट मोठ्या मानाची समजली जाई. चार वेद म्हण-णाराला चतुर्वेदी, तीन वेद म्हणाणाराला त्रिवेदी, दोन वेद म्हणणाराला द्विवेदी अशा सन्मानदर्शक पदव्या प्राप्त झाल्या. आणि तींच कांहीं घराण्यांचीं उपनांवें होऊन असल्याचें आपण पाहतों. एक वेद तर प्रत्येक ब्राह्मणानें म्हणावयास पाहिजे. संहिता, ब्राह्मण व आरण्यक यांना शाखा असें म्हणतात. आणि शाखेचें अध्ययन प्रत्येक ब्राह्मणास आवश्यक सांगितलें आहे. आतांपर्यंत प्रत्येक ब्राह्मण कांहीं वैदिक मंत्र पाठ म्हणतो व प्रत्येक दिवशीं संध्या-वैश्वदेवासारखे कांहीं नित्यविधि करीत असतो.

अशा क्रमानें प्रथम एका वेदाचे सोयीवार असे ऋग्वेद, यजुर्वेद इत्यादि चार वेद झाले. आणि पुढें प्रत्येक वेदाच्या लहानमोठ्या मत-भेदानें अनेक शाखा निर्माण झाल्या आणि हळूहळू प्रांतिक भेदहि निर्माण होऊन प्रत्येक प्रान्तांतला ब्राह्मण वेद, व धर्म यांच्या दृष्टींनीं एक असला तरी प्रान्तिक दृष्टीनें वेगळा समजण्यांत येऊं लागला. प्रान्तिक भेदाच्या दृष्टीनें ब्राह्मणांचे उल्लेख गौतमबुद्धाच्या व धर्मसूत्राच्या कालापासून स्पष्टपणें सांपडण्यास सुरवात होते. त्यापूर्वींच हे भेद अनेक शतकें रूढ झाले असले पाहिजेत यांत शंका नाहीं. अशा

प्रान्तिक ब्राह्मणांपैकीं महाराष्ट्र ब्राह्मणांची महाराष्ट्रांत वसाहत केव्हां झाली हें आपणांस ठरवावयाचें आहे आणि त्याकरितां महाराष्ट्रांत वस्ती तरी केव्हांपासून आहे, हें पाहावयाचें आहे.

आज महाराष्ट्रांत उपलब्ध होणाऱ्या ब्राह्मणवर्गांत देशस्थ ऋग्वेदी आणि शुक्लयजुर्वेदी यांना प्राधान्य आहे. ऋग्वेदी ब्राह्मणांत शाकलशाखेच्या आश्वलायन सूत्राचेच लोक आहेत. हिंदुस्थानच्या इतर प्रांतांत सुद्धां त्या त्या प्रांतांतील ब्राह्मणांत ऋग्वेदी आश्वलायन आहेत. शिवाय ऋग्वेदी सांख्यायन शाखेचेहि लोक इतर प्रांतांत सांपडतात. सांख्यायन शाखेचे ऋग्वेदी लोक महाराष्ट्रांत नाहींत.

लोकवस्तीचें आपण अवलोकन केलें तर वस्ती किंवा वसाहत ही एकाच जातीची किंवा एकच धंदा करणारांची केव्हांहि नसते. त्यांत आपल्या गरजांप्रमाणें अनेक व्यवसायाचे लोक एकत्र आल्याशिवाय समाजाच्या सर्व गरजा भागत नाहींत. एक साधें खेडेगांव घेतलें तरी त्यांत ब्राह्मणापासून हरिजनापर्यंत सर्व प्रकारच्या लोकांचा समावेश आवश्यक म्हणून झालेला असतो. बारा बलुते व अठरापगड जाती या समाजाच्या रोजच्या व्यवहाराला आवश्यक असतात. आपली ग्रामसंस्था म्हणजे स्वयं-पूर्ण राज्यव्यवस्थेचा एक नमुना आहे. त्याचेंच अत्यंत थोडक्यांत वर्गी-करण चातुवर्ण्य संस्थेंत करण्यात आलें आहे. समाजाच्या गरजांचें वर्गीकरण करून त्यांच्या पूर्ततेची व्यवस्था ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र असे वर्ग निर्माण करून त्यांच्यामार्फत करून घेण्याची वैदिक धर्माची योजना आहे. हे सर्व वर्ग परस्परांना पूरक असल्यानें व ते एकमेकांवर अवलंबून असल्यानें कोणतीहि वसाहत म्हटली कीं त्यांत हे चार वर्ण असलेच पाहिजेत.

खुद्द चार वेदांची सुद्धां परस्परांना पूरक अशीच योजना आहे. कोण-ताहि यज्ञ घेतल्यास चार वेदांचे ब्राह्मण असल्याशिवाय तो पारच पडूं

शकत नाहीं. म्हणून वसाहत म्हणतांना अनेक वर्गांनीं युक्त असणारा समाज असाच अर्थ आपणांस घेतला पाहिजे. ब्राह्मणांची वसाहत म्हणून विचार करू लागलों कीं ब्राह्मण आणि इतर वर्ण हे असणारच.

**२ महाराष्ट्राचीं नामान्तरें–**

मराठी भाषा बोलल्या जाणाऱ्या प्रान्ताला आपण महाराष्ट्रदेश म्हणतों. यांत ठाणें, कुलाबा, रत्नागिरी हे कोकणांतील तीन जिल्हे; पुणें, सातारा, नगर, सोलापूर, नाशिक, पूर्व व पश्चिम खानदेश हे मध्यविभागांतील देश; अकोला, उमरावती, बुलढाणा, यवतमाळ हे जिल्हे असलेला वऱ्हाड; वर्धा, नागपूर, चांदा, भंडारा, बालाघाट हे मध्यप्रान्तांतील पांच जिल्हे; निजामहद्दींतील नांदेड, परभणी, औरंगाबाद, उस्मानाबाद व बीड हे जिल्हे व कोल्हापूर, सांगली, मिरज, कुरुंदवाड, भोर, औन्ध, फलटण, अक्कलकोट, सावंतवाडी, जंजिरा, जव्हार हीं संस्थानें इतका मुलूख येतो. हिंदीच्या सरहद्दीवरील नेमाड व कानडीच्या सरहद्दीवरील बेळगांव यांपैकीं कांहीं भाग यांत अधिक धरावा लागेल.

या सर्व प्रान्तांत असलेल्या ब्राह्मण लोकांत आपण बाहेरून आलेलों आहोंत, अशी बिलकूल कल्पना नाहीं. तीर्थक्षेत्रें बाहेर असलीं तरी तीं हिंदुस्थानच्या सर्वच भागांत पसरलेलीं आहेत. हिंदुस्थानच्या एखाद्याच भागांतील तीर्थक्षेत्रें विशेष मानिलीं जातात अशांतला भाग नाहीं. गंगा ही एक नदी आणि शिव हें दैवत यांची छाप मात्र सर्वत्र पसरलेली दिसते. त्या दृष्टीनें महाराष्ट्राबाहेरील एखाद्या विशेष स्थानाकडे विशेष लक्ष आहे असें म्हणावयाचें झाल्यास गंगानदी आणि शिवाचें स्थान हिमालय इकडे मात्र प्रत्येक ब्राह्मणाचेंच काय पण प्रत्येक हिन्दूचेंहि लक्ष आहे, असा अनुभव येतो. बाकी महाराष्ट्र ही आपली जन्मभूमि, पुण्यभूमि व पितृभूमि असा प्रत्येकाचा विश्वास आहे.

अशा या आपल्या महाराष्ट्रांत आपल्या वस्तीचा पुरावा केव्हांपासून

उपलब्ध होऊं लागतो हें आपणांस पाहावयाचें आहे. महाराष्ट्राच्या वस्ती-संबंधीं पुरावे शोधतांना महाराष्ट्राशीं विशेष संबद्ध असलेला असा अत्यंत जुना टप्पा म्हणजे दशरथपुत्र रामाचा होय. रामलक्ष्मणजानकी यांनीं वनवासाकारितां दण्डकारण्यांत येऊन वनवासांतील बहुतेक वर्षें गोदावरीच्या कांठीं नाशिक-पंचवटीच्या आसपास काढलीं, आणि त्यांचा रावणाशीं विरोध या आपल्या प्रान्तांतच सुरू झाला. राम हा भारतीयुद्धापूर्वीं तेहेतीस पिढ्या मागचा पुरुष होय. यानंतर कौरवपांडवांचें कुरुक्षेत्रांत झालेलें भारतीयुद्ध हा दुसरा टप्पा व भारती युध्दाच्या उत्तरकालीन प्रसिद्ध टप्पा गौतमबुद्धाचा होय. गौतमबुध्द हा खि. पू. ४९० या वर्षीं निर्वाणाला गेलेला आहे.

आपली मराठी भाषा व महाराष्ट्रदेश हे शब्द फारच अलीकडचे आहेत. म्हैसूर संस्थानांतील श्रवणबेलगोळा येथील गोमटेश्वराच्या प्रचंड पुतळ्याखालील ‘ चामुंडरायें करावियलें ’ असा इसवी सनाच्या दहाव्या शतकांतील मराठींतील पहिला छोटा पण निश्चित शिलालेख सांपडतो. त्यापूर्वींच्या काळांतील मराठी भाषेंतील लेख सांपडत नाहींत. त्यापूर्वींच्या लेखांना देवनागरी लिपिसुद्धां उपयोगांत आणलेली आढळत नाहीं.

आतां महाराष्ट्र शब्दाचा विचार करूं. महाराष्ट्र हा शब्द इ. स. च्या चौथ्या शतकापूर्वीं वाङ्मयांत कोठेंहि सांपडत नाहीं. कात्यायनाच्या प्राकृतप्रकाशांत ‘ शेषं महाराष्ट्रीवत् ’ असा महाराष्ट्री भाषेचा निर्देश आढळतो. त्या सुमाराच्या वाङ्मयांत महाराष्ट्र हा शब्द देशवाचक म्हणून येऊं लागला. त्या पूर्वींच्या काळांतील महाराष्ट्रांतील सुप्रसिध्द राजघराणें शालिवाहनांचें होय. त्या घराण्याच्या नांवानें प्रसिद्ध असलेला शालिवाहन शक अद्यापि दक्षिण हिन्दुस्थानांत चालू आहे. तो आपल्या धार्मिक, सामाजिक व राष्ट्रीय व्यवहारांत आपण मोठा पवित्र म्हणून भावनेनें वापरतां. तें घराणें ब्राह्मण जातीचें असून त्यांचे अनेक लेख व पुतळे पुणें

जिल्ह्यांतील जुन्नर जवळच्या नाणें घाटांत उपलब्ध होतात. तसेंच इतरत्रहि महाराष्ट्रांत व महाराष्ट्राच्या बाहेर त्यांचे लेख उपलब्ध आहेत. हे सर्व लेख ब्राह्मी लिपींत व तत्कालिन महाराष्ट्री भाषेंत आहेत. त्यांचा काळ सनानंतर दुसरें व तिसरें शतक असून त्यांत ' महाराष्ट्र ' शब्दाचें महाराष्ट्री भाषेंत होणारें ' महारठ्ठ ' हें रूप कोठेंहि आढळत नाहीं. बौद्धांच्या दीपवंश नांवाच्या ग्रंथांतील 'महारठ्ठ' हा शब्द शालिवाहनानन्तरच्या काळांतील आहे असें ठरलें आहे.

अशोकाचा काल या विचाराच्या दृष्टीनें अत्यंत महत्वाचा आहे. गौतमबुद्धानन्तर चन्द्रगुप्त मौर्याच्या घराण्यांतलि सम्राट् अशोक हा बौद्ध धर्माला पुरस्कर्ता मिळाला नसता तर बौद्ध धर्माला प्राप्त झालेलें जागतिक महत्त्व कदाचित् प्राप्त झालें नसतें. या अशोकानें साम्राज्य तर वाढविलेंच, पण धर्मतत्वांचा प्रसार व्हावा म्हणून प्रांतोप्रांतीं मोठमोठ्या खडकांवर धर्माच्या आज्ञा खोदवून धर्मतत्वांचा प्रसार करण्याचा प्रयत्न केला. तीं शिलाशासनें आज जशींच्या तशीं उपलब्ध आहेत. त्यांत महाराष्ट्रांतील पोटप्रांतांचा निर्देश आहे, पण महाराष्ट्राचा कोणत्याहि शब्दानें निर्देश नाहीं. महाराष्ट्रांतील पोटप्रान्ताचा निर्देश अश्मक, कुन्तल व विदर्भ या शब्दांनीं तेथें सांपडतो. अशोकानें येथील लोकांचा निर्देश ' राष्ट्रीक ' या शब्दानें केलेला आढळतो. अशोकाच्या वेळीं वरील नांवांनीं महाराष्ट्रांतील हे भाग प्रसिद्ध असलेले आढळतात. पण त्यांना सामुदायिक महाराष्ट्र हें नांव तेव्हां प्राप्त झालेलें नव्हतें. भिन्न भिन्न राजांच्या सत्तेखालीं असणारे हे प्रांत त्या त्या नांवानें प्रसिद्ध झाले. पण भाषिक ऐक्यामुळें महाराष्ट्री भाषेचें वर्चस्व असलेले हे प्रान्त महाराष्ट्र या सामुदायिक नांवानें पुढें संबोधले जाऊं लागले. राष्ट्रीक लोकांची भाषा सर्व प्राकृत भाषांची प्रकृति असल्यानें तिला गौरवार्थ महा शब्द लावून ' महाराष्ट्री ' म्हणूं लागले आणि देशाला महाराष्ट्र नांव प्राप्त झालें. ' तीन

महाराष्ट्र ' वगैरे उल्लेखांची सुद्धां वरील अश्मक, कुन्तल व विदर्भ या तीन प्रमुख विभागांनीं चांगली ओळख पटते. पुढें तर तीनहि प्रान्त राजकीय दृष्ट्या एकत्र आणणें आवश्यक झालें, तेव्हां तर महाराष्ट्र हा शब्द सर्वांचा निर्देश करण्यास सोयीचाच झालेला असला पाहिजे. असा हा ' महाराष्ट्र ' शब्द कालदृष्ट्या अलीकडचा असला तरी त्यामुळें महाराष्ट्राची वसाहत अलीकडची मानण्याचें बिलकूल कारण नाहीं.

**३ अश्मक, कुन्तल व विदर्भ यांची प्राचीनता--**

अशोकाच्या पूर्वी भारतीययुद्धांत अश्मक देशचे राजे उपस्थित होते. भारतीयुद्धानंतर पंचवीस अश्मक राजे दाक्षिणेंत महाराष्ट्रांत होऊन गेले असा मत्स्यपुराणांत ( मत्स्य पु. २७२.१४.१६ ) निर्देश आहे. अश्मक व मूलक हे दोन प्रान्त गोदावरीनें विभागले आहेत (नन्दलाल डे–कृत जिऑग्रफिकल डिक्शनरी, पा. १३३ पाहा ). अश्मक देशाचा व राजांचा पाणिनीनेंहि आपल्या सूत्रांत निर्देश केला आहे. (पा. सू. ४.१.१७३). पाणिनीचा काळ खि. पू. आठव्या शतकांत आहे.

विदर्भ, अश्मक व मूलक हे तीनहि प्रान्त महाराष्ट्रांतीलच आहेत. हीं तीनहि देशवाचक नांवें त्या देशच्या राजांना प्राप्त झालीं. देशाचीं नांवें राजांना मिळतात. हा सिद्धान्त पाणिनीनेंहि आपल्या सूत्रांत नमूद करून ठेवला आहे ( ते तद्राजाः ४.१.७४ ).

विदर्भ हें देशनाम ज्या व्यक्तीमुळें उत्पन्न झालें, ती व्यक्ति स्वायंभुव मन्वन्तरांतील प्रियव्रत वंशांतील ऋषभाचा पुत्र होय. दुसरा विदर्भ यादववंशांतील असून तो इक्ष्वाकु वंशांतील सगराचा सासरा आहे. पाहिला विदर्भ वैवस्वत मनूपेक्षां पुष्कळच पुरातन असून दुसरा वैवस्वतमनूपासून चाळिसाव्या पिढींतील आहे.

वैवस्वत मनूचा पुत्र इक्ष्वाकु होय. त्यास शंभर पुत्र होते. त्यांपैकीं शकुनिप्रभृति पन्नास मुलांना त्यानें उत्तरहिंदुस्थानचें व

बाकीच्या अठेचाळीसांना दक्षिणहिन्दुस्थानचें राज्य दिलें. दण्डकारण्य हें नांव ज्या दण्डकामुळें प्राप्त झालें, तोहि इक्ष्वाकूचा पुत्र होता. पण तो विद्याहीन व दुर्वृत्त होता. त्याच्या दुर्वर्तनामुळें वसतिक्षम अशा महाराष्ट्राला अरण्याची अवकळा प्राप्त झाली. तथापि त्याचाच भाऊ, दशाश्व नर्मदातीरीं माहिष्मतीला राज्य करीत होता. वैवस्वतमनू-पासून सहासष्टाव्या पिढींतील अश्मक व सदुसष्टाव्या पिढींतील मूलक होय. यांचीं राज्यें गोदावरीच्या तीरावर आनंदानें चाललीं होतीं. तेच त्या वेळीं सम्राट्पदाला योग्य असल्यानें साम्राज्य करणाऱ्या इक्ष्वाकु-वंशाच्या यादींत त्यांचा समावेश झाला. अश्मकानन्तर दहाव्या पिढीचा राम दाशरथि दण्डकारण्यांतील नाशिक-पंचवटींत येऊन बरींच वर्षें राहि-ल्याचा इतिहास रामायण आपणांस सांगत आहे.

रामाला विश्वामित्राकडून दण्डकारण्याची माहिती प्रथम कळली होती. आणि नंतर तेथील परिस्थितीचा साक्षात् अनुभव त्याला घेण्यास मिळाला. रामानें विश्वामित्राच्या यज्ञाला दक्षिणेकडील लोकांकडून होणाऱ्या विरोधाचा परिहारहि केला. तसेंच दक्षिण आणि उत्तर अशा दोन्हींकडील लोकांच्या विश्वासास पात्र झालेल्या अगस्त्याचा आश्रमहि त्यास पाहावयास मिळाला. याचा अर्थ दोन भिन्न संस्कृतीच्या संघर्षाची ही सरहद्द होती, येथें दोन्ही पक्ष सज्ज असत आणि तोहि संघर्ष कांहीं सामाजिक व राजकीय तत्वांवर उभारलेला असे. रामानन्तर बत्ति-साव्या पिढींत भारती युद्ध झालें.

विदर्भराजकन्या आपल्या आकर्षक सौन्दर्यानें कृष्णासारख्या महापुरु-षालाहि आकर्षित करीत, असें रुक्मिणीच्या लोकप्रिय स्वयंवरकथेवरून आपणांस माहिती आहे. अगस्त्यपत्नी लोपामुद्रा व सगरपत्नी केशिनी या अत्यंत प्राचीन असणाऱ्या स्त्रिया विदर्भराजकन्याच होत्या. नलपत्नी दम-यंतीसुद्धां वैदर्भीच होती.

कुन्तलांचा भारतीयुद्धांत व इतरत्रहि संबंध दिसतो.

असा वैवस्वतमनूच्या पूर्वकालापासून तों थेट सम्राट् अशोकापर्यंत दक्षिणेकडील आणि विशेषतः महाराष्ट्रांतील वसाहतीचा छडा लावण्यास आपणांस पुराणांचा उपयोग होतो. आतां वैदिक वाङ्मयावरून महाराष्ट्राच्या वसाहतीचा कसा पत्ता लागतो हें आपण पाहूं.

**४ ऋग्वेदांत महाराष्ट्र—**

ऋग्वेदांत पंजाबपासून यमुनेपर्यंतच्या प्रदेशाचे निर्देश स्पष्टच आहेत. पण त्याच्या पुढील प्रदेशाचे व खुद्द दक्षिणेकडील प्रदेशाचे निर्देश नाहींत, असें मानण्याची पद्धत आहे. पण ती समजूत चुकीची आहे. पुराणें, दक्षिण हिन्दुस्थानांतील राज्यें वैवस्वतमनूच्या पुत्रापासून असल्याचेंच नव्हे, तर त्या पूर्वींहि असल्याचें आपणांस सांगतात. वेदपूर्वकालीन, फार काय मंत्र-पूर्वकालीन परंपरा पुराणांनीं सांगितलेली आहे. अनेक वैदिक घटनांचा उलगडा पुराणांनीं दिलेला आहे. तशी परंपरागत माहिती पुराणकारांच्या जवळ एकत्रित होती. तीवरून त्यांनीं दक्षिणेकडील माहिती दिलेली आहे.

वैवस्वत मनूचा एक पुत्र नाभानेदिष्ट ' दाक्षिणा पदा ' शब्दानें दाक्षिणा-पथाचा निर्देश करतो.[१] तेथें ' दाक्षिणापथ ' असाच अर्थ असला पाहिजे असें वरील पुराणांतील परंपरेवरून दिसतें. नाभानेदिष्ट हा इक्ष्वाकूचा भाऊच आहे. इक्ष्वाकूच्या अठ्ठेचाळीस मुलांच्या वाटणीला दक्षिणापथ आलेला होता. दण्डकारण्य हें नांव ज्यामुळें मिळालें तो दण्डकहि इक्ष्वा-कूचा मुलगाच होता. अशा स्थितींत ऋग्वेदांत दक्षिणापथाचा निर्देश आहे असें मानणें भाग पडतें.

विदर्भाचा निर्देश ऐतरेय ब्राह्मणादि ग्रंथांत स्पष्टच आहे.[२] अगस्त्य हा वैदिकांपैकीं विंध्य ओलांडून दक्षिणेकडे येणारा पहिला धाडसी गृहस्थ

१ ऋ. १०. ६१.८. २ भीम वैदर्भ, ऐ. ब्रा. ७.३४; वैदर्भिन् कौं-डिण्य, बृ. उ. २.६.३ ४.६; जै. उ. ब्रा.

मानण्यांत येतो. त्याची पत्नी विदर्भराज निमीची कन्या लोपामुद्रा होय. हा निमि इक्ष्वाकुपुत्र होय. ऋग्वेदांत अगस्त्यलोपामुद्रासंवाद आलेला आहे. तेथें विंध्य ओलांडण्याचा किंवा लोपामुद्रा वैदर्भी असल्याचा प्रत्यक्ष निर्देश नाहीं. तथापि विंध्य ओलांडणाराच तो अगस्त्य आणि ती लोपामुद्रा विदर्भराज निमीची मुलगी असेंच सर्व मानतात.

अगस्त्याचे ऋग्वेदांत बरेच मंत्र आहेत. अगस्त्यशिष्य व अगस्त्यस्वसृ म्हणजे अगस्त्याची बहीण यांचे नांवांवरहि ऋग्वेदांत मंत्र आहेत. तसेंच इध्मवाह वगैरे अगस्त्यपुत्रांचींहि ऋग्वेदांत अनेक सूक्तें आहेत. अगस्त्य, त्याची पत्नी लोपामुद्रा, बहीण, शिष्य व पुत्र यांना ऋग्वेदसंहितेच्या पूर्वकालीं अत्यंत महत्व प्राप्त झालेलें आहे.

अगस्त्यानें संपत्तीची जरूर असतां अनेक राजांकडे संपत्तीची मागणी केली, पण त्याला आवश्यक तितकी संपत्ति मिळेना. तेव्हां त्यांनीं श्रुतर्वन्, व्रध्न्यश्व आणि त्रसदस्यु या राजांसह वातापिनगरींत इल्वलाकडे मोर्चा वळविला. वातापि व इल्वल या दोघां बंधूंनीं लोकांच्या पोटांत शिरून अमोप संपत्ति मिळविली होती. ती आपल्या अचाट सामर्थ्यानें वातापीला आपलासा करून इल्वलाकडून त्यानें मिळविली. ही गोष्ट दक्षिणापथांत महाराष्ट्र व कर्नाटक यांच्या सरहद्दीवर घडलेली आहे. वातापीच्या नगरीला सध्यां बदामी हें नांव आहे. आणि विजापूरजवळ बदामी गांवीं शाकंभरी या देवीचें स्थान सुप्रसिद्ध आहे. तेंच हें ठिकाण असें लोक म्हणतात. वातापी, इल्वल आणि शाकंबरी हीं तीनहि नांवें द्रविडभाषा व द्रविडसंस्कृति यांचीं निदर्शक आहेत.

विन्ध्य ओलांडून दक्षिणेकडे येण्याचा अगस्त्याचा धाडसी प्रयत्न सर्वांनाच वाखाणण्यासारखा वाटला. दक्षिणेकडे यावयाचें झाल्यास विन्ध्य टाळून समुद्राच्या बाजूंनीं मार्ग होते आणि त्या मार्गांनीं दक्षिणेकडे जाणें-येणें चालूहि होतें. पण दक्षिणापथ हें विरुद्ध संस्कृतीच्या लोकांचें वसति-

स्थान असल्यानें संघर्ष उत्पन्न होई. त्यामुळें दक्षिणेकडील महाराष्ट्र वगैरे दण्डकारण्याचा भाग अत्यंत भीतिप्रद झाला होता. यामुळें अगस्त्याच्या विंध्य ओलांडण्यास महत्व उत्पन्न झालें. अगस्त्यानें विंध्य ओलांडला म्हणजे विंध्य ओलांडून येण्याइतपत दक्षिण दिशा निर्भय केली. उत्तरेकडील राजेलोकांप्रमाणेंच दक्षिणेकडील राक्षसांवरहि अगस्त्याचें वजन होतें.

अगस्त्य हा साधासुधा ब्राह्मण नव्हता. मोठाल्या राजांच्या जवळ नव्हती इतकी अलोट संपत्ति त्यानें वातापीला मारून इल्वलाकडून मिळविली होती. अमोघ व पहिल्या प्रतीच्या शस्त्रास्त्रांचा सांठा त्याजवळ होता. विदर्भराज इक्ष्वाकुपुत्र निमीचा तो जावई होता व अयोध्येच्या दशरथ राजाचा तो मित्र होता. दक्षिणेंत मलयपर्वत व लंका या रावणाच्या राजधानींतसुद्धां त्याची वस्ती असे. द्राविड भाषांचा प्राचीन व्याकरणकार, अगस्त्यच आहे. जावासुमात्रा बेटांत आजहि अगस्त्यमंदिरें आढळतात.

दाशरथि रामालासुद्धां दक्षिणेंत आल्यावर याच्या दर्शनाला जाणें आवश्यक वाटलें. यानेंहि पण रामाला नुसता 'विजयी भव' असा आशीर्वाद दिला नाहीं, तर उत्कृष्ट शस्त्रास्त्रें पुरविलीं. म्हणूनच अगस्त्याला दक्षिणाविजेता म्हटलेलें आहे.[1]

अगस्त्य दक्षिण दिशेला येण्यापूर्वी दक्षिणापथाकडे जाणें म्हणजे मृत्यूच्या जबड्यांत शिरणें अशी समजूत होती. पण त्यानें राक्षसांवर छाप बसवून त्यांना आपल्या भजनीं लावलें. त्याच्या आश्रमाला राक्षसांचा बिलकूल त्रास नव्हता. हा आल्यापासून राक्षस लोकांनीं वैर सोडून ते शांत झाले.[2] हें वर्णन केलेलें अगस्त्याचें काम अत्यंत महत्वाचें आहे. तें अनेक पिढ्या चाललेलें असलें पाहिजे. रामायणांतल्या व पुराणांतल्या वर्णनावरून

---

१ ब्रह्म. ११८·१५९.   २ निगृह्य तरसा मृत्युं लोकानां हितकाम्यया । दक्षिणा दिक् कृता येन शरण्या पुण्यकर्मणा ॥ तस्येदमाश्रमपदं प्रभावाद्यस्य राक्षसैः । दिगियं दक्षिणा त्रासाद् दृश्यते नोपभुज्यते ॥ यदाप्रभृति

तें तसेंच दिसतें. रामापूर्वी किती अगस्त्य झाले होते व रामाला भेटलेला अगस्त्य कितवा होता याचा तपशील आपणांस उपलब्ध नाहीं.

वैदिकांत अगस्त्य हें गोत्रहि आहे. देशस्थ, कोकणस्थ व कऱ्हाडे या तीन ऋग्वेद्यांपैकीं ब्राह्मणांत अगस्त्य गोत्र फक्त देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणांतच आहे. दक्षिणेंत अगस्त्य येण्यापूर्वींपासून पुलस्त्य, पुलह आणि क्रतु हीं गोत्रें स्थिर झालेलीं होतीं. त्या गोत्रांपैकीं पुलस्त्य गोत्रांत रावणासारखे लोक उत्पन्न झाले होते. हीं तीनहि गोत्रें पुढें अगस्त्य गोत्रांतच समाविष्ट झालीं.

उत्तरेकडील लोक इंद्रपूजक असून दक्षिणेकडील लोक मरुतांचे उपासक होते. प्रथम या दोघांमध्यें विरोध होता. पण अगस्त्यानें इंद्र आणि मरुत यांच्यांतील विरोध नष्ट करून दोघांत एकोपा घडवून आणला.[१]

या सर्व घडामोडींचा अर्थ दोन संघर्ष पावणाऱ्या संस्कृतींचें एकीकरण अगस्त्यानें केलें असा होतो. याला दाक्षिणोत्तर संस्कृतींचें एकीकरण म्हणण्याऐवजी आर्यद्राविड संस्कृतींचें एकीकरण असें कोणीं म्हटल्यास चालेल किंवा नाहीं हें पाहिलें पाहिजे.

### ५ महाराष्ट्रांतील ब्राह्मणांच्या वसाहतीचा क्रम—

मागील विवेचनावरून महाराष्ट्रांतील वसाहत वैवस्वत मनूच्या वेळेपासून असल्याचें दिसून येते. त्यापूर्वी ती केव्हांपासून आहे, हें सांगतां येत नाहीं. अगस्त्य हा पहिला वैदिक मंत्रकर्ता ऋषि महाराष्ट्रांत होता. त्यानें उत्तरेकडून विंध्य ओलांडून येऊन महाराष्ट्रांत व दाक्षिणेंत वसाहत केली. अगस्त्य हेंच नांव कुल आणि व्यक्ति अशा दोन्ही अर्थानें वापरलेलें आहे. विशेष नामांचा उल्लेख सांपडत नाहीं. पण निमिकन्या लोपामुद्रेशीं विवाह करणारा अगस्त्य आणि दाशरथि रामाच्या वेळचा अगस्त्य एक असणें शक्य नाहीं. यावरून दक्षिणेंत येऊन अगस्त्यांचें काम

चाक्रान्ता दिगियं पुण्यकर्मणा। तदाप्रभृति निर्वैराः प्रशांता रजनीचराः ॥
— वा. रा. ३·११·८१·८३. १ ऋ.१·१६५.

अनेक पिढ्या चाललें होतें हें स्पष्ट होतें. यापूर्वीहि दक्षिणेंत सुसंस्कृत अशीं राज्यें चाललेलीं होतीं. पुलस्त्य, पुलह, क्रतु वगैरेसारखे ब्राह्मण, धर्मनिष्ठ म्हणून वावरत होते. तथापि आपणांस वेदांत आणि पुराणांत प्रत्यक्ष पुराव्यानें दिसणारा दक्षिणेचा वैदिक वसाहतकार अगस्त्यच आढळतो. त्या वेळेपासून इतर वैदिक ऋषींचे आश्रम इकडे असले तरी त्याला दुहेरी पुराव्याचा आधार नाहीं.

भारती युद्धानंतर व्यासानें वेदांच्या संहिता बनविल्यावर इतर वेद प्रत्यक्षपणें अस्तित्वांत आले. तो वेळपर्यंत त्या वेदाच्या प्रमुखांचा विशेष निर्देशहि कोठें सांपडत नाहीं. भारती युद्धानंतर कृष्णद्वैपायनाचा शिष्य वैशंपायन आणि त्याचा शिष्य याज्ञवल्क्य उत्पन्न झाला आणि त्यांच्या तंट्यांतून शुक्ल व कृष्ण असे यजुर्वेदांत दोन भेद पडले. याज्ञवल्क्याला राजाश्रय मिळाल्यानें वैशंपायनाचे अनुयायी कृष्णयजुर्वेदी यांना दक्षिण हिंदुस्थानचा समुद्रकांठ गांठावा लागला. त्यांचीं सर्व सूत्रें दक्षिण हिंदुस्थानांतच लिहिलीं गेलीं. या सर्व इतिहासावरून व प्रत्यक्ष असणाऱ्या कृष्णयजुर्वेदी लोकांवरून दक्षिणेंतील दुसरे वैदिक वसाहतकार कृष्णयजुर्वेदी दिसतात. हे कृष्णयजुर्वेदी लोकहि प्रत्यक्ष उत्तरेकडून आलेले नाहींत. येथीलच मूळच्या ऋग्वेदी लोकांनीं कृष्णयजुर्वेदाचा स्वीकार केलेला दिसतो. कारण त्यांच्यांत उत्तरेकडील कोणत्याहि चालीरीती किंवा उच्चारपद्धति नसून सर्व दक्षिणेकडीलच पद्धति आहेत. मातुलकन्यापरिणयादि दाक्षिणात्यांच्या चालींचा अगत्यपूर्वक निर्देश करणारीं कृष्णयजुर्वेदाचीं सूत्रें होत. म्हणजे हे खरोखर दुसरे वसाहतकार नसून ऋग्वेद्यांपैकीं कृष्णयजुर्वेद स्वीकारणारा एक पोटभेद आहे. यानंतर शुक्लयजुर्वेदाची लाट उसळली. तींतहि महाराष्ट्रांतील कांहीं पूर्वींचे ऋग्वेदी व कृष्णयजुर्वेदी ब्राह्मण सामील झाले असावेत. त्यांनीं मात्र आचारविचार व उच्चाराच्या बाबतींत निराळेपणा स्वीकारला.

## प्रकरण ६ वें,

# महाराष्ट्राची वसाहत ( उत्तरार्ध )

**अरे हें पाहिलेंचि पाहावें। विवरलेंचि मागुती विवरावें॥**
**वाचिलेंचि वाचावें। पुन्हा पुन्हा॥** -दास. ११-८-९

### १ प्रास्ताविक—

मागील लेखांत ऐतिहासिक साधनांवरून आपण देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणांच्या महाराष्ट्रांतील वसाहतींचा शोध लावण्याचा प्रयत्न केला. आतां चालीरीतींवरून त्या शोधास किती आधार मिळतो हें आपणांस पाहावयाचें आहे. त्याकरितां या समाजांतील विवाहविषयक चालींचा आपण प्रथम विचार करूं. कारण विवाह ही समाजांतील अत्यंत महत्त्वाची बाब असून विवाहाच्या चालीरीतींत अत्यंत महत्त्वाच्या चालींचें अवशेष अद्यापि आढळतात आणि ग्रंथांतहि त्यासंबंधाचे महत्त्वाचे निर्देश उपलब्ध होतात. मानवसमाजाच्या अगदीं प्रारंभींच्या काळीं स्त्रीपुरुषांच्या शरीरसंबंधाच्या बाबतींत कांहींच नियम नसावेत.

### २ ऋग्वेदांतील शरीरसंबंधाच्या मर्यादा—

ऋग्वेदांतील कांहीं सूक्तांत विवाहविषयक अनेक गोष्टींचा निर्देश आहे. मुलीकरितां मागणी घालणें,[१] बापानें किंवा भावानें मुलीला देणें,[२] अहेर देणें,[३] सासू, सासरे, नणंदा यांच्यावर मुलीला आधिपत्य मिळण्याची इच्छा,[४] म्हातारपणापर्यंत संबंध टिकण्याची प्रार्थना,[५] अत्यंत त्रास होत

---

१ यदाश्विना पृच्छमानावयातम्। (ऋ. १०·८५·१४). २ पिता यत्र दुहितुः सेकमृंजन्। ( ऋ. ३.३१.१ ). ३ ऋ. १०.८५.१३,३८. ४ सम्राज्ञी श्वशुरे भव ( ऋ. १०.८५.४६ ). ५ मया पत्या जरदष्टिर्यथा सः ( १०.८५.२७.३६ ).

असतांहि नवऱ्याचें घर न सोडणें[1] या स्वरूपाचे ते निर्देश होत.

यमयमीसंवाद–सूक्तांत सख्या बहिणीभावांचा संबंध अत्यंत निंद्य होय हें प्रेमयाचना करणाऱ्या आपल्या बहिणीस यमानें स्पष्ट बजावून व तिच्या प्रेमयाचनेचा निषेध केला आहे.[2] तसेंच पितापुत्रीसंबंधाला 'अकृतं' म्हणजे 'करूं नये असें धर्मविरुद्ध आचरण' असें म्हणून त्याचा तिरस्कार केला आहे.[3] पण आतेबहीण व मामेबहीण यांच्या विवाहाचा ऋग्वेदांत निर्देश सांपडतो.[4] तेव्हांपासून सुरू असलेली ही पद्धत अद्यापहि दक्षिणेंतील ब्राह्मणांत चालू आहे.

देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणांत मामेबहिणीशीं व आतेबहिणीशीं विवाह करण्याची आज पद्धत आहे. कऱ्हाडे ब्राह्मण व दक्षिणेंतील क्षत्रिय घराण्यांतहि ही चाल आहे. दाक्षिणी ब्राह्मणांतील या चालीचा ख्रि. पू. ५०० च्या पूर्वी झालेल्या बौधायनधर्मसूत्रांत उल्लेख आहे. ऋग्वेदाच्या परिशिष्टांतील एका मंत्रांतहि या चालीचा निर्देश सांपडतो. त्या मंत्राचे उलटसुलट अर्थ टीकाकारांनीं केलेले आहेत. प्रत्यक्ष चालू असणाऱ्या चालीवरून, अनेक टीकाकारांनीं अनुकूल अर्थ करून या चालीस उचलून धरलेलें आहे. त्यावरून, बौधायनानें केलेल्या निर्देशावरून आणि ऋग्वेदाच्या परिशिष्टांतील निर्देशावरून ही चाल देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणांत ऋग्वेदांतील मंत्रकालापासून चालू आहे हें स्पष्ट होतें. उत्तरेकडे ही चाल नाहीं. क्षत्रियांपैकीं दक्षिणेशीं विशेष संबंध असलेल्या यादव घराण्यांत अशीं कांहीं लग्नें झाल्याची माहिती पुराणांत सांपडते. ययातीनें यदूला मातुलकन्यापरिणय व

---

१ ऋ. १०. ३४.१०. २ न वा उ ते तन्वा तन्वं सं पपृच्यां पापमाहुर्यः स्वसारं निगच्छात्। (ऋ. १०.१०.१२) ३ ऐ. ब्रा. ३.३३. ४ आ याहींद्र पथिभिरीळितेभिर्यज्ञमिमं नो भागधेयं जुषस्व। तृप्तां जहुर्मातुलस्येव योषा भागस्ते पैतृष्वसेयी वपामिव ॥ (ऋ.परि. १४.६).

मातृद्रव्याचे वांटेकरी होण्याचा शाप दिला होता.[1] प्रद्युम्न-रुक्मवती, अनिरुद्ध–रोचना, परीक्षित--इरावती हीं मातुलकन्यापरिणयाचीं पुराणांतील उदाहरणें होत.

## ३ विवाहसंस्थेचा काल—

उद्दालकपुत्र श्वेतकेतूनें विवाहसंस्था स्थापन केली.[2] हा उद्दालकपुत्र श्वेतकेतु कोण ? पण्डूनें कुन्तीला इतरांपासून पुत्र उत्पन्न करण्यास सांगतांना याचा व यानें स्थापन केलेल्या विवाहसंस्थेचा निर्देश केला आहे. वास्तविक ' व्युचरन्त्याः पतिं नार्या अद्यप्रभृति पातकम् ' या नियमाचा आणि ' मी सांगतों म्हणून तूं कोणापासूनहि पुत्र उत्पन्न कर, नाहीं तर तुला पाप लागेल ' याचा कांहींएक संबंध नाहीं. महाभारतांत कुन्तीशीं झालेल्या पण्डूच्या भाषणांतील हा भाग विपर्यासानें जोडलेला दिसतो.

श्वेतकेतूच्या आईला बलात्कारानें दुसरा मनुष्य संभोगाकरिता नेऊं लागला असतां श्वेतकेतूनें पित्याकडे तक्रार केली. तेव्हां पित्यानें स्त्रिया अनावृत ( असंरक्षित ) आहेत, कोणीहि त्यांच्याशीं संभोग करणें हा सनातन धर्म आहे.[3] असें सांगितलें. पण श्वेतकेतूला हें सहन झालें नाहीं आणि त्यानें ' पतीखेरीज अन्य पुरुषाशीं संगत झाल्यास पातक लागेल ' असा नियम केला. या नियमाचा अर्थ पण्डूनें निराळाच करून कुन्तीला कोणापासूनहि पुत्र उत्पन्न करण्यास सांगितलें आहे, आणि हा श्वेतकेतूचा नियम ' न चिरात् ' म्हणजे नुक्ताच झाला आहे असें म्हटलें आहे. हें खरें मानल्यास उद्दालकपुत्र श्वेतकेतु नांवाची व्यक्ति पण्डूपूर्वी नुक्तीच

---

१ पद्मभू. ६४.८३. २ महाभारत आदि. १२२.१०–२०. ३ अनावृता किल पुरा स्त्रिय आसन् वरानने । कामचारविहारिण्यः स्वतंत्राश्चारुहासिनि ॥ तासां व्युच्चरमाणानां कौमारात् सुभगे पतीन् । नाधर्मोऽभूत् वरारोहे स हि धर्मः पुराऽभवत् ॥ अस्मिंस्तु लोके नचिरात् मर्यादेयं शुचिस्मिते ।—महाभारत, आदि. १२२.४.५.८.

होऊन गेली असें मानलें पाहिजे.

### ४ गोत्र, पिण्ड व जात यांची उपपत्ति—

विवाहसंस्थेचें ध्येय सुप्रजाजन हें आहे. वनस्पति आणि पशुपक्षी यांच्या निरंतर अवलोकनानें मनुष्यांच्या मनांत अनेक प्रकारच्या ठोकताळयांचा संग्रह होणें स्वाभाविक आहे. माणसाच्या एका आयुष्यांत त्याला वनस्पति व पशुपक्षी यांच्या अनेक पिढ्या पाहावयास मिळतात. त्यावरून एकरक्तसंबंधाचे अनिष्ट परिणाम त्यांच्या ध्यानांत आले आणि त्यांनीं एका गोत्रांत विवाह करणें अनिष्ट ठरविलें. गोत्र वर्ज्य करण्याच्या नियमानें पितृवंश, विवाहाला टाळतां आला, पण मातृवंशसुद्धां कांहीं पिढ्या टाळण्याची त्यांना आवश्यकता वाटूं लागली. कारण शरीरांतील कांहीं भाग बापाकडून आलेले असतात तसेंच कांहीं भाग मातेकडून आलेले असतात.[1] म्हणून बापाकडून सात पिढ्या आणि मातेकडून पांच पिढ्या सपिण्ड मानाव्यात असें ठरविलें आहे. माता ही केवळ बीजवाहकच नसते, तर बीजांतील गुणांचें संरक्षण व संवर्धनहि तिला करावयाचें असतें, म्हणून ती सजातीय पाहिजे असा नियम करावा लागला.[2] अशा तऱ्हेनें सुप्रजा निर्माण करण्याकरितां असगोत्र, असपिण्ड, सजातीय विवाह करावयास पाहिजे असें ठरविण्यांत आलें.

हे नियम स्पष्टपणें प्रथम धर्मसूत्रांत आढळतात. त्यापूर्वींच्या वाङ्मयांत त्यांचीं थोडीं बीजें आढळतात. गोत्राच्या पद्धतीचें मूळ असणारे विद्यावंश प्रथम उपनिषदांच्या शेवटीं दिलेले दिसतात. नंतर सूत्रग्रंथांच्या

१ एतत्षाट्कौशिकं शरीरं त्रीणि पितृतस्त्रीणि मातृतः आस्थिस्नायुमज्जानः पितृतः त्वङ्मांसरुधिराणि मातृतः।— श्रुतिः निर्णयसिंधु पा. २०५.
२ पतिर्जायां प्रविशति गर्भो भूत्वा स मातरम् । तस्यां पुनर्नवो भूत्वा दशमे मासि जायते ॥ तज्जाया जाया भवति यदस्यां जायते पुनः ॥
( ऐ. ब्रा. ७.१३ ).

शेवटीं गोत्रावळ्या दिल्या आहेत. उपनिषदें आणि सूत्रग्रंथ पाठोपाठ झालेलें वाङ्मय आहे. सूत्रग्रंथांपासून सजातीय, असगोत्र आणि असपिण्ड हे विवाहांत आवश्यक नियम मानण्यांत येऊं लागले. गोत्रावळींत ब्राह्मणकारांच्यानंतर सूत्रकारांपर्यंत गोत्रकार म्हणून समावेश झालेला आढळतो. यावरून विवाहसंस्थेबरोबरच गोत्रसंस्था व सपिंण्ड–संस्था सुरू झाल्याचें स्पष्ट होतें. सपिण्डसंस्था ही मातृकुलाकडून होणारा एकरक्तदोष टाळण्याचा प्रयत्न आहे. म्हणजे गोत्र व पिण्ड या दोन्ही संस्था एकाच हेतूनें व एकाच वेळीं अमलांत आणण्यास सुरवात झाली.

असगोत्र, असपिण्ड हे सर्वमान्य होण्यासारखे होते. त्याप्रमाणें त्यांना मान्यता देण्यांत आली. असपिंडाशीं विवाह करणें शास्त्रशुद्ध ठरविल्यानंतर आतेबहीण व मामेबहीण यांच्याशीं लग्न करण्याची पद्धत सोडून देणें आवश्यक होतें. पण ती इतकी रूढ झाली होती कीं, ती सोडून देणें तर दूरच राहो पण तिच्या विरुद्ध बोलणेंहि समाजांत अशक्य होतें. अशी मातुलकन्यापरिणयाची चाल देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणांत मंत्रकाळापासून आहे आणि त्याचीं नोंद वेगळाल्या कालखण्डांत सांपडत असल्यानें हा पुरावा देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणांची दाक्षिणेंतील व महाराष्ट्रांतील वसाहत भारतीयुद्धापूर्वी मंत्रकालीन आहे हें सिद्ध करतो.

कांहीं धर्मसूत्रांत[१] दाक्षिणात्यांच्या विशेष चालींचा निर्देश आहे. त्यांत पुढील पांच चाली दिल्या आहेतः—

१. मुंजींत, मुलाचें मातेच्या ताटांतील एकत्र भोजन ( मातृभोजन )
२. नवरानायकोंचें एका ताटांतील भोजन.
३. शिळें खाण्याची चाल.

---

१. पंचधा विप्रातिपत्तिर्दाक्षिणतस्तथोत्तरतः । यानि दाक्षिणतस्तानि व्याख्यास्यामः । यथैतदनुपेतेन सह भोजनं, स्त्रिया सह भोजनं, पर्युषितभोजनं मातुलपितृष्वसृदुहितृगमनामिति ॥ बौधायनधर्मशास्त्र १.१.२.१.३.

४. मामाच्या मुलीशीं लग्न. ५. आतेच्या मुलीशीं लग्न.

या सर्व चाली महाराष्ट्रांतील व कर्नाटकांतील देशस्थ ऋग्वेदी व कृष्ण-यजुर्वेदी ब्राह्मणांत चालू आहेत. या प्रांतांत दे. ऋ. ब्रा. चें वर्चस्व असल्यानें तत्सम व इतर सर्व जातींनीं या रीती उचललेल्या आहेत. चित्पावन ब्राह्मण मात्र मामेबहीण व आतेबहीण यांच्याशीं लग्न करण्याची चाल आमची नाहीं असें मानतात. शुक्लयजुर्वेदी ब्राह्मण, बापाप्रमाणें मामाचें गोत्रहि वर्ज्य मानीत असल्यानें त्यांच्यांत या चालीचा संभव नाहीं, आणि त्या शुक्लयजुर्वेदी लोकांचा निर्देशहि बौधायनादि सूत्रें करीत नाहींत. बौधाय-नादि सूत्रें खि. पू. ५०० च्या पूर्वी झालेलीं आहेत. त्या वेळीं तरी दाक्षिणात्य ब्राह्मण म्हणजे दे. ऋ. ब्रा. व कृष्णयजुर्वेदी बौधायनादि शाखेचे ब्राह्मणच समजले जात असत असें स्पष्ट होतें.

या मंत्रकालापासून दक्षिणेंतील दे. ऋ. ब्राह्मणांत रूढ असणाऱ्या आचारांना अगदीं उघडपणें मान्यता देऊन धर्म्य म्हणून त्यावर स्मृतिकारांना शिक्कामोर्तब करावा लागला.[1]

आतां हाच आपल्या दक्षिणेंतील वसाहतीच्या प्राचीनपणाचा मुद्दा स्त्रियांच्या व्रतावरून कसा सिद्ध होतो तें पाहूं.

### ४ स्त्रियांचें उपनयन व सूर्यव्रतें—

पूर्वी स्त्रियांत दोन वर्ग असत.[2] वयांत आल्याबरोबर विवाह करणाऱ्या स्त्रियांचा एक वर्ग. त्यांना 'सद्योवधू' असें म्हणत. दुसऱ्या प्रकारच्या

---

१. यस्मिन् देशे त्वनाचारो न्यायदृष्टः सुकल्पितः । स तस्मिन्नेव कर्तव्यो नान्यदेशे स ईरितः ॥ यस्मिन् देशे पुरे ग्रामे त्रैविद्ये नगरेऽपि वा । यो यत्र विहितो धर्मस्तं धर्मं न विचारयेत् ॥ (देवल, संस्काररत्नमाला पा. ४१२).

२ द्विविधाः स्त्रियो ब्रह्मवादिन्यो सद्योवध्वश्च । तत्र ब्रह्मवादिनीनाम् उपनयनं अग्नीन्धनं वेदाध्ययनं स्वगृहे च भैक्षचर्या ॥ स्मृतिचंद्रिका-हारीत. १।२४.

स्त्रिया आजन्म ब्रह्मचारिणी राहून आपलें आयुष्य विद्याव्यासंगांत घालवीत. त्यांना ब्रह्मवादिनी म्हणत. याशिवाय विवाह करण्याची इच्छा असूनहि कांहीं तरी दोषानें विवाह न होतां बापाच्याच घरीं वयातीत होण्याचा प्रसंग ज्यांच्यावर आला आहे अशा स्त्रियांचा त्यांत ऋग्वेदांतील वृद्ध-कुमारी घोषेचें नांव सांगतां येईल.

मुलाप्रमाणें मुलींचेंहि पूर्वीच्या काळीं उपनयन होत असे. पण पुढें स्त्रियांचें उपनयन करण्याची पद्धत बंद करण्यांत आली. ही पद्धत बंद होतांना समाजांतील ज्ञात्यांत दोन पक्ष पडले. उलटसुलट पक्षांची नोंद पूर्वमीमांसेच्या जैमिनिसूत्रांत आपणांस पाहावयास सांपडते. पण शेवटीं स्त्रियांचें उपनयन करूं नये अशा पक्षाचा जय झाला आणि स्त्रियांचें उप-नयन करण्याची प्रथा बंद पडली. पण महाराष्ट्रांतील दे. ऋ. ब्राह्मणांना स्त्रियांचीं उपनयनें बंद करण्याची प्रथा पसंत पडल्याचें दिसत नाहीं. स्त्रियांचें उपनयन चालू ठेवावें म्हणणाऱ्या आचार्यांत दाक्षिणेंतील किंवा महाराष्ट्रांतील कोण होते हें जरी आज सांगतां येत नसलें तरी त्यांनीं सूर्यव्रतें चालू करून ' स्त्रियांचीं उपनयनें ' जणूं काय चालूच ठेविलीं आहेत असें दिसतें.

आपल्या ब्रह्मयज्ञांतील तर्पणांत वडवा प्रातिथेयी, गार्गी वाचक्नवी, सुलभा मैत्रेयी या स्त्रियांचें आपण नित्य तर्पण करीत असतों. उपनिषदांत याज्ञवल्क्यासारख्या थोर तत्वज्ञान्यांशीं निर्भयपणें वादविवाद करतांनाहि यापैकीं कांहीं आपणांस आढळतात. यांचें नेमकें ऋग्वेदविषयक कार्य कोणतें हें जरी आज आपणांस दाखवितां येत नसलें, तरी तर्पणांतील इतर आचार्यांच्या महत्वाच्या कामगिरीवरून यांनींहि तसेंच भरीव व महत्वाचें कार्य केलें, म्हणूनच तर्पणांत नांव घालून त्यांचें नित्यस्मरण कर-ण्याची पद्धत सुरू असली पाहिजे.

काशकृत्स्निन् आचार्यानें काशकृत्स्न नांवाचा वैदिक ग्रंथांचा अर्थ

करण्यास उपयोगी पडणारा पूर्वमीमांसेवर ग्रंथ लिहिला. त्याचें अध्ययन करणाऱ्या स्त्रियांस "काशकृत्स्ना" असें म्हणत असें पतंजलीनें आपल्या व्याकरणमहाभाष्यांत दाखविलें आहे ( खंड २, पान २०६ ).

तेव्हां सुशिक्षित स्त्रिया समाजांत पुष्कळ होत्या. त्यांपैकीं कांहीं आजन्म ब्रह्मचर्य पाळीत व शिक्षणासारख्या व्यवसायांत आपलें आयुष्य घालवीत. त्यांच्याकरितां भाषेंत स्वतंत्र शब्द रूढ होते. ते वार्तिककार कात्यायनाला आपल्या वार्तिकग्रंथांत नमूद करावे लागले. वार्तिककार कात्यायन हा दाक्षिणात्य होता असें पतंजलीच्या लिहिण्यावरून ठरतें. दक्षिणेकडील स्त्रियांना पूर्वी व आतां उत्तरेपेक्षां स्वातंत्र्य अधिक आहे. आचार्या, आचार्यानी, उपाध्याया, उपाध्यायानी हे ते शब्द होत. यांपैकीं पहिला शब्द स्वतः शिकविणाऱ्या स्त्रीस लावीत आणि दुसरा शिकविणाऱ्याच्या पत्नीस लावीत. ती स्वतः शिकविणारी नसे.

अशी विद्येची उज्वल परंपरा खि. पू. पांचव्या शतकापर्यंत असणाऱ्या दक्षिणेंतील आम्हां लोकांना उपनयन न करण्याचा आदेश सहज मानणें शक्य नाहीं हें उघड आहे.

सूत्रकालीं स्त्रियांच्या उपनयनाची प्रथा बंद पडली आणि अनेक देवतांचीं व्रतें उत्पन्न होण्यास सुरवात झाली. स्त्रियांच्या भाविक वृत्तीला वैदिककर्मांत स्वातंत्र्यानें वावरण्यास प्रतिबंध करण्यांत आल्याबरोबर त्यांच्या नैसर्गिक धर्मप्रवण वृत्तीनें पौराणिक व्रतांनीं आपलें समाधान करून घेण्यास सुरवात केली. सूर्योपासना, यज्ञोपवीत, उत्सर्जन ( माघ ), व उपाकर्म ( श्रावण ), हे उपनयनाचे महत्त्वाचे भाग होत.

श्रावणांतील प्रत्येक रविवारीं स्त्रिया सूर्यव्रत पाळीत असतात. त्या दिवशीं सूर्योदयापूर्वी उठून स्नान होईपर्यंत मौन धारण करतात. शिळें पाणी ताज्या पाण्यांत मिसळूं न देतां ताज्या पाण्यानें स्नान केल्यावर मौन सोडतात. नंतर रक्तचंदनानें पाटावर सप्ताश्वयुक्त सूर्यमंडळ काढून

त्याची पूजा करतात. गूळखोबऱ्याचा नैवेद्य दाखवितात व त्या दिवशीं धान्यफराळ करतात. पूजेच्या वेळीं सूर्याला कापसाच्या पांढऱ्या दोऱ्यांचें बारापदरी ' पोत ' वाहतात. पूजेनंतर ते पोत स्वतःच्या गळ्यांत बांधतात आणि माघशुद्ध सप्तमीला-रथसप्तमीला—दांपत्याला गुळाच्या पोळ्यांचें जेवण घालून त्या ' पोतां ' चें विसर्जन करतात. हें व्रत जुन्या वळणाच्या बायका अत्यंत साक्षेपानें पाळतात.

हें सूर्यव्रत, पोत, त्याच्या धारणविसर्जनाचा काळ आणि त्या व्रताबद्दलची आस्था या सर्व गोष्टी हें व्रत उपनयनाचें प्रतिनिधिभूत असावें असें सुचवतात.

स्त्रियांचें उपनयन करण्याविषयीं मतभेद उत्पन्न झाल्याची नोंद जैमिनी-च्या पूर्वमीमांसासूत्रांत आहे. त्यांत जैमिनि—बादरायण हे जुने आचार्य उप-नयन करावें अशा मताचे असून ऐतशायन वगैरे नवीन उदयाला आलेले आचार्य स्त्रियांचें उपनयन करूं नये अशा मताचे आहेत. जैमिनि-बाद-रायणांचा सध्यां उपलब्ध असणारा सूत्रपाठ मूळ स्वरूपांत आपल्यापुढें नसला तरी जैमिनि—बादरायणांचे काल बऱ्याच निश्चित स्वरूपांत आपल्या-पुढें आहेत. ब्राह्मण व उपनिषद्ग्रंथांचे अर्थ निश्चित करण्याकरितां या दोघांची पूर्वोत्तरमीमांसा सूत्रें प्रसिद्ध आहेत. उपनयन, यज्ञोपवीत, ब्रह्मचर्य, गुरु, विद्या यांचें महत्त्व याच कालीं ग्रंथांत आपणांस विशेष आढळतें. गृह्यसूत्रकारांनीं प्रथम हा संस्कार नक्की स्वरूपांत स्पष्टपणें मांडला. तेथें त्यांनीं केलेल्या निर्देशावरून स्त्रियांचें उपनयन बंद झालेलें दिसतें. व्रत-द्वारा सूर्याची उपासना खि. पू. पांचव्या शतकापूर्वी असणाऱ्या भविष्य-पुराणांत आढळते. ऐतरेयब्राह्मणकालीं व उपनिषदांत वैदर्भतत्त्वज्ञान्याचें महत्व उत्तरेकडेहि दिसतें. त्याच वेळीं दक्षिणेंत महाराष्ट्रांतहि स्त्रियांचें उप-नयन बंद होऊन त्यांचीं प्रतिनिधिभूत सूर्यव्रतें सुरू झालेलीं दिसतात. हा काल भारतीयुद्धानन्तर आणि सूत्रग्रंथाच्या पूर्वीचा होय. अशी सूर्यदेव-

तेच्या उपासनेची प्राचीन परंपरा लक्षांत घेऊनच श्रीशंकराचार्यांना पंचायतनपूजेंत सूर्यदेवतेचा समावेश करणें भाग पडलें. वैदिककालापासून आतांपर्यंत अखंड आढळणाऱ्या सूर्यदेवतेशीं संबंध हा आपल्या वैदिक परंपरेवर आणि वैदिकपरंपरेशीं अखंड संबंध ठेवण्याच्या वृत्तीवर प्रकाश पाडतो.

महाराष्ट्रांत दे. ऋ. ब्राह्मणांची वसाहत भारतीयुद्धाच्या पूर्वी मंत्रकालीं झालेली आहे. ती दाशरथि रामाच्या पूर्वी अगस्त्यानें केली. इक्ष्वाकुपुत्र निमि या विदर्भराजाची मुलगी लोपामुद्रा, अगस्त्याला दिली होती. या गोष्टी मागील लेखांत ऐतिहासिक आधारें सिद्ध केल्या. या लेखांत विवाहाच्या चालीवरून वसाहतीचा प्राचीनपणा कसा सिद्ध होतो, हें दाखविलें आहे. मंत्रकालीं मामेबहीण व आतेबहीण यांचे विवाह चालू होते. मधील कालांत विवाहसंस्था स्थापन होऊन असगोत्र, असपिण्ड व सजातीय वगैरे नियम विवाहाच्या बाबतींत ठरविण्यांत आले. हे नियम सर्वांनीं उपयुक्त म्हणून मान्य केले, तथापि मंत्रप्रतिपादित व रूढ म्हणून आतेमामेबहिणीशीं चालू असलेले विवाह तसेच चालू ठेवण्यांत आले. मंत्रकालापासून चालू असलेली या चालीची अखंड परंपरा दे. ऋ. ब्रा. च्या दक्षिणेंतील वसाहतीचा मंत्रकालीनपणा स्पष्टपणें सिद्ध करते.

तसेंच स्त्रियांचें उपनयन बंद करण्यांत आलें तेव्हां त्याला प्रतिनिधिभूत सूर्यव्रत सुरु करून स्त्रियांच्या उपनयनाची परंपरा पुढें चालविण्यांत आली. उपनयनामुळें प्राप्त होणारी सूर्योपासना, यज्ञोपवीत, उत्सर्जन व उपाकर्म या गोष्टी सूर्यपूजा, पोत, श्रावण (पोतग्रहण), माघांतील रथसप्तमी ( पोतविसर्जन ) हीं कृत्यें करून साधण्यांत आल्या. अशा पद्धतीनें स्त्रियांनींसुद्धां, त्यांचा वेदाधिकार व उपनयनाधिकार काढून घेतला असत आपलें वैदिक संस्कृतीशीं चिकटून राहण्याचें व्रत अखण्ड कायम ठेवलें आहे. यावरून दे. ऋ. ब्रा. चा वैदिक संस्कृतीशीं असणारा अढळ संबंध व दक्षिणेंत महाराष्ट्रांतील प्राचीनपणा या दोन्ही गोष्टी सिद्ध होतात.

## प्रकरण ७ वें

# गौड व द्राविड ब्राह्मण.

**जो दुसऱ्याचें अन्तर जाणे। देश काळ प्रसंग जाणे॥**
**तया पुरुषा काय उणें। भूमंडळीं॥**—दास १४-७-२८.

**१. प्रास्ताविक—**

महाराष्ट्राच्या वसाहतीबाबत निर्णय ठरविल्यानंतर आतां हिंदुस्थानांतील ब्राह्मणांसंबंधी माहिती पाहावयाची आहे. हिंदुस्थानांतील एकंदर ब्राह्मण, त्यांचें ठोकळ वर्गीकरण आणि त्यांत महाराष्ट्र-ब्राह्मणांचें स्थान या क्रमानें आपणांस विचार केला पाहिजे. महाराष्ट्र हा जसा अखंड-भारताचा एक भाग आहे, त्याप्रमाणेंच महाराष्ट्र-ब्राह्मण हे सुद्धां वैदिक धर्माच्या चातुर्वर्ण्यापैकीं एका विशिष्ट संघटनेचा एक भाग आहे. सर्व ब्राह्मण एकच, पण ते वेगळाल्या प्रांतांत विभागल्यामुळें भाषाभेद उत्पन्न झाले; आणि त्यांच्यांत प्रान्तिक वैशिष्ट्यहि निर्माण होऊन ते परस्परांपासून अलग झाले. हवापाण्याच्या भेदामुळें त्यांच्या चालीरीती बदलल्या, अन्नांतहि एकरूपता राहिली नाहीं. पोषाखांत निराळेपणा उत्पन्न झाला, रंगरूपांत फरक पडला, उच्चारभेद उत्पन्न झाले; तथापि वैदिक धर्मांतील श्रुति, स्मृति, आणि पुराण यांचें प्रामाण्य आणि तन्मूलक आचार, ब्राह्मण म्हटला कीं त्याचे सर्व प्रान्तांत सारखेच आढळतात. प्रान्तिक चालीरीती व देवता स्वीकाराव्या लागल्या तरी मूळ देवता व आचार यांचें विस्मरण त्यांना अद्यापि झालेलें नाहीं. त्यामुळें हिंदुस्थानांतील सर्व प्रांतांत पसरलेल्या ब्राह्मणांत महाराष्ट्र-ब्राह्मणांचें स्थान आपणांस सहज शोधून काढतां येतें.

याबाबत वैदिकधर्मीयांच्या दृष्टिकोनाशीं आपणांस थोडा परिचय करून

घेतला पाहिजे. आर्यावर्ताच्या चतुःसीमांविषयीं त्यांचा दृष्टिकोन कसा विस्तृत होत गेला, आणि शेवटीं त्यांनीं आपलें क्षेत्र अखिल हिंदुस्थान कसें केलें हें ध्यानांत घेण्यासारखें आहे. तसेंच सर्व संघटनेला आधारभूत असणारी ब्राह्मणजात, पवित्र क्षेत्रें, शिव व देवी हीं दैवतें वगैरेंच्या स्थान-मर्यादेनें त्यांनीं सर्व देश संघटित केला.

## २ आर्यावर्ताच्या मर्यादेची वाढ—

धर्मसूत्रांत आर्यावर्ताची व्याख्या पुढीलप्रमाणें दिली आहे:--अदर्शन म्हणजे सरस्वती अन्तर्धान पावलेल्या प्रदेशाच्या म्हणजे कुरुक्षेत्राच्या पूर्वेस, कालक वन म्हणजे प्रयागाच्या पश्चिमेस, हिमालयाच्या दक्षिणेस आणि विन्ध्याच्या उत्तरेस असणाऱ्या प्रदेशास आर्यावर्त म्हणत.[1] मनूनें धर्म सूत्रांतील आर्यावर्ताला फक्त मध्यदेश असें म्हटलें आहे.[2] आणि आर्यावर्त मात्र मध्यदेशापेक्षां मनूनें विस्तृत मानला आहे.[3] म्हणजे मनूनें धर्मसूत्रा-प्रमाणें आर्यावर्ताची मर्यादा केवळ गंगायमुनांचा दुआब न मानतां जवळ-जवळ उत्तर हिंदुस्थानचा बहुतेक भाग मानला. आर्यावर्ताच्या बाहेरचे भाग कोणते हेंहि धर्मसूत्रकारांनीं नमूद केलें असून कांहींना अगम्य म्हणजे गमन केल्यास प्रायश्चित्तार्ह असेंहि मानलें आहे.

आर्यावर्त किंवा मध्यदेश याला धर्मशास्त्रकारानें फार महत्त्व दिलें आहे. तेथील आचार सर्वश्रेष्ठ व प्रमाणभूत आचार होत. गंगायमुनांचा दुआब हा या दृष्टीनें प्राचीन ग्रंथकारांनीं महत्त्वाचा मानला आहे. वैदिक ग्रंथांतसुद्धां तसाच उल्लेख आढळतो. पुढें आर्यावर्ताच्या संबंधीं ही

---

१. वसिष्ठधर्मसूत्र १-८, बौधायन धर्मसूत्र १·१–२५.

२. हिमवद्विन्ध्ययोर्मध्यं यत्प्राग्विनशनादपि ।
प्रत्यगेव प्रयागाच्च मध्यदेशः प्रकीर्तितः ॥ ( मनु. २·२१ ).

३. आसमुद्रात्तु वै पूर्वात् आसमुद्रात्तु पश्चिमात् ।
तयोरेवान्तरं गिर्योरार्यावर्तं विदुर्बुधाः ॥ ( मनु २·२२ ).

मर्यादा वाढतां वाढतां हिमालय व विन्ध्य अशी झाली. म्हणजे आर्यावर्त किंवा मध्यदेश, गंगा व यमुना यांच्या दुआबाच्या मर्यादांतून विस्तार पावत हिमवान् व विन्ध्य यांच्या मर्यादेंत येऊन बसला व पूर्वपश्चिम समुद्राची मर्यादा त्याला घालण्यांत आली. पुढें स्थलमर्यादा सोडून 'यत्र कृष्णमृगो चरति तावद्धि ब्रह्मवर्चसम्' असें मनुस्मृतींत सांगितल्यानें कृष्णमृग संचार करीत असलेला दक्षिण हिंदुस्थानहि आर्यावर्तांत समाविष्ट झाला. याला श्रेष्ठ म्हटलें कीं बाकीच्या भागाला कनिष्ठ म्हणणें ओघानेंच प्राप्त होतें. अशा दृष्टीनें स्वतःचा प्रांत श्रेष्ठ व इतर हीन अशीहि वृत्ति यांतून उत्पन्न झाली.

जुन्या पुराणांपैकीं ब्रह्मपुराणांत प्रथमच दक्षिणेकडील गोदावरी नदीचें माहात्म्य आढळतें. स्कंद या अर्वाचीन पुराणांत दक्षिणेकडील पुष्कळच तीर्थक्षेत्रांचीं वर्णनें विस्तृत प्रमाणांत आलीं आहेत. पद्मपुराणांतहि दक्षिणेंतील कांहीं स्थलांचा निर्देश आहे. शिवपुराणांत दक्षिणेकडील बारा ज्योतिर्लिंगापैकीं कांहीं स्थानांचा निर्देश आढळतो. भागवत व विष्णु या प्राचीन पुराणांत अगदीं दक्षिणटोकाच्या प्रदेशाला जितकें महत्व दिलेलें आहे, तितकें महाराष्ट्राला दिलेलें नाहीं. भागवतमाहात्म्यांत तर दक्षिणेकडे भक्तिमार्ग पुष्कळ असून महाराष्ट्रांत क्वचित आहे असें म्हटलें आहे.

यावरून एक गोष्ट ठळकपणें लक्षांत येते कीं, आर्यावर्तविषयक समजूत क्रमानें वाढत गेली आहे. गंगायमुनांचा दुआब, आणि नंतर हिमालय व विन्ध्य यांच्यामध्यें असलेला प्रदेश अशी आर्यावर्ताची मर्यादा वाढली. अयोध्या, मथुरा, माया ( हरिद्वार ), काशी, कांची ( दक्षिणहिंदुस्थानांतील ), अवन्तिका ( उज्जयिनी ), पुरी ( जगन्नाथपुरी ), द्वारवती ( द्वारका ) अशा सात पवित्र शहरांची गणना करून आर्यावर्ताच्या चतुःसीमा आणखी विस्तृत करण्यांत आल्या. याच्याहि पुढें शिवाचीं बारा ज्योतिर्लिंग हिमालयाच्या टोंकाला असणाऱ्या नेपाळच्या पशुपते-

श्वरापासून ते दक्षिणेच्या टोंकाला असणाऱ्या रामेश्वरापर्यंत दाखवून आर्यावर्ताला हिमालयापासून समुद्राच्या टोंकापर्यंत पोंचविण्यांत आलें. याशिवाय आणखीहि मर्यादांची वाढ देवीच्या १०८ स्थानांनीं काश्मीरच्या शारदापीठापासून ते आसामच्या कामाख्येपर्यंत केली आहे.

वैदिक धर्मांतील लोकांनीं आर्यावर्ताच्या चतुःसीमांचा कसा क्रमानें विकास केला हें आपण वर पाहिलें. विकासाप्रमाणें संकोच करण्याचेहि प्रसंग त्यांच्यावर आलेले असले पाहिजेत. गंगायमुनांचा दुआब हाच पवित्र देश, आणि अंगवंगकलिंगादि देशांत गमन करणें प्रायश्चित्तार्ह आहे, तसेंच ' समुद्रगमन करणाराला प्रायश्चित्त नाहीं ' वगैरे विधानें संकोचकालीन मनोवृत्ति दाखविणारींच आहेत. अशा संकोचविकासाच्या अनेक फेऱ्यांतून आपण गेलों आहोंत. आपल्या इतिहासांत मंत्रकाल हा मर्यादा वाढविणारा असून सूत्रकाल हा मर्यादा संकुचित करण्याचा काळ आहे. पुराणांनीं शेवटीं मर्यादा वाढविण्यास सुरवात केली आणि साधुसंतांनींहि वाढलेल्या मर्यादा संभाळण्याचाच प्रयत्न केला. यवनी आघातानें पुनः संकोचाकडे कल झुकला, पण आतां ' सब भूमि गोपालकी इसमे कहाँ है अटक ' अशी व्यापक व उत्साहवर्धक वृत्ति उत्पन्न झाली आहे.

इसवी सनानंतरच्या अशा विकासात्मक व्यापक संघटनेच्या प्रयत्नांतील दशविध ब्राह्मण ही एक अत्यंत महत्त्वाची संघटना आहे. तिचा विचार करतांना तिच्या मागें असणारी विचारसरणी लक्षांत न घेतल्यास अखिल भारतीय ब्राह्मणसंघटनेंतील महत्त्व आपल्या ध्यानीं येणार नाहीं. ब्राह्मण हें वैदिक धर्माचें मुख आहे. त्याच्या शक्तीवर वैदिक धर्माचें स्थैर्य अवलंबून आहे. त्यांना पुनः पवित्र तीर्थें, बारा ज्योतिर्लिंगें व एकशें आठ देवीचीं स्थानें यांची जोड देऊन अखिल भारतीय ब्राह्मणांची जूट करण्यांत आली.

३ जातिविषयक दृष्टिकोन—

हिंदुस्थानांतल्या अनेक जाती प्रथम क्षत्रिय होत्या, त्या क्रियालोपामुळें व ब्राह्मण दिसेनासे झाल्यामुळें शूद्र झाल्याचा निर्देश मनुस्मृतींत आहे.[१] त्यांत द्रविडांप्रमाणेंच काम्बोज, यवन, शक यांचा निर्देश आहे. येथें हे शूद्र झाले असें म्हटलें आहे, पण त्यांचाच क्षत्रियवाचक म्हणून पाणिनीनें, कात्यायनानें व महाभाष्यानें निर्देश केला आहे.[२] म्हणजे बौद्धधर्माच्या उदयाबरोबर ब्राह्मणधर्माचा ऱ्हास झाला. आणि कांहीं जाती क्षत्रियांच्या शूद्र व पुढें तर बाह्य समजल्या जाऊं लागल्या. यामुळें पाणिनि, कात्यायन, पतंजलि व मनुस्मृति असा ग्रंथांचा क्रमहि ठरतो, व मध्यहिंदुस्थानांतल्या लोकांची दक्षिणेकडील चोल, पल्हव, द्रविड व उत्तरेकडील काम्बोज, शक, यवन वगैरेंबद्दल वृत्तिहि कळते. जातिविषयक बाबतींतसुद्धां आपले कोण व परके कोण अशी संशयग्रस्त वृत्ति झाल्याचें वरील मनु वगैरे ग्रंथांतील उदाहरणांवरून स्पष्ट दिसतें. पण धीर न सोडतां धर्मच्युत जातींना त्यांनीं हीन ठरविलें आणि धर्ममार्गावर अढळ राहिलेल्या जातींची योग्यता वाढविली. बौद्धकालीन क्रान्तींत घडलेल्या सामाजिक वर्तनाचा हा परिणाम उघड दिसतो. याच वैदिक धर्माच्या संघटनेच्या दृष्टीनें हिंदुस्थानाच्या सर्व बाजूला पसरलेल्या, भाषा, अन्न आणि वेष यांनीं अगदीं भिन्न असणाऱ्या आणि प्रान्तिक परिस्थितीशीं एकरूप झालेल्या ब्राह्मणांच्या एकसूत्री संघटनेकडे आपणांस पाहावयास पाहिजे. ही संघटना कोणा महात्म्यानें निर्माण केली हें सांगतां येत नसलें तरी द्राविडगौड शब्दांनीं तिला जन्म दिला आणि सर्व ब्राह्म-

१. शनकैश्च क्रियालोपादिमा क्षत्रियजातयः । वृषलत्वं गता लोके ब्राह्मणादर्शनेन च ॥ पौण्ड्रकाश्चोलद्रविडाः कम्बोजा यवनाः शकाः । पारदा पल्हवाश्चीनाः किराता दरदाः खशाः ॥ ( १०.४३.४४. ) २ जनपदशब्दात् क्षत्रियादञ् । कम्बोजाः शकाः । पा. सू. ४.१.१६६

णांना तिनें एकत्र आणलें यांत संशय नाहीं.

**४ गौड व द्राविड—**

हिंदुस्थानच्या सर्व प्रांतांत ब्राह्मण आहेत. त्यांची वैदिक परंपरा अखंड आहे. श्रुति, स्मृति, सूत्रें, पुराणें हे त्यांचे धर्मग्रंथ असून ते सर्व संस्कृत भाषेंत आहेत. धर्म व संस्कृति यासंबंधींच्या सर्व गोष्टी ब्राह्मण पुरोहितांकडून संस्कृत भाषेंत करण्याची त्यांची रूढि आहे. वेदादि ग्रंथ, ब्राह्मण आणि संस्कृत भाषा या तिन्ही गोष्टी, अत्यंत पवित्र असून ईश्वरी देणग्या आहेत, अशी त्यांची दृढ श्रद्धा आहे. ही श्रद्धा ब्राह्मणेतर सर्व जातींत इतकी दृढमूल झालेली आहे कीं, जैन, बौद्ध या स्वकीय आणि शक, हूण, यवन, मुसलमान आणि ख्रिस्ती यांच्या बौद्धिक आणि राजकीय हल्ल्यांनीं सुद्धां तिला धक्का लागलेला नाहीं. याचें सर्व श्रेय ब्राह्मणांच्या बुद्धिमत्तेला, तपश्चर्येला आणि संघटनाचातुर्याला दिलें पाहिजे. गौड व द्राविड हा विभागहि त्यांच्या संघटनाचातुर्याचाच एक भाग आहे. हिन्दुस्थानच्या प्रांताप्रांतांतूनच जेव्हां ब्राह्मणांचें वर्चस्व वाढलें आणि त्यांची संख्याहि भरपूर वाढली, व्यवहाराकरितां त्यांना प्राकृत, अपभ्रंश वगैरे भाषा स्वीकाराव्या लागल्या; तेव्हां त्यांची धर्म, संस्कृति व संस्कृत भाषा एकच होती तरी त्यांच्यांत प्रान्तभेदानें व व्यावहारिक भाषेच्या भेदानें अलगपणा वाढत गेला; तो सांधून त्यांच्यांतील एकोपा टिकविण्याकरितां गौड, द्राविड अशा दोन सूत्रांत हिन्दुस्थानांतील सर्व प्रांतांतल्या ब्राह्मणांचा समावेश करण्यांत आला. म्हणजे वैदिक धर्मांच्या ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र या चातुर्वर्ण्यात्मक संघटनेप्रमाणेंच सर्व ब्राह्मणांचा एकोपा निर्माण करणारा गौड व द्राविड हा प्रांतिक भेद संघटित करण्याचाच एक यशस्वी प्रयत्न होता.

**५ गौड व द्राविड शब्दांची प्राचीनता—**

गौड आणि द्राविड या दोन विभागांत हिन्दुस्थानच्या सर्व प्रांतांतील

ब्राह्मण समाविष्ट करण्यांत आले. पण हे दोन्ही शब्द संस्कृतोद्भव नाहींत आणि प्राचीनहि नाहींत. ख्रिस्तशकाच्या सुमारास उत्पन्न झालेल्या वाङ्मयांत द्राविड शब्द प्रथम आढळूं लागला आणि दहाव्या शतकानंतर तो ब्राह्मणांना उद्देशून वापरलेला आढळतो. मनुस्मृति, महाभारत यांत द्राविड हे हीन दर्जाचे लोक अशा अर्थानें हा शब्द आलेला आहे. पुराणांत द्रविड व द्रविडा या नांवाच्या व्यक्ति आढळतात. पण ते ग्रंथ द्रविड म्हणजे कोणते लोक हें निश्चित सांगत नाहींत व त्या ग्रंथांचा काळहि ख्रिस्तापूर्वी नाहीं. सातवे शतकांतील बाणभट्टानें आपल्या कादंबरींत गौड व द्रविड शब्दांचा, विशिष्ट देशांतील लोक म्हणून भरपूर उल्लेख केला आहे. पण निश्चित पंच द्राविड व पंच गौड अशा अर्थानें या शब्दांचा उपयोग ख्रिस्ताच्या नववे शतकांतील श्रीआद्यशंकराचार्यांचे शिष्य सुरेश्वराचार्य यांनीं आपल्या नैष्कर्म्यसिद्धींत केलेला आढळतो.[1] तेथें मात्र तो पूर्णपणें सध्यांच्या प्रचलित अर्थानें वापरलेला आहे, व टीकाकारांनींहि तसाच मानला आहे. आद्यशंकराचार्यांच्या नंतर हा भेद रूढींत आलेला असावा असें त्यावरून निश्चित विधान करितां येईल. जातिवाचक गौड शब्दहि त्यापूर्वी फारसा प्रचारांत दिसत नाहीं. गुर्जर राष्ट्रकूट गोविंदराज याच्या स. ८१० मधील ताम्रपटांत गौड देशांतून आलेल्या सामवेदी आत्रेयगोत्री ब्राह्मणाला दान दिल्याचा निर्देश आहे.[2]

१ सुषुप्ताख्यं तमोऽज्ञानं बीजं स्वप्नप्रबोधयोः। आत्मबोधप्रदग्धः स्यात् बीजं दग्धं यथाभवम् ॥४३॥ एवं गौडैर्द्राविडैर्नः पूज्यैरयमर्थः प्रभाषितः। अज्ञानमात्रोपाधिः सन्नहमादिदृगीश्वरः ॥४४॥ ( सुरेश्वराचार्यकृत नैष्कर्म्य सिद्धिः) टीकाः–गौडैः गौडपादाचार्यैरस्मदाराध्यैः द्राविडैः भगवत्पूज्यपादाचार्यैः। पंच द्राविडा इति केवलानामपि द्राविडत्वप्रसिद्धेः। ज्ञानोत्तमकृता चन्द्रिका.

२ दक्षिण महाराष्ट्राच्या इतिहासाचीं साधनें, खंड ३, पा. १०७.

### ६ औदीच्य ब्राह्मण—

ब्राह्मणांतील प्रान्तिक भेदांना एकत्र आणण्याकरितां द्राविड व गौड असें वर्गीकरण आणि त्यांतील दशविधत्वाची गुम्फण ही बरीच अलीकडची असली पाहिजे. याविषयीं आणखी एक पुरावा उपलब्ध होतो तो पुढें देत आहें. मूलराज सोलंकीनें आपला मामा गुजराथेंतील अनहिलवाड ( पाटण ) चा राजा सामंतसिंह याला मारून त्याचें राज्य घेतलें. या मूलराजानें सिद्धपूर येथें रुद्रमहालय नांवाचें विशाल शिवालय बांधलें. आणि त्याची प्रतिष्ठा करण्याकरितां कनोज, ठाणेश्वर येथून ब्राह्मण बोलाविले. आणि उपजीविकेकरितां गांवें वगैरे देऊन त्यांना तेथेंच राहून घेतलें. हे ब्राह्मण उत्तरेकडून आल्यामुळें त्यांना औदीच्य म्हणूं लागले. आणि मूळ गौड असूनहि गुजराथेंत राहिल्यामुळें द्राविडांत यांची गणना झाली. यावरून असें दिसतें कीं, या वेळपर्यंत ब्राह्मणजाति एकच असून त्यांच्यांत गौड व द्राविड असा भेद पडलेला नव्हता. हा भेद यानंतर पडलेला दिसतो. मूलराजाच्या राज्याचा काळ स. ९६०--९९५ हा आहे.

श्रीसुरेश्वराचार्यांच्या नैष्कर्म्यसिद्धीतील उतारा आपण वर पाहिलाच आहे. त्यानंतरची ही घटना आहे.

### ७ गौड व द्राविड यांची थोडी अधिक माहिती.

बंगालप्रांताला गौड शब्द केव्हां लावूं लागले व कां लावूं लागले याचें कारण सांगतां येत नाहीं. बंगालप्रांताला पूर्वी वंग शब्द लावीत असत आणि वंग शब्दाचा अपभ्रंश बंगाल हा सध्यांचा शब्द प्रचलित झाला असें मानण्यांत येतें. वंग, पुंड्र, कालिंग, सुह्म हीं नांवें त्या त्या नांवाच्या राजांवरून पडलीं असें पुराणांनीं प्रतिपादन केलेले आहे व त्याचा संदर्भ कालदृष्टीनें मंत्रकालापर्यंत नेऊन पोंचविला आहे. भारतीयुध्दाच्या पूर्वी पंचाहत्तर पिढ्या आणि रामापूर्वी पन्नास पिढ्या असणाऱ्या मांधातृच्या वेळीं वंग नांवाच्या बलि राजाच्या पुत्रामुळें त्या देशाला वंग हें नांव

प्राप्त झालें असें पुराणें म्हणतात. इतकें प्राचीन रूढ नांव न स्वीकारतां ब्राह्मणांच्या भेदांकरितां गौड हें अर्वाचीन नांव स्वीकारलेलें आहे.

गौड देशाचा उल्लेख पाणिनीनें आपल्या अष्टाध्यायी सूत्रपाठांत केला आहे[१] कौटिलीय अर्थशास्त्र[२] व वात्स्यायनकामसूत्र[३] यांतहि गौड देशाचा निर्देश आहे. वराहमिहिरानें भारतवर्षाच्या पूर्वेस गुडक देश असल्याचें लिहिलें आहे.[४] ईशानवर्मा मौखरी याच्या शिलालेखांत आन्ध्र, शूलिक ( चालुक्य ) व गौड यांवर विजय सम्पादन केल्याचें लिहिलें आहे. हा शिलालेख स. ५५४ मधील आहे. त्यांत ' गौडान् समुद्राश्रयान् ' म्हटलेलें आहे. प्रो. हेमचंद्र रॉयचौधरी यांच्या मतें हा प्रदेश पश्चिम बंगाल असावा. त्यांत समुद्रकिनाऱ्याचा भाग, कर्णसुवर्ण व राधापुरी यांचाहि समावेश होतो. स्थानेश्वरच्या हर्षवर्धनाचा प्रतिस्पर्धी शशांक, गौड होता; आणि त्याची राजधानी कर्णसुवर्ण होती ( स. ६६६ ). ह्यूएनत्संग व बाणभट्ट ( कादम्बरीकार ) यांचा वरील म्हणण्यास दुजोरा आहे.

अल्बेरुनीचे काळीं ( स. १००० ) स्थानेश्वराचा समावेश गुडमध्यें म्हणजे गौड प्रान्तांत होत असे, असें जॅक्सननें दर्शविलें आहे व त्याला मत्स्यपुराणांतील एका श्लोकाचा आधार दिला आहे.[१] त्या श्लोकांत श्रावस्त राजानें गौड देशांत श्रावस्ती नगरी वसविली असें म्हटलें असून त्याला लिंग[२] व कूर्म[३] पुराणांतील पुष्टि दर्शविली आहे. यावरून गौड देश कोसलाच्या उत्तरेस व मिथिलेच्या वायव्येस असावा असें दिसतें. पण ही श्रावस्ती वस्तुतः उत्तर बंगाल म्हणजे गौडांचा वारेंद्रदेश यांतच कोठेंतरी असावी असें वाटतें. कारण प्रहासच्या सिलिमपूर शिलालेखांत तसा निर्देश आहे.

---

१ पा. सू. ६. २. ९९-१००; २ खि. पू. २९६; ३ नखच्छेद्य प्रकरण २. १३; ४ स. ४९०.

१ मत्स्य १२.३०; २ लिंग १.६५; ३ कूर्म १.२०.१९.

'पंचगौड' यांतील गौड शब्द मात्र खिस्तीशकाच्या आरंभींच्या प्राचीन गौड देशाला लावतां येत नाहीं. उलट हा शब्द उत्तर हिंदुस्थानचा कनोज व श्रावस्तीपर्यंतचा भाग दर्शविणारा आहे; आणि उत्तर हिंदुस्थानच्या बऱ्याच मोठ्या भागाला लावला जाणारा हा शब्द पुष्कळ नंतरच्या काळांतला असावा. हें 'ट्राइब्स इन् इन्शन्ट इंडिया' या नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या डॉ. विमलचरण लॉ यांच्या ग्रंथांतील मत, वरील 'पंचगौड' या भेदाच्या अर्वाचीनपणास पोषक असेंच आहे.

द्राविड शब्दाबद्दलहि विशेष समाधानकारक सांगतां येत नाहीं. कांहीं संस्कृत शिलालेखांत द्रमिडक असा शब्द सांपडतो. त्यावरून तामिळग असा अपभ्रंश तामिळप्रान्तांत व त्याच शब्दाचा द्रविडक असा अपभ्रंश इतर प्रांतांत झाला. शेवटच्या वर्णांचा लोप झाला. तमिळ-अग याचा तामील भाषेंत 'गोड--भाषा' असा अर्थ आहे. द्रमिळक शब्दाचा अर्थ देश असा आहे. देशवाचक शब्द लोकवाचकहि असतो. त्याप्रमाणें द्रविड हा लोक व देशवाचक शब्द झाला. पण या व्युत्पत्तींत द्रविड शब्द संस्कृतोद्भव मानून व्युत्पादिला आहे. त्यापेक्षां तो शब्द देश्य भाषेंतील मानणें अधिक बरोबर ठरेल.

द्रम+इला=समुद्रकांठची जमीन असा त्याचा तामिळ किंवा तेलगू भाषेंत अर्थ असावा. पण त्यासंबंधीं अधिक शोध करणें इष्ट आहे. त्याकरितां साउथ इंडियन इन्स्क्रिप्शन, व्हा. ३, पार्ट ४ ची रा. ब. एच. कृष्णशास्त्रीची प्रस्तावना व फादर हेरास यांनीं हैद्राबाद (दक्षिण) येथील ऑल इंडिया ओरिएंटल कान्फरन्समध्यें वाचलेला निबंध पाहावा (स. १९४२).

यावरून गौड आणि द्राविड हे दोन्ही शब्द संस्कृत, संस्कृतोद्भव किंवा प्राचीन नाहींत. लोकवाचक गौड शब्द तर पांचव्या शतकाच्या सुमाराचा आहे हें ध्यानीं येईल.

द्रविड हा शब्द पाली ग्रंथांतून दमिल असा आला असून तो 'तामिल' या शब्दाला विशेष जवळचा आहे. सिलोनशीं संबंध असलेला दीपवंश व महावंश या पालीग्रंथांत दमिलांचा वारंवार उल्लेख आला आहे. या ग्रंथांचा काल इसवी सनाच्या पहिल्या शतकांत मानण्यांत येतो. खि. पू. १७७ चे सुमारास सेन व गुत्त या दोघां दमिलवीरांनीं सुरतिस्स राजाचा पराभव करून लंकेवर आपली सत्ता प्रस्थापित केली. अशीं अनेक युद्धं होऊन सत्तांची अदलाबदल सारखी चालू असे. दमिल हे लढवय्ये असून त्यांचे लंकेतील सिंहली लोकांशीं नेहमीं युद्धप्रसंग चालू असत. दमिलांचा जेव्हां पराजय होई तेव्हां सिंहली लोक त्यांची सरसहा कत्तल करीत, असे पालीग्रंथांत निर्देश आहेत. दमिलांना अनार्य म्हटलें आहे, तें त्यांच्या बुद्ध-धर्मविषयक विरोधामुळें म्हटलेलें दिसतें.

या दमिलांचा एक पुढारी सेनापति आर्य चक्रवर्ति यानें इसवी सनाच्या तेराव्या शतकाच्या अखेरीस संपूर्ण लंकेचें राज्य उध्वस्त करून शुभगिरीवरील सर्व मूल्यवान् वस्तूंची लूट केली व तो आपल्या पांड्य देशाला परतला. पांड्यांचें राज्य हिंदुस्थानच्या अगदीं दक्षिण टोंकाला होतें. या दमिल शब्दापासून द्रविड शब्द झाला आणि तो सर्वच दाक्षिणात्यांना सामान्यपणें लावण्यांत येऊं लागला.

द्राविडी संस्कृति व भाषा, वैदिक संस्कृति व भाषा यांहून अगदींच भिन्न आहे. तसेंच वैदिक संस्कृति व भाषा यांपेक्षाहि द्राविड संस्कृति व भाषा प्राचीन आहेत, असें सिंध प्रांतांतील महेंजोदारो व हराप्पा या ठिकाणच्या उत्खननावरून सिद्ध झालें आहे. उत्खननांत आढळणारी संस्कृति खि. पू. ३५०० वर्षांपूर्वीची असावी असें तज्ञांनीं ठरविलें आहे. बलुचिस्थान वगैरे भागांत चालू असलेल्या ब्राहुवी भाषेंत कित्येक शब्द तामीळ भाषेशीं अत्यंत साम्य दाखविणारे आहेत व त्या भाषेची रचनाहि तामीळशीं जुळती आहे. ही गोष्टहि द्राविडी भाषा व संस्कृति

हिंदुस्थानच्या उत्तर-वायव्य भागांत होती असें दर्शविते. वैदिक व द्रविड एकरूप होऊन पुढें दोन्ही संस्कृतींचें मिश्रण झालें आणि धार्मिक व सांस्कृतिक गोष्टींत वैदिकधर्म व संकृतभाषा यांना वर्चस्व प्राप्त झालें आणि द्राविड लोकाचारहि वैदिकांना स्वीकारावे लागले असें दिसतें. खुद्द वैदिक वाङ्मय निर्माण करण्यांत द्राविडांचा मोठाच भाग असावा असें म्हणण्यास आधार दाखवितां येतात.

## ८ आम्ही द्राविड आहोंत—

सर्व देशभर राहत असलेले ब्राह्मण प्रथम दहा विभागांत आणि नंतर दोन विभागांत वांटले गेले. तीं दोन नांवें म्हणजे द्राविड आणि गौड हीं होत. तीहि विभागणी सनाच्या दहाव्या शतकापूर्वीची आहे असें आपणांस सिद्ध करितां येत नाहीं. पुराव्यांनीं तीं नांवें तशीं दाखवितां येत नसलीं तरी तीं परंपरेनें शेंकडों वर्षांपूर्वींपासून व्यवहारांत रूढ असलीं पाहिजेत. एकदम दक्षिण भागाला द्रविड हें नांव प्राप्त होण्यासारखा कांहीं इतिहास घडल्याची आख्यायिका नाहीं. शिवाय दक्षिणेंत प्रचलित असणाऱ्या भाषा ख्रिस्ती सनाच्या सुमाराचा, आपल्या प्रत्यक्ष अस्तित्वाचा पुरावाच देतात. त्यापूर्वीं त्या भाषांची आई—आजी या प्रांतांत वावरत असलीच पाहिजे. तिचें स्वरूप, संस्कृति यांचा अंदाज करण्यासारखी पुष्कळच सामुग्री आपल्याजवळ आहे. ती सर्व अभिमान बाळगण्या-सारखी आहे. तिला लोकांनीं द्रविडसंस्कृति हें नांव दिलेलें आहे. या प्रान्तांतच ती उत्पन्न झालेली आहे. येथील लोकांनीं ती अभि-मानानें आपल्यामागें लावून घेतलेली आहे. सध्यां द्रविडांची संस्कृति आज दक्षिण हिंदुस्थान व्यापून त्या संस्कृतीनें एका वेळीं सिंधुनदाच्या खोऱ्यापर्यंत देश व्यापला होता आणि अरबस्तानच्या प्रदेशांतहि द्रविड-भाषा चालू होत्या असें आतां उत्खनन व भाषांचे इतिहास सांगत आहेत. अशा उघड दिसणाऱ्या पुराव्यांनीं द्रविड संस्कृतीचें श्रेष्ठत्व सिद्ध

आहे. देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण हे स्वतःला हजार वर्षांपेक्षां अधिक वर्षें पंच द्राविडान्तर्गत महाराष्ट्र ब्राह्मण म्हणवून घेत आहेत. वेद हे जगांतले पहिले ग्रंथ आहेत आणि ते हिंदुस्थानांतच तयार झाले आहेत आणि त्यांचें संवर्धन संरक्षण दक्षिणेंतील पंच द्राविडांइतकें कोणींहि केलेलें नाहीं. हिन्दुस्थानसारख्या अवाढव्य देशांत मूलतः भिन्न असणाऱ्या दोन संस्कृति व दोन भाषा वावरण्यास कांहींच हरकत नाहीं. त्याकरितां उच्च-नीचतेची व विरोध-आक्रमणाचीच कल्पना करावयास पाहिजे असें नाहीं. तशी कल्पना केली तरी कोणी कोणाला हार गेल्याचें दिसत नाहीं.

## ९ दक्षिणेंतील द्राविडांची एकता—

दक्षिणहिंदुस्थानांतील पंचद्राविड ब्राह्मण वेगळाल्या पांच प्रांतांत विभागले आहेत आणि त्यांच्या भाषासुद्धां अगदीं वेगळाल्या आहेत. तामिळ, कानडी, तेलगू, गुजराथी आणि मराठी या द्रविड, कर्नाटक, आंध्र, महाराष्ट्र आणि गुर्जर यांच्या अनुक्रमें भाषा होत. या भाषांच्या उपलब्धीचा कालानुक्रमहि वरीलप्रमाणेंच आहे. तामिळ ही कानडी, तेलगू आणि मल्याळी भाषांची जननी आहे असें म्हणण्यापेक्षां, या चारहि भाषांचें मूळ एक भाषा आहे, तिचें नांव उपलब्ध नाहीं आणि मराठीवरसुद्धां उच्चार व शब्द-संग्रहदृष्ट्या या भाषांचा परिणाम झालेला आहे. तथापि मराठी व गुजराथी या दोन भाषा वरील तामिळादि भाषांच्यापेक्षां अगदीं वेगळ्या वर्गांतील आहेत. या भाषांच्या प्रारंभींचे प्रत्यक्ष उल्लेख पहिल्या, तिसऱ्या, पांचव्या, दहाव्या व अकराव्या शतकांच्या सुमारास सांपडतात.

वैदिक आचारविचाराचें वर्चस्व या सर्व प्रांतांतील ब्राह्मणांवर कमालीचें आहे. त्यामूळें भाषा भिन्न असूनहि ते कोणतेहि धार्मिक व सामाजिक प्रसंगांत सहज एकरूप होऊं शकतात. तथापि हें वैदिक धर्माचें वर्चस्व स्थानिक व प्रान्तिक देवता स्वीकारण्याच्या आड आलेलें नाहीं.

जानाई, जोखाई, तुळजाई, येसाई, सटवाई, जोतिबा, खंडोबा, म्हसोबा, म्हसकोबा, तातोबा, कान्होबा, इत्यादि देश्य देवता पौराणिक देवतां-बरोबरच त्यांच्या घरांत आनंदानें नांदत आहेत.

तसेंच भाषाभेद असला तरी धार्मिक कृत्यांत हे सर्व ब्राह्मण निरपवाद एकत्र येऊं शकतात. अन्नव्यवहार करण्यास भाषाभेद किंवा प्रान्तभेद यांना आडवा येऊं शकत नाहीं. त्याप्रमाणें विवाहसंबंधहि यांच्यांत सरसहा होऊं शकतो. अमक्या प्रांतान्तील म्हणून विवाहसंबंध करण्यास बिलकूल हरकत येऊं शकत नाहीं. गोत्रप्रवरादि पाहण्याची चाल सर्व प्रांतांत सारखीच आहे.

## १० आर्य आणि द्राविड यांचा विरोध काल्पनिक—

आर्य खैबर खिंडींतून हिंदुस्थानांत आले आणि त्यांनीं द्राविडांना पिटाळून दक्षिणेकडे हांकून दिलें, आर्यांनीं द्राविडांशीं युद्ध करून त्यांचा निःपात केला, या सर्व गोष्टी पुराव्यांनीं सिद्ध होत नाहींत. आर्य हें वंशाचें नांव आहे, आणि द्रविडांचाहि एक स्वतंत्र वंश आहे हीहि निव्वळ कल्पना आहे. ऋग्वेदांत आर्य शब्द आलेला असला तरी तो गुणवाचक आहे, वंशवाचक नाहीं. ब्राह्मणग्रंथांत देव आणि असुर यांचा विरोध उत्पन्न झाल्याचीं वर्णनें आहेत, आर्य-द्राविडांच्या विरोधाचीं नाहींत. मॅक्समुल्लरसारख्या अव्वल दर्जाच्या लेखकांनीं, आर्य-द्राविड शब्दांनीं वेदपूर्वकालीन व वेदकालीन लोकांच्यासंबंधीं लिहिलें. तसेंच गौतमबुद्धापूर्वी उपनिषत्काल, ब्राह्मणकाल, संहिताकाल दोनशें वर्षांच्या फरकानें धरून खि. पू. हजाराच्या सुमारास ऋक्संहिताकाल केवळ अंदाजानें धरला व आपलें लिखाण केलें. त्या सर्व कल्पना चुकीच्या होत्या. शब्द-योजनासुद्धां बरोबर नव्हती. प्रारंभींच्या काळीं केवळ चर्चा सुरू करतांना कोठून तरी लिहिण्यास सुरवात करावी लागते, शब्दसुद्धां नक्की ठरलेले नसतात. तशा स्वरूपाचें तें सर्व लिखाण होतें. खुद्द मॅक्समुल्लरनें सुद्धां लोकांचा

गैरसमज होतो आहे हें पाहून लोकांनीं गैरसमज करून घेऊं नये, माझें कालविषयक बोलणें अंदाजीं आहे, मीं वापरलेले शब्द वंशदर्शक नाहींत व ते शब्दहि बरोबर नाहींत, वगैरे खुलासा केला तरी तिकडे लोकांचें जावें तितकें लक्ष गेलें नाहीं. पुढील संशोधकांनीं अभ्यासपूर्वक शब्द बदलले, कालनिर्णय फिरवले व आतां यासंबंधीं नवीनच परिभाषा उत्पन्न झाली आहे. पण ती ध्वनि-प्रतिध्वनिरूपानें देशी भाषांत पोंचण्याला बराच कालावधि लागतो. तोंपर्यंत कोणतेंहि जुनें संशोधन मान्य करतांना दहा वेळां विचार करावयास पाहिजे. इतका इषारा देऊन आर्य व द्राविड हे शब्द वंशवाचक नाहींत व त्यांच्या विरोधाचें आधुनिक संशोधकांचें विवेचन केवळ काल्पनिक आहे एवढें नमूद करून ठेवतों.

दोन भिन्न संस्कृतींचे किंवा विचारांचे लोक एकत्र आल्यास त्यांच्यांत घर्षणच होतें, जितजेतभाव निर्माण होऊनच चांगल्यावाईट गोष्टी दुसऱ्यावर लादल्या जातात. चांगल्या व सोयीच्या गोष्टी स्वीकारण्यांत मनुष्य अंगचोरपणा करतो, वगैरे कल्पना सर्वस्वीं बरोबर नाहींत. हिंदुस्थानचा धार्मिक व सांस्कृतिक इतिहास या बाबतींत अगदीं वेगळा आहे.

या चर्चेचा निष्कर्ष पुढीलप्रमाणें काढतां येईल. ( १ ) द्राविड व गौड या नांवानें झालेली ब्राह्मणांची संघटना सनाच्या दहाव्या शतकानंतर झालेली आहे. ( २ ) त्यापैकीं गौड शब्द वेदकालीन असला तरी बंगालवाचक नसून उत्तर–हिंदुस्थानवाचक आहे. ( ३ ) द्रविड शब्द सनाच्या नंतरचा आहे. ( ४ ) दे. ऋ. ब्रा. हे वैदिक ऋषींचें वंशज व वैदिकधर्मी असून दशविध ब्राह्मणसंघटनेंत समाविष्ट झालेले आहेत. ( ५ ) महाराष्ट्र ब्राह्मण पंचद्राविडान्तर्गत असले तरी त्यांचा द्रविड वंशाशीं संबंध दाखवितां येत नाहीं.

---

## प्रकरण ८ वें,

# महाराष्ट्र ब्राह्मण

जनांमध्यें जो जाणता । त्यास आहे मान्यता ॥
कोणीएक विद्या असतां । महत्व पावे ॥— दास ९-४-१८

### १ दशविध ब्राह्मण—

हिंदुस्थानांत एकंदर दहा प्रकारचे ब्राह्मण आहेत. त्यांची उत्तर हिंदुस्थानांत पांच गौड आणि दक्षिण हिन्दुस्थानांत पांच द्राविड अशी विभागणी करण्यांत आली आहेः—१ सारस्वत, २ कान्यकुब्ज, ३ गौड, ४ मैथिल व ५ उत्कल हे पांच गौड ब्राह्मण होत. यांची वस्ती विन्ध्याच्या उत्तरेकडे आहे. १ द्रविड, २ आन्ध्र, ३ कर्नाटक, ४ महाराष्ट्र व ५ गुर्जर हे पांच द्राविड ब्राह्मण होत. यांची वस्ती विंध्याच्या दक्षिणेकडील हिंदुस्थानांत आहे. गौड द्राविड हें ब्राह्मणांचे भेद देशभेदावरून पडलेले आहेत. वंशभेदावरून पडलेले नाहींत. आजहि त्या त्या देशांतील ब्राह्मणांचीं म्हणून तीं नांवें ओळखूं येतात. सरस्वतीच्या कांठीं राहणारे ते सारस्वत ब्राह्मण. ही सरस्वती नदी कोणती हें मात्र शोधलें पाहिजे. पंजाब, काश्मीर, येथील ब्राह्मणहि सारस्वतच समजले जातात. कान्यकुब्ज म्हणजे गंगेच्या कांठीं असणाऱ्या कनोज शहराच्या आसपास असणाऱ्या प्रांतांतील ब्राह्मण. गौड राजपुतान्यांत आहेत. मैथिल म्हणजे मिथिला प्रांतांतील ( बिहारमधील ); आणि उत्कल म्हणजे उरिया प्रांतांतिल ब्राह्मण असा हा ठोकळपणें प्रान्तवार ब्राह्मणांचा भेद सांगतां येईल. तसेंच द्रविड हें तामिळ प्रांताचें नांव आहे. आणि तेथील लोकांची भाषा तामीळ आहे आंध्र हें तेलंगणाचें प्राचीन नांव आहे व तेथील लोकांची भाषा तेलगू आहे. कर्नाटक हा प्रान्त कानडी भाषा बोलणारांचा असून तेथील ब्राह्म-

णांना कर्नाटक ब्राह्मण असें म्हणतात. महाराष्ट्र व गुर्जर हे प्रान्त मराठी आणि गुजराथी भाषा बोलणारांचे असून तेथील ब्राह्मण महाराष्ट्र व गुजराथी ब्राह्मण या नांवानेंच प्रसिद्ध आहेत. याचें थोडें अधिक विवेचन पुढें केलें आहे.

## २ दशविध ब्राह्मणांचे प्राचीन निर्देश—

( १ ) सारस्वत ब्राह्मणः—गौडांपैकीं सारस्वत ब्राह्मण हे पुष्कळच प्राचीन दिसतात. सरस्वती नदीच्या कांठीं राहाणारे ते सारस्वत ब्राह्मण. ही सरस्वती नदी नेमकी कोणती हें सांगता येत नाहीं. उत्तरहिंदुस्थानांत सरस्वती नांवाच्या नद्या अनेक आहेत. त्रिवेणीपैकीं सरस्वती ऋग्वेदप्रसिद्ध आहे. ती घेण्यास हरकत नाहीं. पुराणांच्या परंपरेप्रमाणें, स्वायंभुव मन्वन्तरांत व वैवस्वत मन्वन्तरांत सारस्वत नांवाचा एक व्यास आहे. तसेंच भृगुकुलांतील हा मंत्रकार आणि गोत्रकारहि आहे. यानें वेदांतील कोणते मंत्र केले हें शोधलें पाहिजे. एका सारस्वतानें आपत्कालीं मासे खाऊन जीव जगवला आणि वेदसंरक्षण केल्याची कथा प्रसिद्ध आहे ( महाभारत आदि ५० ). तैत्तिरीय संहितेच्या, कांडानुक्रम व सारस्वतपाठ अशा दोन परंपरा आहेत. त्यांपैकीं सारस्वतपाठ उत्पन्न होण्याचें कारण वरील आपत्कालीन परिस्थितिच होय. वरीलप्रमाणें सारस्वत या नांवाचा वैदिक वाङ्मयाशीं आणि ब्राह्मणधर्माशीं अत्यंत प्राचीन कालापासून घनिष्ठ संबंध दिसतो. वरील सर्व गोष्टी एकाच व्यक्तीशीं संलग्न मानणेंहि बरोबर होणार नाहीं. सारस्वत हें सामान्यनामच वरील ठिकाणीं असेल. तथापि सारस्वत ब्राह्मणांचा अत्यंत प्राचीनपणा निर्विवाद सिद्ध होतो.

---

१. सारस्वताः कान्यकुब्जा गौडा मैथिलिकोत्कलाः । पंच गौडा भवन्त्येते विंध्यादुत्तरवासिनः ॥ द्राविडाश्चान्ध्रकर्नाटमहाराष्ट्राश्च गुर्जराः । पंचैते द्राविडाः प्रोक्ता विंध्याद्दक्षिणवासिनः ॥—स्कंदपुराण, सह्याद्रिखंड.

सारस्वतासंबंधीं दोन आख्यायिका प्रचलित आहेतः—

१ पुष्करतीर्थाजवळील प्रान्त हा मूळ सारस्वतदेश आहे असें मानणारे कित्येक ब्राह्मण आहेत. पुष्करतीर्थ राजपुतान्यांत प्रसिद्ध आहे.

२ सिंध प्रांतांत सिन्धुनदाजवळ हिंगु म्हणून क्षेत्र आहे. तेथें देवीचें प्राचीन स्थान आहे. तेथें सारस्वतांची मूळ उत्पत्ति झाली असें मानणारे अन्य ब्राह्मण आहेत.

सारस्वतांच्या ८४ पेक्षां अधिक उपजाति आज विद्यमान आहेत. यापैकीं फार थोड्या जाती किंवा कांहीं कुलें निवृत्तमांस आहेत.

काश्मिरी ब्राह्मण कृष्णयजुर्वेदान्तर्गत कठ शाखेचे ब्राह्मण आहेत. त्यांचें सूत्र लौगाक्षि त्यांचा समावेश पंचगौड म्हणून ज्यांचा नामनिर्देश होतो त्यांच्यांत होत नाहीं.

पंजाब किंवा काश्मीर हे प्रान्त जरी स्वतंत्र दिसत असले तरी तेथील ब्राह्मण प्रान्तभेदाप्रमाणें परिगणीत नाहींत. पंजाब व राजपुतान्यांतील बरेच ब्राह्मण सारस्वत आहेत. काश्मिरी कठशाखीय आहेत हें वर सांगितलेंच आहे.

(२) कान्यकुब्जब्राह्मणः—गौड ब्राह्मणांत हे प्राचीन दिसतात. कान्यकुब्ज हें देशाचें नांव म्हणून पुष्कळच प्राचीन आहे. विश्वामित्राच्या पूर्वजांपैकीं कुशनाभाच्या वेळीं महोदयपुरीला कान्यकुब्ज हें नांव प्राप्त झालें. तो रामापूर्वी पन्नासाव्या पिढींतील आहे. म्हणजे सुप्रसिद्ध पुरुषांपैकीं विश्वामित्र हा कान्यकुब्ज ब्राह्मणांचा मूळ पुरुष ठरतो.

(३) गौडब्राह्मणः—गौड हा शब्द पंच गौडांपैकीं एका भेदाचें नांव आहे. पण गौड हें बंगालप्रांताचें नांव वंग या नांवाइतकें प्राचीन नाहीं. इसवीसनाच्या पांचव्या शतकापूर्वी हें बंगालप्रान्ताला लावलेलें सांपडत नाहीं. सर्वच उत्तर हिंदुस्थानाला पांचव्या शतकाच्या सुमारास गौड म्हणत. गौड ब्राह्मण राजपुतान्यांत विशेष आढळतात.

(४) मैथिलब्राह्मणः—ब्राह्मणग्रंथांत प्रसिद्ध असणाऱ्या विदेह प्रांताची

मिथिला ही राजधानी. तेथील राजघराणें वैवस्वत मनूच्या इक्ष्वाकु पुत्र निमीपासून सुरू झालें व निमिपुत्र मिथीनें मिथिला नगरी स्थापिली व जनक हें नांवहि त्यापासूनच सुरू झालें. या घराण्यांतील पुरुष तत्वज्ञानी व वैदिककर्मांत निष्णात होते, त्यामुळें शुक्लयजुर्वेदाच्या व सामवेदाच्या ब्राह्मणग्रंथांत त्यांचा अत्यंत गौरवपूर्वक उल्लेख आहे. त्यांच्यापासून पुष्कळ ब्राह्मणांनीं तत्त्वज्ञानाचें शिक्षण घेतलें होतें. या प्रान्तांतील अत्यंत थोर तत्वज्ञानी ब्राह्मण म्हणजे याज्ञवल्क्य महर्षि होत. हेच मैथिल ब्राह्मणांचे मुख्य होत. ' मिथिलास्थः योगींद्रः ' असा याज्ञवल्क्यस्मृतींत याचा निर्देश आहे. याज्ञवल्क्य हा गुजराथेंतील वडनगरचा होता. तेथून तो उत्तरेकडे गेला आणि पुढें वादविवादाकरितां व तत्वज्ञान सांगण्याकरितां मिथिलेकडे गेला. ही माहिती माहात्म्यात्मक स्कंदपुराणांत दिली आहे. ती माहिती चिन्त्य आहे. त्यानंतरहि या प्रांतान्त पंडितांची अखंड परंपरा चालू आहे. मिथिला, नवद्वीप हीं या प्रांतांतील विद्यापीठेंहि मध्ययुगांत प्रसिद्ध होतीं.

(५) उत्कलब्राह्मण—उत्कलप्रान्त म्हणजे उरिया ( ओरिसा ) प्रान्त होय. उत्कल हें नांव प्राचीन नाहीं. पुराणांत या प्रान्तास अंग हें नांव आहे.

आतां पंच द्राविडांची क्रमानें माहिती देऊं—

(१) द्रविडब्राह्मण—तामील प्रान्ताला द्राविडप्रांत असेंहि म्हणतात. हा प्रान्त म्हणजे मद्रास-रामेश्वर-कन्याकुमारी-कांची असा हिन्दुस्थानच्या दक्षिण टोकास आहे. येथील ब्राह्मण कर्मठ, आचारसंपन्न व वेदविद्येंत निष्णात म्हणून हिन्दुस्थानभर प्रसिद्ध आहेत. जुन्या एका द्राविड भाषे-पासून तामिळ, तेलगू, मल्याळी व कानडी या दक्षिणेंतील प्रमुख भाषा निर्माण झाल्या. श्री शंकराचार्य, रामानुजाचार्य हे सुप्रसिद्ध तत्वज्ञानी व भक्तिमार्गप्रदर्शक तामीळ होते.

(२) आंध्रब्राह्मण—मद्रास इलाख्यांत तेलंगण म्हणून यांचा प्रान्त सध्यां ओळखला जातो. यांची भाषा तेलगू आहे. या प्रान्तांतील ब्राह्मणलोकांचा

विश्वामित्राचे नावडते पुत्र म्हणून ऐतरेयब्राह्मणांत निर्देश आहे. विश्वामित्रानें आपल्या कांहीं मुलांना, शुनःशेपाला भाऊ मानण्याचें नाकारलें म्हणून, हीन ठरविलें, ते अन्ध्र होत (ऐ.ब्रा.७.६). कुमारिलभट्ट, हरदत्त वगैरे महापण्डित या प्रान्तांतलि होत. आन्ध्र हे प्रान्ताचे नांव सनानंतरचे आहे.

(३) कर्नाटकब्राह्मण—यांचा प्रांन्त कर्नाटक होय. त्याचा कांहीं भाग म्हैसूरसंस्थानांत गेला आहे. यांची भाषा कानडी. तिचें वाङ्मय दुसऱ्या शतकापूर्वी सांपडत नाहीं. बसव, मध्वाचार्य, सायणाचार्य, माधवाचार्य हे कानडी भाषा बोलत.

(४) महाराष्ट्रब्राह्मण—यांचा मराठी भाषा बोलणारा प्रान्त. नागार्जुन, वात्स्यायन, भवभूति हे महाराष्ट्रब्राह्मण होते.

(५) गुर्जरब्राह्मण—यांचा गुजराथी भाषा बोलणारा प्रान्त, म्हणजे सुरतेपासून काठेवाडपर्यंतचा प्रदेश. मराठीपूर्वी दोन शतकें गुजराथी भाषेची उत्पत्ति आहे. आनर्त, लाट, काठी वगैरे नांवांनीं या प्रान्ताची जुन्या काळांत प्रसिद्धि आहे. माघ वगैरे कवि या प्रान्तांतील ब्राह्मण होत.

हे सर्व निवृत्तमांस आहेत. ऋग्वेदी, कृष्णयजुर्वेदी, सामवेदी व अथर्ववेदी या चारहि वेदांच्या लोकांचे परस्परांत रोटीबेटीव्यवहार होऊं शकतात. कांहीं रूढ आक्षिप्त जाती, मातुलगोत्र पालन करणारे शुक्लयजुर्वेदी आणि गुजराथी ब्राह्मण फक्त यांतून रूढीनें वेगळे पडतात. या अपवादाखेरीज दाक्षिणेंतील पंचद्राविडांपैकीं चारहि द्राविडांत रोटीबेटीव्यवहार होत असल्यामुळें यांच्यांतील एकता चांगलीच व्यक्त होते. गुर्जर ब्राह्मणांशींसुद्धां असा व्यवहार व्हावयास पाहिजे. पण रूढीनें तसा व्यवहार होत नाहीं. याचें कारण त्यांनीं शुक्लयजुर्वेदाशीं संबध्द असणाऱ्या ऋग्वेदाची शांखायन व सामवेदाची कौथुमी ही शाखा स्वीकारली हें होय.

**३ महाराष्ट्रब्राह्मण—**

पंचद्राविडांपैकीं महाराष्ट्र ब्राह्मणांच्या समुदायाची पाहणी करतांना

मराठी भाषा बोलणारे ब्राह्मण असेंच त्यांचें वर्णन करावें लागेल. देशस्थ, कोंकणस्थ, कऱ्हाडे, देवरुखे, तिरगुळ, गोवर्धन, सवाशे, आपस्तंब, हिरण्यकेशी, बौधायन, वानस ( वैखानससूत्री ), मैत्रायणी, आभीर, किस्ती, कास्त, चरक, पळशे, माध्यंदिन, काण्व, जम्बूकाण्व, पल्लेवाळ वगैरे ऋग्वेदी, कृष्णयजुर्वेदी, शुक्लयजुर्वेदी, सामवेदी व अथर्ववेदी या सर्वांचा त्यांत समावेश होतो. त्यांची अंदाजी लोकसंख्या सुमारें दहा लक्ष आहे. ती दिवसेंदिवस अनेक कारणांनीं घटत आहे.

या सर्व ब्राह्मणांत देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण हे महाराष्ट्रांतील सर्वांत प्राचीन ब्राह्मण होत. त्यांचा सर्वांगीण व प्रामाणिक इतिहास तात्विक विवेचनासह संकलित करणें हाच अशा ग्रंथांचा उद्देश असतो. तशी माहिती व विवेचन संकलित करतांना इतर ब्राह्मणांची शक्य तेवढी माहिती देणें अपरिहार्य आहे. देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणांचा परिचय देतांना सर्वच ब्राह्मणजातींचा तात्विक व सामाजिक इतिहास ओघानेंच देणें भाग आहे.

**४ महाराष्ट्रांतील ब्राह्मणांचे पोटभेद—**

ऋग्वेदी—१ देशस्थ ऋग्वेदी, २ कऱ्हाडे, ३ चित्पावन (कोंकणस्थ), ४ सहवासी, ५ पद्ये ( कऱ्हाडे ), ६ भट्टप्रभु ( कऱ्हाडे ), ७ देवरुखे, ८ जवळ ( खोत ), ९ क्रमवंत ( किरवंत ) १० गोवर्धन.

कृष्णयजुर्वेदी—१ चित्पावन कोंकणस्थ ( सत्याषाढ ), २ देवरुखे ( सत्याषाढ ), ३ आपस्तंब, ४ तिरगुळ ( आपस्तंब ), ५ गोवर्धन ( आपस्तंब ), ६ मैत्रायणी ( मैत्रायणी शाखा; मानवगृह्य व वाराह श्रौतसूत्र ), ७ चरक, ८ बौधायन, ९ हाविक ( बौधायन ), १० वानस ( वैखानससूत्री ).

शुक्लयजुर्वेदी—१ माध्यंदिन, २ वाजमाध्यंदिन, ३ उत्तरकोंकणस्थ माध्यंदिनवाजसनेय, ४ किस्ती, ५ पल्लेवाळ, ६ कात्यायन ( कास्त ),

७ काण्व, ८ जम्बूकाण्व, ९ नार्मदीय ( जाबालशाखा ), १० आभीर, ११ रणावट ( बौधेय ), १२ नार्मदेव ( तापायनीय ), १३ माळवी ( गालव ).

सामवेदी—१ राणायनी शाखा, २ कौथुमी शाखा ( गोभिल किंवा द्राह्यायणगृह्य व कात्यायनश्रौतसूत्र ), ३ लाड.

अथर्ववेदी—१ शौनकशाखा, २ पिप्पलादशाखा.

हे पंचद्राविडातील भेद दिले. पंचगौडांपैकीं पुढील भेद महाराष्ट्रांत आढळतात:—१ गौडसारस्वत ( ऋग्वेद ), २ आद्य गौड ( ऋग्वेद ), ३ जुझोतिया ( शुक्लयजुर्वेद ).

देशविभागावरून पडलेले भेद-देशस्थ, कऱ्हाडे, कोकणस्थ, देवरुखे, गोवर्धन, नार्मदीय, आभीर, माळवी, लाड, जंबू.

परदेशांतून आल्यामुळें पडलेले भेद—शाकद्वीपीय.

वेदभेदावरून पडलेले भेद—ऋग्वेदी ( शुक्ल व कृष्ण ), यजुर्वेदी, सामवेदी, अथर्ववेदी.

शाखांवरून पडलेले भेद—मैत्रायणी, चरक, बौधायन, वानस (वैखानस ), माध्यंदिन, काण्व.

परप्रान्तांतून आल्यामुळें भेद-तिरगुळ, जंबू, पल्लेवाळ, नार्मदीय, गौड.

विद्वत्तादर्शक नांवावरून भेद—क्रमवंत.

धंद्यावरून भेद-किस्ती व कास्त. गौडांपैकीं जुझोतिया (युद्ध करणारे). देशी भाषेंतील नांवानीं प्रसिद्ध असणारे—

१ तिरगुळ—( तिरु + गळु = विद्वत् + समुदाय – कानडी शब्द ) कृष्ण यजुर्वेदी आपस्तंब ब्राह्मण.

२ जवळ—जवूळ = वादळ – वादळांतून वचावलेले लोक. जवूळ – कोंकणी शब्द. यांना खोत असेंहि म्हणतात. ऋग्वेदी ब्राह्मण.

३ पद्ये व भट्टप्रभु—कऱ्हाड्यांपैकीं पद्ये व भट्टप्रभु नांवानें ओळखला

जाणारा समाज गोव्याकडे आहे. त्यांना तीं नांवें कां पडलीं हें सांगतां येत नाहीं. ऋग्वेदी ब्राह्मण.

४ सवाशे—सहवासी–ऋग्वेदी देशस्थांपैकीं हे लोक आहेत. पण कांहीं कारणानें वरील नांवानें यांचा गट पडला. हे कर्नाटकांतून महाराष्ट्रांत आले अशी आख्यायिका आहे. कर्नाटकांतहि यांची वस्ती आहे.

५ किरवंत—हा क्रमवंत शब्दाचा अपभ्रंश समजतात.

६ जंबू ब्राह्मण—शुक्लयजुर्वेदी काण्वांपैकीं आहेत. हे गुजराथेंतून महाराष्ट्रांत आले. मूळ जंबूसरचे राहणारे म्हणून महाराष्ट्रीय काण्वांनीं त्यांना जंबू ही संज्ञा देऊन वेगळे काढले. हे मध्यप्रान्त व नगर जिल्ह्यांत आहेत.

७ उत्तर कोकणस्थ माध्यंदिन ( पळशे )–पळशे शब्दाचा अर्थ नीट समजत नाहीं. यांनीं आपलें ऐतिहासिक साहित्य प्रसिद्ध केलेलें आहे.

८ वाज माध्यंदिन ( आभीर )—खानदेश–वऱ्हाडमध्यें हे शुक्लयजुर्वेदी ब्राह्मण आहेत. यांना 'आभीर' म्हणतात. हा शब्द देशवाचक आहे.

९ किस्ती ऊर्फ रणावट—व्याजबट्ट्याचा धंदा करणाराला जुन्या मराठींत किस्ती किंवा खिस्ती असा शब्द आहे. हे खानदेश, वऱ्हाड व नगर जिल्ह्यांत राहातात. हे मूळ गुजराथेंतील सामवेदी ब्राह्मण दिसतात. यांची शाखा राणायनी असावी. त्याचा रणावट असा अपभ्रंश हे आपल्या नांवापुढें वापरीत असावेत. पण सध्यां शुक्लयजुर्वेदी समजले जातात.

१० पल्लेवाळ—या शब्दाची व्युत्पत्ति समजत नाहीं. गुजराथेंतून महाराष्ट्रांत येऊन स्थायिक झालेले शुक्लयजुर्वेदी ब्राह्मण.

११ कास्त—शुक्लयजुर्वेदी ब्राह्मण. कास्तकरी म्हणजे शेतकरी. त्यांतला कास्त शब्द यांच्या नांवांत राहिला आहे. सध्यां हे ब्राह्मण कास्त हा शब्द न लावतां कात्यायन असें म्हणतात. हे कात्यायनसूत्री शुक्लयजुर्वेदी ब्राह्मण आहेत.

१२ जाबाल—हे आणि नार्मदीय एकच. जाबाल हें शाखेचें नांव आहे. हे गुजराथेंतून महाराष्ट्रांत आले.

१३ माळवी—माळव्यांतून आलेले शुक्ल यजुर्वेदी ब्राह्मण.

१४ लाड– गुजराथेंतून आलेले सामवेदी ब्राह्मण.

**१५ पोटजाती उत्पन्न होण्याचीं कारणें—**

महाराष्ट्रांतच पोटजाती आहेत असें नाहीं. प्रत्येक प्रान्तांत भरपूर पोटजाती आहेत. वेदाच्या संहिताची अनुपूर्वी शुद्ध राखण्याकरितां शाखाभेद उत्पन्न झाला आणि वंशशुद्धीच्या संरक्षणाकरितां जाती आणि पोटजाती उत्पन्न झाल्या.

चारहि वेदांच्या लोकांत वेदांमुळें पोटभेद उत्पन्न होण्याचें कांहींच कारण नाहीं. यज्ञामध्यें चारहि वेदांच्या लोकांची जरूरी असते. जे यज्ञांत एकत्र येतात ते रोटीप्रमाणें बेटीव्यवहाराकरितांहि एकत्र येतात; पण यज्ञांत प्रामुख्य असलेल्या यजुर्वेदांतच शुक्ल व कृष्ण असे दोन भेद याज्ञवल्क्या-मुळें पडले, आणि त्यामुळें इतर वेदांतहि दोन फळ्या पडून कांहींनीं शुक्लांची बाजू घेतली तर कांहींनीं कृष्णांची घेतली. आणि अशा तऱ्हेनें सर्वच वेदांत दोन जबरदस्त पक्ष उत्पन्न झाले. ऋग्वेद्यांपैकीं आश्वलायन-सूत्राचे लोक कृष्णयजुर्वेद्यांच्या बाजूला राहिले आणि सांख्यायनसूत्राचे लोक शुक्लांना मिळाले. साम आणि अथर्ववेद्यांतहि असेच भेद पडलेले आहेत. पण ते लोकच महाराष्ट्रांतून नष्ट झालेले असल्यामुळें सांख्यायन-सूत्राच्या लोकांप्रमाणें त्यांचा शोध बाहेर प्रांतांतच आपणांस घेतला पाहिजे.

यापेक्षां वसाहतीच्या कालभेदामुळें आगेंमागें आलेले लोक एकरूप होऊं शकले नाहींत. याकरितां गुजराथेंतून आलेले जंबू, नामर्दीय, पल्हे-वाळ वगैरे शुक्लयजुर्वेदी ब्राह्मण कसे अलग राहिलेत ते पाहावेत. शेतकी आणि सावकारी करण्यानें कांहीं ब्राह्मणांचा वर्ग अलग पडला. अल्प-संख्याक असल्यानें कोंकणांत कऱ्हाडे, देवरुख, किरवंत, जवळ, पळशे

हे कायमचे अलग पडले. खानदेशांत मैत्रायणी, आभीर आणि नागपुराकडे चरकांची स्थिति अल्पसंख्येमुळें कायमच्या चर्चेची होऊन राहिली. तीच स्थिति देशावर कोंकणस्थ चित्पावनांची झाली. त्यांत कांहीं लोक परप्रान्तांत जाऊन अभिमानानें अलग राहिले. समाजाच्या चालू चाली रीतीपेक्षां वेगळ्या आचारानें आणि विचाराच्या प्रगटीकरणानें सुधारक, सनातनी या जाती निर्माण झालेल्या आजही आपण पाहात आहोंत.

स्मार्त, वैष्णव हे खरोखर उपासनांचे सांप्रदाय आहेत. तेहेतीस कोटी देवतांना वागवून घेणाऱ्या भाविकांत त्यामुळें भेद उत्पन्न होऊं नये. पण तसा भेद उत्पन्न करण्याचा पद्धतशीर प्रयत्न झालेला आहे. शिव-विष्णूच्या उपासनेंतून अन्नविषयक शुद्धाशुद्धतेच्या कल्पनेचा प्रश्न उपस्थित करण्यांत आला. पण तो तितकासा यशस्वी होईना, तेव्हां स्मार्तांना वैष्णवांनीं आपल्या मुली देऊं नयेत असें प्रतिपादन सुरू झालें; त्याला शास्त्राधार सांपडणें शक्य नव्हतें. तेव्हां आचारविचारांच्या अखंड परंपरेकरितां वैष्णवांनीं वैष्णवानांच मुली द्याव्यात, तसें न झाल्यास एकादशीच्या दिवशीं श्राद्ध होण्याचा प्रसंग आल्यास मेल्यावर आपली एकादशी मोडेल. म्हणून स्मार्तांकडे मुली देणें अयोग्य होय. स्मार्त हे एकादशीस श्राद्ध करतात, पण माध्व वैष्णव एकादशीचें श्राद्ध द्वादशीस करतात. त्यामुळें माध्व वैष्णवांचें एकादशीस श्राद्ध कधींच होत नाहीं. तसेंच महाशिवरात्र वगैरे शिवव्रतांवर कटाक्ष ठेवणाऱ्यांकडून-स्मार्तांकडूनहि असें वर्तन होणें शक्य आहे. असे हे फरक, जाती निर्माण होण्यास कारण होतात. तथापि हा विचार तितका यशस्वी झालेला नाहीं. महाराष्ट्र व कर्नाटकांत स्मार्त वैष्णवांचे विवाहसंबंध पूर्वीपासून बिनहरकत होतात.

**६ इतर प्रांतांतील पोटजाती—**

महाराष्ट्रांतल्याप्रमाणें इतर प्रान्तांतहि पोटजाती निर्माण झाल्या आहेत. जाती व पोटजाती निर्माण होणें हा सृष्टीचा नियमच दिसतो. महाराष्ट्रां-

तील सवाशे ( सहवासी ), पांचकळशे व शाहण्णव कुळींचे मराठे या पोटजाती संख्यावाचक शब्दानें प्रसिद्ध आहेत.

गुजराथ व राजपुताना या भागांत ब्राह्मण व ब्राह्मणेतरांत संख्या-वाचक शब्दानें निर्देश केल्या जाणाऱ्या पुष्कळच पोटजाती आहेत. दशे, विशे, बावीसस्थान, एकसहस्र वगैरे नांवें विशेष ध्यानांत घेण्यासारखीं आहेत. असे गट त्या त्या वर्गांतील लोकांनीं आपली जमात शुद्ध रहावी म्हणून आपणहून निर्माण केलेले दिसतात. इतर ब्राह्मणांनीं बहिष्कार घातल्यानें किंवा ग्रामण्य केल्यानेंहि असे संख्यावाचक गट निर्माण झाल्याचें आढळतें.

गुजराथेंत मोढ, श्रीमाळी, दशाश्री, नागर ( वडोदरा-साठोदरा ), औदीच्य वगैरे ब्राह्मणांच्या पोटजाती प्रसिद्ध आहेत. याशिवाय कौथुमी सामवेदी, सांख्यायन ऋग्वेदी हे वेदांचे शाखाभेद तिकडे विशेष आढळ-तात. तसेंच सुरत जिल्ह्यांत शेती करणारे अनाविल ब्राह्मण आणि भडोच-च्या आसपास असणारे भार्गव ब्राह्मण लक्षांत घेतले पाहिजेत.

गुजराथेंत अशा सुमारें ३६० पोटजाती ब्राह्मणांत आढळतात.

राजपुतान्यांत सारस्वत, गौड, दाधीच, पुष्कर आचार्य, भट, चारण नन्द, पल्लीवाल, वगैरे ब्राह्मणांच्या पोटजाती आढळतात. जयपूर--जोधपूरकडील ब्राह्मण आपणांस गौड म्हणवून घेतात हें विशेष लक्षांत घेण्यासारखें आहे. गौड हें बंगालप्रान्ताच्या एका भागाचें नांव आहे. त्यावरून द्राविड व गौड असा ब्राह्मणांचा भेद पडला असावा अशी समजूत आहे. पण बंगालमधील ब्राह्मण कान्यकुब्ज ब्राह्मण आहेत. कान्यकुब्ज ब्राह्मणांनीं बंगालमध्यें मुसलमानी अमलाच्या आरंभीं वसाहत केली अशी समजूत आहे. तात्पर्य, बंगालमध्यें जे सध्यां ब्राह्मण आहेत, ते पंचगौडांपैकीं कान्यकुब्ज ब्राह्मण असून शुद्ध गौड जयपूर, जोधपूर या राजपुतान्याच्या बाजूस आढळतात. उत्तर हिंदु-

स्थानच्या प्रमुख भागाला पांचव्या शतकाच्या सुमारास गौड म्हणत असें मागें दाखविलें आहेच. याशिवाय बंगाल्यांत वैदिक, राधाकुलीन, वारेन्द्र, उत्तरराढी, दक्षिणराढी दैवज्ञ वगैरे प्रांतिक नांवानें प्रसिद्ध असणारे १५ पोटभेद आढळतात.

सोरटीसोमनाथाच्या आसपास 'तुर्की ब्राह्मण' आढळतात. पुण्या-शेजारीं देवाच्या आळंदीस 'तुर्की' आडनांवाचें शुक्लयजुर्वेदी काण्वशाखेचें घराणें आज दीडशें वर्षांपूर्वीपासून नांदत आहे. दक्षिण हैद्राबाद येथें अरब आडनांवाचें दे. ऋ. ब्रा. घराणें आहे. पुष्कळ ब्राह्मणांना कारभारी म्हणून मालकाचीं नांवें प्राप्त झालीं. त्यांतलाच हा प्रकार दिसतो.

संयुक्तप्रान्तांत कान्यकुब्ज, शरयुपारीण, पांचाल, सारस्वत, सनाढ्य, तिवारी वगैरे ब्राह्मणांच्या जाती प्रसिद्ध आहेत. सिंधप्रान्तांत दाहीर, पुष्कर वगैरे ब्राह्मणांच्या जाती प्रसिद्ध आहेत. मुहम्मद कासीमनें पराजय केलेला दाहीर राजा शुक्लयजुर्वेदी ब्राह्मणच होता.

आन्ध्रांत याज्ञवल्क्य, वेलनाड व तैलंगाण्यम्, कर्नाटकांत कावेरी, आराध्य व तुलव, तसेंच त्रावणकोरकडे नंबुद्री ब्राह्मण प्रसिद्ध आहेत. कर्नाटकांतील तुलव ब्राह्मण परशुरामाने कोळ्याचे ब्राह्मण केले अशी त्यां-संबंधी महाराष्ट्रांतील चित्पावनांच्याप्रमाणें आख्यायिका आहे. मध्वाचार्य तुलव ब्राह्मण होते. कर्नाटकांत सुमारें १७ पोटभेद आढळतात.

पंजाब व सिंधकडील ब्राह्मण आपणांस सारस्वत म्हणवितात. त्यांच्यां-तहि अनेक पोटजाती आहेत काश्मीरी ब्राह्मणांत २२१ पोटजाती आहेत. विशेषतः काश्मिरी ब्राह्मण कृष्णयजुर्वेदी कठ शाखेचे आहेत, व त्यांचें गृह्यसूत्र लौगाक्षिकृत आहे. ते आपणांस गौड म्हणवीत नाहींत.

उत्कलांत श्रोत्रिय, पंडा, घाटिया, कलिंग वगैरे सहा पोटभेद आहेत. मैथिल ब्राम्हणांत ठाकूर, मिश्र, झा, श्रोत्रिय वगैरे सहा पोटभेद आहेत

याशिवाय काशीच्या आसपास राहणारे शाकद्वीपीय ब्राह्मण हे ब्राह्मण

शाकद्वीपातून हिंदुस्थानांत आले. यांनांच आचार्यब्राह्मण, आंगिरस ब्राह्मण, भोजकब्राह्मण, सोमकब्राह्मण अशीं पोटभेदात्मक नांवें आहेत. हे शाकद्वीपचे मूळचे राहणारे. शाकद्वीप नांवाचा प्रदेश इराणच्या आसपास कोठेंतरी असावा. शाक, शक व शाकद्वीप यांचा संबंध मानण्याकडे सर्वांचा कल आहे. ग्रीसपासून चीनपर्यंत पसरलेल्या प्रदेशांत चातुर्वर्ण्यात्मक वैदिक संस्कृति पसरलेली होती. तिच्यांतून पुढें अनेक वेगळाले धर्म उदयास आले.

शाकद्वीपीय ब्राह्मण कृष्णपुत्र सांबानें प्रथम हिंदुस्थानांत आणले. सांबाला कुष्ठरोग झाला होता. शाकद्वीपीय ब्राह्मणांकडून सूर्याचें अनुष्ठान करवून त्यानें आपला कुष्ठरोग बरा करून घेतला. त्याकरितां त्यानें मूलसांबस्थान ऊर्फ मुलतान येथें सूर्यमंदिर बांधविलें. ह्यूएन्त्संग आला तेव्हां तें तेथें होतें. शाकद्वीपीय ब्राह्मणांचा पोषाख—१ अव्यंग ( सापाच्या कातीचें जानवें ), २ कुंचला, ३ कंचुक, ४ दोले, ५ अग्निहोत्र असा असे. ही सर्व माहिती भविष्यपुराणांत सविस्तर सांपडते ( भविष्य. ब्राह्म १४०–१४२ ).

या शाकद्वीपीय ब्राह्मणांप्रमाणेंच बंगाल प्रान्तांतील मूळ ब्राह्मण व महाराष्ट्रांतील चित्पावन ब्राह्मण हेहि हिंदुस्थानच्या बाहेरून हिंदुस्थानांत आले अशी आख्यायिका आहे. पण ती आख्यायिका प्रतिस्पर्ध्यानें केवळ निन्दा करण्याकरितां निर्माण केली आहे का तिच्यांत कांहीं तथ्य आहे हें आज सांगणें कठीण आहे. एवढी गोष्ट खरी कीं, दोन हजार वर्षांची ब्राह्मणजातीची स्थिति अशी आहे कीं, तिच्यांत बाहेर देशांतून आलेले लोक इतके तन्मय होऊन एकरूप होणें संभवनीय दिसत नाहीं. चित्पावन ब्राह्मणांच्या घराण्यांचे प्रसिद्ध झालेले इतिहास पाहतां त्यांत पंधरा पिढ्यांपूर्वीची आपली स्थिति दाखविणारें एकहि घराणें नाहीं. पांचशें वर्षांपूर्वींपर्यंतसुद्धां ज्यांचा इतिहास पोंचविण्यास साधनें नाहींत ते लोक बाहे-

रून आले हें म्हणणें विश्वासार्ह नाहीं.

हिंदुस्थानांतील ब्राह्मण आणि त्यांच्या पोटजाति यांच्या माहिती-करितां जॉन विल्सनकृत ' इंडियन कास्ट ' (स. १८७७) या पुस्तकाचा दुसरा खंड पाहण्यासारखा आहे.

**७ उपसंहार—**

महाराष्ट्र हिंदुस्थानापासून निराळा असा अलग प्रान्त नव्हे. तो हिंदु-स्थानचाच एक अविभाज्य असा भाग आहे. म्हणून महाराष्ट्राचा विचार करावयाचा झाल्यास अखिल हिंदुस्थानचा विचार करावा लागतो. हीच गोष्ट जाति, धर्म, भाषा, समाज यांचा विचार करतांनाहि ध्यानांत ध्याव-यास पाहिजे.

महाराष्ट्र हा जसा हिंदुस्थानचा एक भाग, त्याप्रमाणेंच महाराष्ट्रांतील ब्राह्मण हे हिंदुस्थानभर पसरलेल्या ब्राह्मणांचा एक भाग, असा विचार केला तरच तो पूर्ण विचार होणार आहे. ही दृष्टि ठेवूनच आर्यावर्त म्हणजे गंगा--यमुनांचा दुआब ही कल्पना वाढवीत सर्व हिंदुस्थानला लावण्यांत आली. तसेंच प्रान्ताप्रान्तांत विभागलेल्या ब्राह्मणांना दशविध ब्राह्मणांच्या एका सूत्रांत गोवण्यांत आलें.

महाराष्ट्रांतिल ब्राह्मणवर्गाची स्थूल कल्पना वरील माहितीवरून येईल. यापेक्षां अधिक सूक्ष्म निरीक्षण व्हावयास पाहिजे. ब्राह्मण हा हजारों वर्षें ज्ञानाचा संग्रह व उपासना करणारा आहे. त्यांनीं ज्ञानाची उपासना करून आपलें ज्ञान केवळ पुस्तकांत न ठेवतां व्यवहारांत आणण्याचा प्रयत्न केला आणि नवें ज्ञान आत्मसात् करण्याचा अखण्ड प्रयत्न चाल-विला आहे. त्यामुळें त्यांच्या आहारापासून पोषाखापर्यंत आणि उच्चारा-पासून आचारापर्यंत प्रत्येक गोष्टींत हजारों वर्षांचा इतिहास आढळतो. त्याची आणि विशेषतः देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणाची याची सर्व प्रकारची माहिती नमूद करावयाची आहे.

# प्रकरण ९ वें,

# आचार

आर्धी कर्माचा प्रसंग । कर्म केलें पाहिजे सांग ॥
कदाचित् पडले व्यंग । प्रत्यवाय घडे ॥ दास. ११–८–१

**१ प्रास्ताविक—**

आपल्या घरांत अनेक आचार, अगदीं पध्दतशीरपणें चालू आहेत. त्याचें स्वरूप आपणांस थोडक्यांत मांडावयाचें आहे. विचार, उच्चार आणि आचार असा आपल्या मनोव्यापारांचा क्रम लावतां येईल. आपल्या मनांत येणाऱ्या विविध विचारांपैकीं फार थोडे आपणांस प्रत्यक्ष उच्चारण्यासारखे वाटतात. आणि त्यांपैकीं कांहीं आपण आचारांत ग्रथित करून प्रत्यक्ष व्यवहारांत त्यांना कायमचें स्थान देतों. यावरून आचार हे आपल्या परिपक्व विचाराचें मूर्त स्वरूप आहे असें ठरतें. म्हणूनच समाजाचें किंवा व्यक्तीचें अन्तःकरण त्याच्या आचारावरून किंवा वर्तनावरून पारखावयाचें असतें. धर्म हा विषय व्यासपीठावरून उपदेश करण्याचा नाहीं किंवा ग्रंथरूपानें लिहून ठेवण्याचा नाहीं तर प्रत्यक्ष आचरणांत आणण्याचा आहे. म्हणून आचार हा मुख्य धर्म आहे असें आपण म्हणतों. त्या आचाराचा परलोकापेक्षां ऐहिक व्यवहाराशींच जास्त संबंध आहे असें आपणांस दिसून येईल. अहिंसा, सत्य, अस्तेय, इंद्रियनिग्रह व मनःशुद्धि हें आचारधर्माचें ध्येय आहे.

आपल्या आचारांची पाहणी केली असतां त्यांत अनेक गोष्टींचा मोठ्या कुशलतेनें समावेश केला आहे असें आपणांस दिसून येईल. वर्षांतून आपण अनेक सण साजरे करतों. तसेंच रोजच्या कार्यक्रमांतहि आपण अनेक नित्यकर्मांचा समावेश करतों. त्यापैकीं श्रावणी हा दिवस आपण

आपल्या वेदप्रवर्तक ऋषींच्या स्मरणाकरितां साजरा करीत असतों. त्या दिवशीं ऋषींचें आपण पूजन करतों आणि त्यांना ऋषिपदवी मिळवू देणाऱ्या वैदिक ग्रंथांतील आरंभीची वाक्यें आपण म्हणतों. ऋग्वेदसंहितेसारख्या ग्रंथाची तर प्रत्येक मण्डळाची आरंभींची आणि शेवटची वाक्यें ते म्हणत होतें त्या पद्धतीनें आपण उच्चारतों, होम करतों. त्यांच्या पद्धतीनें स्नान शरीरशुद्धि वगैरे गोष्टी आपण करून त्यांचें नांव, त्यांचें ग्रंथ आणि त्यांची उपासनापद्धती याशीं साक्षात् परिचय ठेवण्याकरतां श्रावणीसारखा सण मुद्दाम साजरा करण्यांत येतो. त्याचे उपाकर्म ( श्रावणी ) आणि उत्सर्जन ( माघ ) असें दोन भाग आहेत. उपाकर्म करून गुरुजवळ बसून शिकण्यासारखे असेल ते सहा महिने शिकावयाचें आणि माघ महिन्यांत उत्सर्जन करून बाहेर शिकण्यासारखे शास्त्रादि विषय शिकावयाचें. अशा पद्धतीनें वर्षाचे दोन भाग करून सर्व विधांत होण्याची ही योजना आहे. अशा पद्धतीनें वर्षांतील दोन दिवस आणि नित्यकर्मांतील ब्रह्मयज्ञाचे दररोजचा अगदीं थोडा वेळ खर्चून आपल्या हजारों वर्षांपूर्वींपासूनच्या वैदिक ऋषींचा आणि त्यांच्या ग्रंथांचा कायमचा संबंध आपण आपल्या रोजच्या व्यवहारांत ग्रथित केला आहे. अगणित द्रव्य खर्चून उभारलेल्या ग्रंथशाळा, संशोधन मंडळे साम्राज्यसत्तेच्या किंवा जोरावर उभारलेलीं स्मारकें यांनीं जें काम होऊं शकत नाहीं ते केवळ धार्मिक योजकता व भावना यांच्या जोरावर प्राचीन ऋषिमुनींनीं घडवून आणलेलें पाहून कोणालाहि आश्चर्य वाटेल.

प्राचीन कालच्या आपल्या पूर्वजांचा म्हणजे ऋषिमुनींचा बहुतेक काल एकान्तात तत्वचिंतन करण्यांत जात असे. एखाद्या नदीच्या तीरावर निवान्त जागीं आश्रम बांधून राहिलेले ते आढळतात. त्यांच्या भोवतीं लहानमोठ्या अनेक शिष्यांचा समुदाय असावयाचा. ठराविक पोषाक, ठरविलेला साधा आहार, अग्नीची उपासना

आणि अध्ययन, अध्यापन नि प्रवचन ही येथील दिनचर्या असावयाची. राजेमहाराजांना सुद्धां ज्या स्थलाचा दरारा वाटे, आणि पशुपक्ष्यांनीं सुद्धां ज्या स्थलाबद्दल आदर व्यक्त करावा अशी एकंदर येथील वर्तणूक असे. ज्ञानाची अखण्ड उपासना येथें चालत असे. त्याग आणि सेवा यांचा उच्च आदर्श त्या ठिकाणीं पाहावयास मिळे. अशा या ब्राह्मणांच्या अखण्ड चाललेल्या तपश्चर्येंतून किंवा तत्वचिंतनांतूनच वेदशास्त्रासारखें अलौकिक वाङ्मय निर्माण झालें. आणि उपनिषदासारख्या ग्रंथांनीं तर तत्वज्ञानाची सीमा गाठली. आदर्श चारित्र्याचा रामायणग्रंथ आणि नीति-प्रधान संस्कृतीचे धडे देणारा महाभारत ग्रंथ यांचें जन्मस्थान ब्राह्मणांचें जीवन होय. तप म्हणजे विचार आणि विचार करणाऱ्याला जगांत अशक्य कांहींच नाहीं असा ब्राह्मणांचा सिद्धांत आहे.

**२ वैदिक—**

एकान्तांत बसून तत्त्वचिंतन करणें हें जितकें महत्वाचें आहे तितकेंच उत्सवप्रधान असणाऱ्या लोकांना झेपतील असे समारंभ साजरे करणें फार जरूर असते. सध्यां राजकीय कार्यांत सुद्धां सप्ताह, प्रदर्शनें, मिरवणुका, परिषदा, वाढदिवस वगैरे अनेक कार्यक्रम साजरे केले जातात. लहानमोठे यज्ञ हे वैदिक आचार, अशा समारंभासारखेच होत. अशा यज्ञाकरतां अग्निहोत्रग्रहणाची जरूरी असते. आतां विशेष साहाय्या-शिवाय अशीं अग्निहोत्रें ठेवणें किंवा यज्ञयागादि कृत्यें करणें अशक्य झालें आहे. तथापि आपल्या समाजांत भोरचे होशिंग, सुमारें चौदा पिढ्या क्रमानें अग्निहोत्र ठेवणारे आहेत व वाईचे राजाराम केशव पुराणिक यांज-कडे आज दोन पिढ्या अग्निहोत्र आहे व त्यांच्या हातून कांहीं महत्वाचे यज्ञहि झालेले आहेत. होशिंगांना अलीकडे सहा पिढ्या भोरचे राजे पंतसचीव यांचा आश्रय आहे. वैदिक ग्रंथाचें अर्थयुक्त ज्ञान जागृत राहण्यास यज्ञकर्म प्रत्यक्ष हातून घडणें अत्यंत आवश्यक असते.

अशा अग्निहोत्र ठेवणारांना अग्निहोत्र ठेवण्यास व यज्ञयागादि करण्यास उत्तेजन देणें वेदसंरक्षणाच्या दृष्टीनें अत्यंत आवश्यक आहे. ज्या-प्रमाणें वैदिककर्में करण्यास अग्निहोत्र ठेवणें आवश्यक आहे. त्याप्रमाणेंच स्मार्त संस्कारादि कर्मे पार पाडण्यास स्मार्ताग्नि ठेवणेंहि तितकेंच आवश्यक आहे. अग्निहोत्रापेक्षां स्मार्ताग्नि ठेवणें सुलभ असल्यानें स्मार्ताग्नि ठेवणारीं कांहीं माणसें अद्यापि आढळतात. स्मार्ताग्नीला गृह्याग्नि असेंहि म्हणतात. या अग्नीवर आपले उपनयनादि सर्व संस्कार होत असतात.

यज्ञयागादि कृत्यें करण्याला अग्निहोत्राची जशी आवश्यकता आहे, त्याचप्रमाणें वेदाध्ययनाचीहि पण गरज आहे. वेदाध्ययन प्रत्येक ब्राह्मणानें करणें आवश्यक आहे. वेदाध्ययन केलेल्या लोकांना मान देण्याची प्रवृत्ति कमी होत असून, अलीकडे त्यांची उपजीविका नीट चालत नाहीं. त्या-मुळें या वेदादिशिक्षणाकडे लोकांची असावी तशी प्रवृत्ति नाहीं. शहरापासून दूर असलेल्या खेड्यांत, तीर्थक्षेत्रांत आणि परंपरेनें वृत्ति अस-लेल्या लोकांतच फक्त अद्यापि वेदाध्ययन चालू आहे. चाळिशी उलटलेल्या कोणाहि ब्राह्मण गृहस्थाला संध्या, पूजा वगैरे नित्यकर्मांपैकीं कांहीं विधि व अथर्वशीर्ष, पुरुषसूक्त, रुद्र, श्रीसूक्तासारखीं कांहीं वैदिक सूक्तें येत असतात. पण अलीकडील पिढींतील लोकांना, गायत्रीमंत्राखेरीज फारसें कांहीं येत नसते. अशा स्थितींत यज्ञयागादि कर्मे तर राहोत, पण संस्कार व नित्यकर्में व्यवस्थित होणें कठीण होत चाललें आहे.

**३ संस्कार—**

संस्कार हे मनावर परिणाम करण्याकरितां असतात. आवश्यक ध्येय मनावर बिंबवावें आणि ध्येयापासून मन केव्हांहि चळू नये म्हणून वैदिक ऋषींनीं अनेक संस्कार करावयास सांगितलें आहेत. संस्कार म्हणजे ध्येय-वादाची शिकवण होय. म्हणून संस्कार मोठ्या गांभीर्यानें, वाजतगाजत, आप्तइष्टांच्या मेळाव्यांत करण्याची पद्धत आहे. संस्काराचें गांभीर्य किंवा

परिणाम करण्याची शक्ति नेहमीं टिकविण्याचा प्रयत्न केला पाहिजे. त्या दृष्टीनें आपल्या संस्कारांची मांडणी मोठी व्यवस्थित, परिणामकारक आणि सर्वसंग्राहक करण्यांत आली आहे.

वैदिक मंत्रांनीं होणाऱ्या संस्काराविषयीं अद्यापि समाजांत आस्था आहे. चौल ( शेंडी ), उपनयन ( मुंज ), समावर्तन ( सोडमुंज ), विवाह, गर्भाधान आणि अन्त्येष्टि हे संस्कार अद्यापि मोठ्या आस्थेनें करण्यांत येतात. बाकीचे संस्कार वैदिक पद्धतीनें होत नसले तरी लौकिक विधींनीं साजरे करण्यांत येतात. आणि होणाऱ्या संस्काराच्या वेळीं ते संस्कार वेळेवर झाले नाहींत म्हणून प्रायश्चित्त करण्यांत येते.

हे संस्कार वेळेवर आणि यथासांग व्हावेत, याकडे लोकांचा कटाक्ष आहे. या संस्कारांचा मुख्य आधारग्रंथ ' आश्वलायनगृह्यसूत्र ' होय. त्या सूत्राच्या आधारें काशीच्या जगद्गुरु नारायणभट्ट यांनीं आखलेले संस्कारांचे प्रयोग सर्वमान्य समजण्यांत येतात. ते ' नारायणभट्टी ' या नांवानें प्रसिद्ध आहेत.

हें सूत्र ख्रि. पूर्व पांचव्या शतकापूर्वी झालेलें असलें पाहिजे असें त्यांतील ' शूलगवा'सारख्या विधीवरून वाटतें. त्यांत विवाहविधींत देशधर्म व ग्रामधर्म यांना महत्व दिलेलें असून, कार्यांत म्हाताऱ्या पुत्रवती स्त्रियांच्या म्हणण्याला मान देण्याविषयीं अगत्यपूर्वक सांगितलें आहे. सध्याच्या विवाहसंस्कारांत सर्वांचेंहि समाधान राखण्याकरतां उत्पन्न झालेलें सीमान्तपूजन, रुखवत, घाणा, उष्टीहळद, स्नानें, अहेर, मिरवणूक, मंगलाष्टकें, भोजन, वरात व झाल वगैरे समारम्भ कसे सुरू झाले असतील याचा उलगडा जनपदधर्म व ग्रामधर्म यांच्या अगत्यवादावरून होतो. म्हणजे धार्मिक नसणारे विधीहि लौकिक, लोकसंग्रह वगैरे कारणांनीं केले जातात आणि खानदानीच्या अनेक लोकांशीं संबद्ध असणाऱ्या आणि समाजाचे नेतृत्व ज्यांच्याकडे आलें आहे त्यांना असे लहानमोठे प्रसंग

उत्पन्न करून आपल्याशीं संबंध येणाऱ्या लोकांचा परामर्श घ्यावा लागतो. त्यापैकींच लग्नमुंजीसारख्या समारंभांतील लहानमोठे विधि असतात. समाजांतील पुढारीपण नष्ट झालें, लोकांच्या उपयोगी पडण्याची शक्ति कमी झाली, आर्थिक स्थिति पालटली आणि राजसत्तेशीं असलेला संबंधहि तुटला. त्यामुळें मोठाल्या वाड्याप्रमाणें आवश्यक म्हणून स्वीकारलेले धार्मिक विधिहि अवजड, बोजड, निरुपयोगी व टाकाऊ वाटूं लागले. तथापि हे वाढलेलें संस्कारविधींचें स्वरूप किती संक्षिप्त करतां येतें, हें आपणांस आश्वलायनगृह्यसूत्रासारखे ग्रंथ आजहि सांगूं शकतात. त्या धोरणानेंच आपणांस वागणें इष्ट आहे. अलीकडे कांहीं मंडळांनीं सुरू केलेले वैदिक विवाह, उपनयनादिकांचे विधि, भावना, परिणाम आणि मूलभूत आधारग्रंथाकडे दुर्लक्ष करून तयार केलेले असल्यामुळें शास्त्राला धरून नाहींत. त्यांनीं धर्मविधीच्या मागें असणारी धार्मिक भावना ते संस्कार करतांना ध्यानांत घेतलेली नाहीं. तसेंच वेदप्रामाण्य, आस्तिक्य किंवा श्रद्धा यांच्या ते मूलतःच विरोधी आहेत. त्यामुळें त्यांचे संस्कारविधी स्वीकारण्यासारखे नाहींत. केवळ बुद्धिवादानें हा प्रश्न सुटण्यासारखा नाहीं. जातिसंस्था, गोत्रप्रवर वगैरे कोणत्याहि सांस्कृतिक गोष्टीच्या विरुद्ध असणाऱ्या लोकांनीं लोकांच्या श्रध्दाबुध्दीचा फायदा घेण्याचा व्यापार करणें अयोग्य आहे.

या संस्कारांच्या विधींत अनेक लौकिक गोष्टींचा समावेश करण्यांत आला आहे. वैदिक पौराणिक मंत्राबरोबर मराठी भाषेंतील कांहीं वाक्यें मंत्रासारखी जुन्या वळणाच्या स्त्रियांकडून व प्रसंगीं पुरोहितांकडून म्हटलीं जातात. मंत्राप्रमाणें तंत्रहि उत्पन्न झालेलें आहे, त्याचा अभ्यास होणें इष्ट आहे.

तांत्रिक भागांत तेलफळासारखे आचार दे. ऋ. ब्राह्मणांत नाहींत. तसेंच तेलसाडीसारखा आचार आमचा नाहीं असें चित्पावन ब्राह्मण म्हणतात.

मामेबहीणीशीं लग्न करण्याची चाल आमची नाहीं असें आग्रहानें

प्रतिपादणारे लोकहि पुढील गोष्टी अगत्यपूर्वक करतात.

१. सोडमुंजीच्या वेळीं मुलगा काशीस जाण्यास निघतो, तेव्हां मामा त्याला जाऊं देत नाहीं व आपली मुलगी देण्याचें आश्वासन देतो. २. लग्नाच्या वेळीं वधू ज्या वेळीं घरीं येते, तेव्हां वराची बहीण आडवी येते, त्या वेळीं नववधू व वर वराच्या बहिणीच्या मुलाला स्वतःची मुलगी देण्याचें आश्वासन देतात.

तसेंच १ वाङ्निश्चयाच्या वेळीं लागणारी मामाची संमति. २ विवाहाच्या वेळीं मामानें वधूला लग्नस्थळीं आणून तेथें पाठीशीं त्यानें उभे राहणें.

यावरून मातुलकन्यापरिणयाची चाल असलेल्या देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणांनीं प्रचारांत आणलेला विवाहविधिच इतर सर्व ब्राह्मणांनीं–चित्पावनांनीं सुद्धां उचललेला आहे हें उघड होतें.

**४ नित्यकर्म—**

संध्यावंदनांतील अर्घ्यप्रदान व गायत्रीजप, ही सूर्याची उपासना अत्यंत महत्वाची आहे, यांत संशय नाहीं. अगदीं थोड्या साधनांत देवतांची उपासना करण्याचा हा प्रकार इतरत्र कोठेंहि आढळणार नाहीं. गायत्री मंत्रासारखा अत्यंत छोटा मंत्र पण त्यांत अर्थगांभीर्य मात्र भरपूर आढळतें. साधेपणाला तर तोडच नाहीं. त्यालाच अन्तःशुद्धीकरतां प्राणायामाची आणि दिग्वंदनाचा प्रकार घालून सृष्टीकडे पाहाण्याची व्यापक दृष्टी देऊन प्रांतिक चतुःसीमा उल्लंघून जागतिक चतुःसीमा डोळ्यापुढें ठेवण्याचें कार्य केलें आहे.

नित्य करावयाच्या पंच महायज्ञांपैकीं चार यज्ञ वैश्वदेवामध्यें येतात. त्यांचीं नांवें अनुक्रमें, देवयज्ञ, भूतयज्ञ, पितृयज्ञ व मनुष्ययज्ञ हीं होत. हे चार यज्ञ म्हणजे मनुष्यप्राण्याच्या कर्तव्यबुध्दीला दिलेलें आवाहनच आहे. व्यवहारांत स्वतःच्या उपजीविकेशिवाय अनेक कर्तव्यें असतात. मनुष्याला जगांत जगण्याला अनेकांच्या साह्याची जरूरी असते. ही गोष्ट ध्यानांत

आणून देण्याचें काम वैश्वदेवासारखे नित्यविधि करतात. अन्न सम्पादन करण्यापासून तें आपल्या तोंडांत जाईपर्यंत किती तरी जीव कामीं येतात. त्यांच्या संबंधीं कृतज्ञता व्यक्त करणें हें आपलें कर्तव्य आहे. त्या दृष्टीनें देव—भूत यांना आहुती देऊन त्यांच्या ऋणांतून मुक्त व्हावयाचें असतें. तसेंच आपल्याला निरोगी पिंड देणारे पितर आणि देशधर्माकरितां श्रम-साहसाचीं कामें करणारे अतिथि अभ्यागत, यांचेंहि स्मरण असणें आव-श्यक आहे. तें काम पितृयज्ञ व आतीथियज्ञ यांनीं केलें जातें. ब्रह्मयज्ञानें राष्ट्रांतील ज्ञानसंवर्धन करणाऱ्या ऋषीमुनींचें तर्पण करावयाचें असतें. तें तर्पण केवळ पळीभर पाणी देऊन करावयाचें नसून त्यांच्या ग्रंथांचें पठण-पाठण करून करावयाचें असते.

श्रावणीप्रमाणेंच नित्यकर्मांत ब्रह्मयज्ञाचा समावेश करून आपले धर्म-ग्रंथ, त्यांचे कर्ते, आपले इतर पूर्वज व देवता यांच्याशीं आपला निकटचा परिचय घडवून आणलेला आहे. ब्रह्मयज्ञांत सर्व वैदिक ग्रंथांच्या प्रारंभीचीं वाक्यें, प्रथम म्हणण्यांत येतात. आणि नंतर देवतांचें तर्पण करून, वैदिक महर्षि, पितृभूत आचार्य, आणि स्वतःचे पितर म्हणजे पितृत्रयी, मातृत्रयी, मातामह्यादित्रयी, पितृव्य, मातुल, भ्राता, पितृभगिनी, मातृभागिनी, आत्मभगिनी, श्वशुर व गुरु यांचें नामग्रहणपूर्वक तर्पण केलें जातें. यामुळें वेद व वेदांगें, तसेंच स्मृति व षट्शास्त्रें, यांच्याशीं प्रत्येक ब्राह्मणाचा साक्षात् परिचय रहातो. व त्यांच्या कर्त्यांचीहि नामावलि प्रत्येक ब्राह्मणांच्या पाठांतरांत येते. इतिहास संरक्षणाच्या दृष्टीनें श्रावणी व ब्रह्मयज्ञ, यांचा आपल्या नित्य व नैमित्तिक कर्मांत समावेश करून, आपल्या पूर्वजांनीं फार महत्वाची कामगिरी करून ठेवली आहे. ज्ञान-सम्पादनाबरोबर तें ज्ञान नित्य व्यवहारांत बसविणें हें काम महत्वाचें असतें.

**५ श्राद्ध —**

वार्षिक मातापितरांच्या श्राद्धाशिवाय सर्व पितरांना उद्देशून भाद्रपद

वद्यांत महालय ( पक्ष ) करण्याची पद्धति आहे. आईचे श्राद्धांत आई, आजी, व पणजी तसेंच पित्याचे श्राद्धांत जनक, आजोबा व पणजोबा यांचाच समावेश होतो. पण भाद्रपद वद्यांतील पक्ष–श्राद्धांत मातापित्यांकडील सर्व मृत नातेवाईकांचा उल्लेख येतो. शिवाय, श्वशुर, गुरु, कुलगुरु, आप्तइष्ट, उपकर्तें, मित्र वगैरेंचा समावेश असतो. या वेळीं प्रत्येक मृत व्यक्तीचा नांव, गोत्र व नातें या दृष्टीनें उल्लेख करून, त्याचें श्राद्ध करावयाचें असतें. याशिवाय अश्विन शुद्ध १ ला मातामहाचें म्हणजे आईच्या वडिलांचें श्राद्ध नातवानें करावयाचें असतें. तसेंच भाद्रपद शुद्ध १५ ला प्रपितामहांच्या म्हणजे पणजाचा बाप, आजा व पणजाचे नामगोत्रपूर्वक उच्चार करून श्राद्ध करावयाचें असतें. या श्राद्धास प्रौष्ठपदीश्राद्ध असें म्हणतात.

याशिवाय भाद्रपद वद्य ९ चे दिवशीं मृत झालेल्या सुवासिनी मातेचें श्राद्ध पुत्रानें करावयाचें असतें. संक्रांत, अक्षय्यतृतीया ही श्राद्धें सणाच्या स्वरूपांतच साजरीं केलीं जातात. हीं सर्व श्राद्धें नियमित करणाऱ्यांना मातेकडील पांच पिढ्यांची व पित्यांकडील सात पिढ्यांची माहिती नाम व गोत्रासह सहज राहू शकते. आपल्या समाजांत हीं सर्व श्राद्धें पिंडदानपूर्वक मोठ्या श्रद्धेनें करण्याची प्रथा आहे.

६ व्रतें—

वर्षप्रतिपदेचा सण साजरा झाल्यानंतर तृतीयेच्या दिवशीं गौरीची स्थापना करून वसंतोत्सव करण्याची चाल सर्वत्र आहे. ही गौरी झोपाळ्यावर बसविलेली असते. तिचें नित्य पूजन करतात व अक्षय्यतृतीयेपर्यंत केव्हां तरी एके दिवशीं आरास करून हळदीकुंकवाचा समारंभ साजरा करतात. हळदीकुंकवाकरतां पुष्कळ स्त्रिया बोलावून त्यांना फळफळावळ, अत्तरगुलाब देऊन हरबऱ्यानें ओट्या भरतात.

आषाढ वद्य ३० चे दिवशीं दीपपूजा करण्याची चाल आहे. त्या

दिवशीं घरांतील सर्व दिवे स्वच्छ करून त्यांची पूजा करतात. आणि कण-कीचे व बाजरीच्या पिठाचे दिवे करून ते उकडून त्याचा नैवेद्य दाखवितात.

श्रावणांत नागपंचमीचे दिवशीं नागाची पूजा करतात व नैवेद्या-करतां पुरणाचीं दिंडें करतात. नागाच्या दर्शनाकरतां स्त्रिया व मुलें वारु-ळावर जातात.

श्रावण वद्य ३० ला पिठोरीचें व्रत कामानिक किंवा नवसाचें म्हणून करतात. हें व्रत संतती–निमित्तानेंच असते. याशिवाय श्रावण महि-न्यांतील प्रत्येक वार हा व्रतासारखाच केला जातो. सोमवार शंकराचा, मंगळवार देवीचा, बुधवार बुधाचा, गुरुवार बृहस्पतीचा ( गुरुचा ), शुक्रवार जीवंतिका देवीचा, शनवार नृसिंहाचा अगर शनि–मारुतीचा व रविवार श्रीसूर्यनारायणाचा असें प्रत्येक वार त्या त्या देवतांचें पूजन करून सुवासिनी-ब्राह्मणभोजन व आरती वगैरे पूजा पद्धतीनें साजरे करतात. या वारांचीं व्रतें विस्तारपूर्वकहि पुष्कळ ठिकाणीं करतात. त्यांच्या कहाण्या, व्रताच्या पद्धति, पूजेचें प्रकार व नैवेद्यहि कांहीं कांहीं ठराविक असतात.

या वारांच्या देवतांचा चित्रपट प्रत्येक घरीं लावतात. त्यांत नाग, नृसिंह, जीवंतिका, बुध व बृहस्पती इतक्या मूर्ति असतात. त्यांना आघाडा, दूर्वा व फुलें यांच्या माळा बांधतात. शुक्रवार पुत्रवती सुवा-सिनी स्त्रिया जास्त महत्वाचा मानतात. त्या दिवशीं जीवंतिकेची विशेष प्रकारची पूजा केली जाते व श्रावण महिन्यांतील एका शुक्रवारीं कुलधर्म करून पुरणाचा नैवेद्य दाखविला जातो.

रविवारच्या सूर्यव्रताची माहिती इतरत्र दिलेली आहे. मंगळवारीं मंगळागौरीची पूजा लग्न झाल्यावर पहिलीं पांच वर्षें करतात. त्याचा हेतू पतीला दीर्घायुष्य प्राप्त व्हावें हा असतो. सोमवारीं उपवास करण्याची पद्धति आहे. तो सायंकाळीं सोडतात. नूतन विवाहित स्त्रिया पांच वर्षें-

पर्यंत श्रीशंकराच्या मंदिरांत जाऊन शिवामूठ वाहतात. शिवामुठीला क्रमानें तीळ, तांदूळ, मूग, गहूं वगैरे पदार्थ घेतात.

भाद्रपदांत शुद्ध तृतीयेस हरितालकेची पूजा करण्याची चाल सर्व ब्राह्मण वर्गांत आहे. ही पूजा विधवास्त्रियांखेरीज सर्व स्त्रिया करतात. लहान मुलींना सुद्धां ही पूजा व उपवास हीं आवश्यक मानलीं आहेत. वाळूचे शंकरपार्वती करून त्यांची पूजा करण्याची प्रथा आहे. बाजारांतूनहि मूर्ति आणून त्यांची पूजा क्वचित् करतात. अखण्ड सौभाग्यप्राप्त्यर्थ हें पूजन आहे. कंदमुळें खाऊन किंवा निर्जलहि उपवास करुन रात्रीं जागरण करतात.

ऋषिपंचमीचा उपवास कुमारिकाखेरीज सर्व स्त्रिया करतात. या उपवासांत बैलाच्या कष्टाचा कोणचाहि पदार्थ खायचा नसतो. वयातीत स्त्रिया व कांहीं पुरुषहि हें व्रत करतात. ऋषींचें पूजन आणि ऋषींचें अन्नभक्षण करणें हें या दिवशीं महत्वाचें मानतात. यानंतर भाद्रपद शुद्ध ६ चे सुमारास अनुराधा नक्षत्रावर ज्येष्ठादेवीचें आवाहन करून ज्येष्ठा नक्षत्रावर पूजन करावें आणि मूळ नक्षत्रावर विसर्जन करावें, असें हे ज्येष्ठादेवीचें व्रत विशेष महत्वाचें मानलें आहे. या ज्येष्ठादेवीला गौरी असें व्यवहारांत नांव आहे. या गौरीच्या दोन मूर्ति स्थापन करून बैठकीवर समारंभानें पोषाख घालून थाटामाटानें बसविलेल्या असतात. त्यांचा नैवेद्य पुष्कळ भाजीपाला, फळफळावळ व पुरणाचा असतो. को. ब्राह्मणामध्यें त्यांच्या देवी वाघानें खाल्ल्या असें सांगतात. म्हणून ते वाळूच्या खड्यांच्या देवी बसवितात.

आश्विनी पौर्णिमेचे सुमारास अश्विनी नक्षत्राचे दिवशीं ज्येष्ठापत्याची आश्विनी साजरी करतात. नैवेद्य करून ज्येष्ठापत्यास निरांजनानें ओवाळतात.

आश्विन वद्य १२ ही वसुबारस होय. त्या दिवशीं मुलगा असलेल्या

स्त्रिया गायगोऱ्ह्याची पूजा करतात. बाजरीची भाकरी आणि गवारीच्या शेंगाची भाजी खातात.

दिवाळी योग्य तऱ्हेनें साजरी केल्यावर त्रिपुरीपौर्णिमेस व वैकुंठ चतुर्दशीस सर्व स्त्रिया मंदिरांत जाऊन देवपूजा करून वाती लावतात. त्रिपुरीपौर्णिमेच्या वातीला त्रिपुर असें व वैकुंठचतुर्दशीच्या वातींना वैकुंठवाती असें म्हणतात.

मार्गशीर्ष शुद्ध ५ ला नागदिवाळी म्हणून एक पूजेचा प्रकार आहे. त्या दिवशीं कुलाचाराप्रमाणें नागपूजा करून दिव्यानें ओवाळून नैवेद्य दाखवितात. नवसाप्रमाणें खव्याचा, पेढ्याचा, पुरणाचा किंवा तूपसाखरेचा दिवा करतात. संततीवृद्धीस्तव ही पूजा असते.

---

## प्रकरण १० वें,

# देवता, कुलधर्म, नवरात्रें.

तैसे देव देवता भूतें । मिथ्या म्हणों नये त्यातें ॥
आपल्याला सामर्थ्यें ते । सृष्टीमध्यें फिरती ॥

दास. १०-९-२०

### १ दैवतांचा इतिहास---

महाराष्ट्रांतील दैवतांत अग्नि, वरुण या वैदिक देवतांची पूजा प्रत्यक्ष चालू असलेली आढळत नाहीं. ब्राह्मणलोक यज्ञयागांत किंवा वैश्वदेवांत त्यांची आहुति देऊन आराधना करतात. इतरत्र त्या देवतांची आराधना नाहीं. राम अगस्त्याच्या आश्रमांत आले तेव्हां तेथें, रामलक्ष्मणांना अग्नि वरुणादि देवतांचीं स्वतंत्र मंदिरासारखीं स्थानें आढळलीं असें वाल्मिकीरामायणांत लिहिलें आहे. शातवाहनांच्या शिला-

लेखांत व जावा–सुमात्रा बेटांतील देवळांत आजहि या देवता आढळतात. पण प्रत्यक्ष व्यवहारांत आज त्यांना स्थान नाहीं. यज्ञ, संस्कार व वैश्वदेवादि श्रौतस्मार्त कर्माबाहेर त्या आढळत नाहींत.

हिंदुस्थानाप्रमाणें महाराष्ट्रांत शिवपूजा अत्यंत प्राचीन आहे. बारा ज्योतिर्लिंगांपैकीं पांच ज्योतिर्लिंगें महाराष्ट्रांत आहेत. त्यांचे उल्लेख शिवपुराणांत सांपडतात. अजिंठ्याच्या लेण्यांत शिव व त्यांचा अवतार वीरभद्र यांच्या मूर्ति आहेत. वीरभद्र हा भैरवाच्या रूपानें गांवोगांवीं ग्रामदैवत होऊन बसला आहे. शिव हा पूर्ण मद्यमांसविरहित होऊन वेदांतच शांत अशा ब्रह्मस्वरूपांत उपलब्ध होतो. परंतु असा देव बहुजनसमाजाच्या प्रकृतीला, व्यवहाराला आणि आहाराला झेपण्यासारखा नव्हता. तेव्हां त्यांनीं स्वतःच्या प्रकृतीस अनुसरून उग्र आणि आहार-व्यवहाराशीं जुळणाऱ्या भैरोबाचा स्वीकार केला असल्यास नवल नाहीं. सर्प, भूतें वगैरेंच्यावर तो सत्ता चालवितो. काशीक्षेत्राचा जो नगररक्षक आहे तोच भैरव आमचाहि नगररक्षक ठरला.

यानंतरचें स्थान देवीचें आहे. बौद्धांतील वज्रयानपंथांनीं सुरू केलेल्या तांत्रिक मार्गाचा पाडाव करण्याकरितां देवीच्या उपासनेला प्रामुख्य देणारा शक्तिसांप्रदाय उदयास आला. वैदिकधर्माची कास न सोडतां तांत्रिक मार्गाचें विपुल वाङ्मय या सांप्रदायानें निर्माण केलें आणि बहुजनसमाजाला हवीशी वाटणारी देवीची उपासना हिंदुस्थानच्या कोनाकोपऱ्यांपर्यंत नेऊन पोंचविली. पण त्याहि सांप्रदायांतील दोष काढून टाकून आणि दैवतविषयक दुराग्रह मोडून टाकून श्रीआद्यशंकराचार्यांनीं सर्वच ठिकाणीं ईश्वर आहे अशी शिकवण देऊन, सांप्रदायिक व दैवतविषयक विरोध मिटविण्याकरितां शिव व देवी, यांचेबरोबरच विष्णु, गणपति व सूर्य या देवतांचा समावेश करून पंचायतन पूजेचा प्रचार सुरू केला. अशा रीतीनें वैदिकधर्माचें उज्वल तत्त्वज्ञान आणि आदर्श नीतिमत्ता

यांची शिकवण देण्यास सुरवात झाली. दैवताविषयक दुरभिमान कमी करण्याबरोबरच चारित्र्याकडे लक्ष जावें असाहि त्यांचा उद्देश दिसतो.

नीतिप्रधान व अहिंसायुक्त धर्माकडे लक्ष वेधवण्याचें काम यापुढें रामानुजादि वैष्णव आचार्य आणि प्रान्तोप्रान्तीं देशभाषेंत उपदेश करणारे ज्ञानेश्वरादि सत्पुरुष यांनीं इतकें उत्तम केलें कीं, नाथपंथी लोकहि योग आणि सिद्धीचा मार्ग सोडून भक्तिमार्गाकडे वळले. देवताविषयक अभिमानाला गौण स्थान प्राप्त होऊन नीतिप्रधान भक्तिमार्गाचें नवें आकर्षक युग येथूनच सुरू झालें.

## २ कुलदैवतें, ग्रामदैवतें व उपास्यदैवतें—

१. कुलाचें संरक्षण करणाऱ्या म्हणून मानलेल्या दैवतांस कुलदैवतें म्हणतात. त्यांची योग्य पद्धतीनें उपासना न केल्यास कुलास अपाय होतो. आर्थिक नुकसान, रोगराई वगैरे पीडा कुलदैवतांच्या अवकृपेनें होतात. कुलसंरक्षण हेंच कुलदैवतांचें मुख्य काम होय. हीं दैवतें नवसास पावणारीं आणि प्रांतिक असतात.

२. ग्रामाच्या कांहीं देवता असतात. त्या फक्त त्याच गांवांत असतात, इतरत्र नसतात. त्या देवतांच्या कृपेनें ग्रामावरचीं परचक्रें, चोर, दरवडेखोर किंवा रोगाच्या सांथी वगैरेसारखी आपत्ति दूर होते.

३. उपासनेकरितां स्वीकारलेलें दैवत तें उपास्यदैवत. उपास्य देवता प्रत्येक व्यक्तीची वेगळी असूं शकते. प्रत्येकजण आपल्या पसंतीप्रमाणें उपासनेकरितां दैवत निवडतो आणि त्या देवतेची उपासना करून समाधान आणि आध्यात्मिक अधिकार वाढवूं शकतो. उपास्य दैवताची उपासना न केल्यास अपाय होत नाहीं.

## ३ महाराष्ट्रांतील देवस्थानें व कुलदैवतें—

महादेवाचीं स्थानें पुढें दिलीं आहेतः—१ औंढ्या नागनाथ, २ वेरूळचा घृष्णेश्वर, ३ परळीचा वैजनाथ, ४ भीमाशंकर ( पुण्याजवळ खेड

तालुक्यांत ), ५ त्र्यंबकेश्वर ( नाशिकजवळ ), हीं स्थानें बारा ज्योतिर्लिंगांपैकीं आहेत. यांशिवाय शिवाचीं स्थानें पुष्कळ आहेत आणि तीं सर्व देवस्थानांत प्राचीन आहेत.

गणपतीचीं स्थानें—१ मोरगांव, २ थेऊर, ३ रांजणगांव, ४ लेण्याद्रि ( जुन्नर ), ५ ओझर, ६ सिद्धटेक, ७ मढ, ८ मुरूड ( पाली ).

महाराष्ट्रांत विष्णूचीं व रामाचीं स्थानें, पंढरपूरचा विठोबा आणि नाशिक-पंचवटीचा राम हींच मानावयास पाहिजेत.

सूर्याचें स्थान महाराष्ट्रांत नाहीं.

दत्ताचीं स्थानें—१ माहूर, २ नरसोबाची वाडी, ३ गाणगापूर हीं तीन होत.

देवीखेरीज पंचायतनापैकीं बाकीचीं दैवतें उपास्यदैवतांत येतात. कुलदैवतांत येत नाहींत.

महाराष्ट्रांत महालक्ष्मीचें स्थान कोल्हापूर असून तुळजापूरची भवानी हे महाकालीचें प्रमुख स्थान होय. बाकीची देवीचीं स्थानें तिचीं प्रतीकें होत.

पुष्कळांच्या घरांत कुलदैवतें म्हणून पुढील देवता मानल्या जातात. यांपैकीं कांहीं ग्रामदैवतें असतील, कांहीं वीरपुरुष असतील आणि कांहीं घराण्यांतील सती गेलेल्या स्त्रिया असतील. प्रसंगीं जिवास जीव देणारे ब्राह्मणेतर जातीचे लोकहि कुलदैवतांत प्रविष्ट झालेले आहेत. त्यांना त्यांचें नांव घेऊन कुळधर्माच्या दिवशीं नैवेद्य दाखवितात.

शिव, विष्णु, राम, व्यंकटेश, नृसिंह, कोल्हापूरची महालक्ष्मी, माहूरची रेणुका, सप्तशृंगीची देवी, पुण्याची चतुःशृंगी, औंधची यमाई, कुरकुमची देवी, तुळजापूरची भवानी, बदामीची व भाळवणीची शाकंभरी किंवा बनशंकरी, दावडी--निंबगांवचा, जेजुरीचा किंवा पालीचा खंडोबा, कोल्हापूरजवळील रत्नागिरी नांवाच्या डोंगरावरील जोतिबा वगैरे. शिवाय खालील कुलदैवतांचीं नांवें कळलीं आहेत. त्यांत कुलदैवत, ग्रामदैवत व

उपकर्तें यांची सरमिसळ झालेली दिसते. या देवतांचे घरोघर टाकहि आहेत.

आंग्लाई ( सज्जनगड ), एकवीरा, कातोबा ( दिवें ), कान्होबा ( सासवड ), कृष्णाजीबोवा, कोळोबा, जानाई, जीवंतिका, जोखाई, ज्योतिर्लिंग, तुकाई, दयाबाई, नागोबा, पितृदेवता, बोल्हाई, ब्रह्मनाथ, भगवती, मरीआई, मागोबा ( खेड ), मांगोबा, मांगीरदेव, मुंजोबा, मुदाई, मेंगाई ( वेल्हें ), म्हसोजीमालोजी, म्हसोबा, म्हस्कोबा ( वीर ), म्हातोबा, यमाबाई, रागीणजोगीण, वाघजाई, शिवासती, सटवाई, सप्तमातरः, साती आसराः.

जुन्नरच्या स्मार्तांच्या घरांत कोळोबाचा टाक आहे. एकदा कत्तलीच्या वेळीं या कोळी जातीच्या घरच्या नोकरानें घरचीं मुलें स्वतःचा जीव धोक्यांत घालून वाचविलीं. म्हणून त्याच्या उपकाराच्या फेडीस्तव हा टाक करून त्याची पूजा करतात व लग्नकार्याच्या प्रसंगीं कोळी जातीच्या कुटुंबाला अगत्यपूर्वक निमंत्रण करून त्यांना भोजन घालतात.

मांग, रामोशी व महार जातीच्या लोकांना बोलावून शिधा, जेवण व कपडे वगैरे देण्याची काहीं ठिकाणीं पद्धत आहे.

निरगुडकरांच्या येथें कुळधर्म म्हणून डाकिरड्याची पूजा व महारणीला खणनारळ देण्याची पद्धत आहे.

सातारकडील कांहीं लोकांच्याकडे मांगाकडून टोपल्या घेऊन त्यांची पूजा करण्याची पद्धत आहे. त्याला परडीची पूजा म्हणतात.

कृष्णाजीबोवा या मूळ पुरुषाचा टाक जगताप पिंपळ्याच्या दाजी-काका कुलकर्ण्याकडे आहे. त्याचा नैवेद्य वगैरे चुकल्यास तो अंगांत येतो अशी समजूत आहे.

सप्तमातरः—ब्राह्मयादि सप्त मातांचा दगड गांवांतील देवळांत आढळतो. त्यावर सात बाहुलीसारख्या स्त्रियांच्या आकृती खोदलेल्या असतात. तसाच कचित् देवांत टाकहि कांहींच्या येथें असतो ( उदा. भोरचे पानसे,

नगरचे क्षीरसागर ). त्यांना 'सप्तमातरः' असें म्हणतात. ब्राम्हयादि[1] सप्तमातांचें पूजन हिंसादोषनिवृत्यर्थ सर्व मंगलकार्यारंभीं करतात. सप्तमातांची स्थापना झालेली असे तोंपर्यंत मंगलकार्यांत वैश्वदेव करीत नाहींत. वैश्वदेवानें पंचसूनादोषानिवृत्तीचें काम होतें तेंच सप्तमातृकांच्या पूजनानें होतें.

साती आसा—सप्त मातरः आणि साती आसा या भिन्न होत. साती आसांचीं नांवें–१ मच्छी, २ कूर्मी, ३ कर्कटी, ४ दर्दुरी, ५ जतुपी, ६ सोमपा, ७ मकरी ( इंडि. ॲंटि. १९१४ नवं. )

साती आसा या जलदेवता आहेत. या भूतासारख्या लागतात व पाण्यांत बुडवतात.

रेणुका ही माहूरची. हिलाच एकवीरा, येल्लम्मा, यमाई अशीं नांवें आहेत. धारवाडजवळची येल्लम्मा (येलु-सात--अम्मा=माता--सप्तमातरः) ही रेणुका-एकवीरा देवी एकनाथांची कुळस्वामिनी होती. तिच्या स्तवनपर एकनाथी भागवतांत ओंव्या आहेत. ' ते एकरूपें एकवीरा । प्रसवली बोध परशुधरा । ( एकनाथी भाग. ६९--७९ ).

### ४ देवीचे कुलधर्म--

कुलदैवतांत देवीला सर्व देवतांत प्रमुख स्थान आहे. प्रत्येक घराण्यांत कोणती तरी एक देवी कुलदैवत म्हणून मानलेली असते. तिचें ठिकाण सुद्धां ठरलेलें असतें. अशा ठिकाणीं जावळ, लग्नमुंजी किंवा विशेष मंगलप्रसंगीं जाऊन निमंत्रण देण्याची किंवा नंतर जाऊन दर्शन करण्याची पद्धत आहे. शिव, विष्णु, गणपति, सूर्य व देवी या पंचायतनापैकीं देवीखेरीज बाकीचीं उपास्यदैवतें होत. आणि देवी ही उपास्यदैवत असून कुलदैवत होय. उपास्यदैवतांची विशेष प्रकारें उपासना केल्यास फायदा होतो, पण न केल्यास प्रत्यक्ष नुकसान कांहीं होत नाहीं. पण कुलदैवतें

---

१ ब्राह्मी, माहेश्वरी चैव कौमारी वैष्णवी तथा ।
वाराही च तथेन्द्राणी चामुण्डा सप्तमातरः ॥

किंवा ग्रामदैवतें हीं त्यांची योग्य व्यवस्था व मान न राखल्यास क्रुद्ध होतात आणि प्रसंगीं अपायहि करतात अशी समजूत आहे. त्यामुळें उपास्यदैवतांपेक्षां कुलदैवतें व ग्रामदैवतें यांना अधिक जपण्याची पद्धति आहे. कुलदैवत असणाऱ्या देवीचे कुळकर्म अष्टमी, चतुर्दशी व पौर्णिमा या तिथींना करण्याची पद्धत आहे. त्यांत चैत्र, श्रावण, पौष व माघ हे महिने विशेष माहात्म्याचे मानतात.

सटवाई—मूल जन्मल्यापासून पांचव्या दिवशीं सटवाईची पूजा करतात. सटवाई मुलाच्या भालप्रदेशावर त्याचें सर्व भवितव्य लिहिते, म्हणून त्या वेळीं दौतलेखणीची पूजा करतात. तिच्या प्रीत्यर्थ इतर जातीच्या स्त्रीस सवाष्ण घालण्याची पद्धत आहे. ती स्त्री प्रायः सुईण असते. ती स्त्री विधवा असली तरी चालते. पांचवीच्या पूजेचा सर्व हक्क तिचा असतो. सटवाईच्या पूजेनें नवीन जन्मलेल्या मुलाचे अपमृत्यु टळतात आणि सर्व पीडा दूर होतात अशी समजूत आहे.

हा आचार पौराणिक कालापासून चालत आलेला दिसतो. तो वेगळाल्या अनेक जातींत चालू आहे.

षष्ठी म्हणजे स्कंदाची पत्नी देवसेना होय (देवीभागवत ९-४६). हिच्या कृपेनें प्रियव्रताचा मेलेला पुत्र सुव्रत जिवंत झाला ( ब्रह्मवै. २. ४३ ). स्कंदाला षष्ठीप्रिय म्हटलेलें आढळतें ( म. व. २३३,६ कुं. ).

वढण—देवीचा 'वढण' नांवाचा एक कुळधर्म कांहीं लोकांच्या येथें असतो. हा कुळधर्म मंगलकार्यानंतर करतात. त्या दिवशीं अनेक कणकीचे पदार्थ तळून ते ताटांत भरून देवीपुढें ठेवतात व त्यांचा नैवेद्य दाखवितात. 'वढण' हें सप्तशृंगीच्या कुळधर्माचें नांव आहे अशी समजूत आहे. माहूर-मातापूर ह्या मुख्य रेणुकेच्या स्थानांचीं वणी-दिंडोरी ( जि. नाशिक ) व पुण्याची चतुःशृंगी हीं उपस्थानें मानतात. 'वढण' शब्दाचा अर्थ ध्यानांत आलेला नाहीं, तथापि तो वर्धन शब्दाचा अपभ्रंश असावा

यालाच संस्कृतांत 'मोटण' म्हटलेलें आढळतें (मेरुतंत्र).

मारग मळणें:—गांवाच्या बाहेर जाऊन एखाद्या मार्गांत देवीची पूजा करून हा कुळधर्म साजरा करण्यांत येतो. उद्यानभोजनासारखा हा कार्यक्रम असतो. दरवर्षी किंवा मंगल कार्य झाल्यावर हा करतात. मारग मळणें याचा अर्थ "मार्ग मिळणें" असा आहे. म्हणजे देवीला घरांत कार्य झाल्यानंतर सर्वांनीं जाऊन तेथें हा कुळधर्म करावयाचा असतो. परंतु तेथें प्रत्यक्ष जाणें होत नाहीं म्हणून देवी ज्या दिशेला असेल त्या दिशेच्या बाजूस मार्गाला लागल्यावर हा कुळधर्म करतात आणि घरीं परत येतात. असाच मारग मळणें याचा अर्थ असावा. हा कानडी शब्द दिसत नाहीं. मार्ग शब्दाच्या ऐवजीं 'मारग' असा अपभ्रष्ट शब्द दिसतो. मारग मळणाचा कुळधर्म बहुधा कोल्हापूरच्या लक्ष्मीचा असतो. खासनीसांचा मारग बहिरोबाचा आहे. होशिंगांचा गोव्यांतील योगेश्वरीचा आहे. व शिरवळकर देशपांड्यांकडे तुळजापूरच्या देवीचा आहे.

साठ भाज्यांचा कुळधर्म:—बदामीच्या देवीचा हा कुळधर्म पौषीपौर्णिमेस साजरा करण्यांत येतो. या दिवशीं साठ भाज्या व साठ कोशिंबिरी नैवेद्यास करण्याची पद्धत आहे. शाकंबरी देवीचें माहात्म्य सप्तशतींत दिलेलें आहे. हा कुळधर्म अनगळ, ढेरे वगैरे लोकांच्या घरीं आहे. कोल्हापूरच्या महालक्ष्मीप्रमाणेंच या देवींपुढें पशुबलि नाहीं.

राजळा देवीचा कुळधर्म:—राजळादेवी हा शब्द राजराजेश्वरी या देवीच्या नांवाचा मराठी उच्चार मानतात. कारण या कुळधर्माचा संकल्प करतांना 'श्रीराजराजेश्वरीदेवीप्रीत्यर्थ' असें म्हणण्याची वहिवाट आहे. या देवीच्या सात आकृति रक्तचंदनानें घेवड्याच्या पानावर काढून त्यांची पूजा करतात. त्यांचीं नांवें—१ राजळा, २ काजळा, ३ सोजळा, ४ तेजळा, ५ सहादेवी, ६ महादेवी, ७ मन्मथादेवी.

या कुळधर्माला 'साडेतीन माणसांचा कुळधर्म' असें अन्वर्थक नांव

आहे. कारण या कुळधर्मास एक घरचें मेहुण, एक विकेशा विधवा व एक मुंजा [?] मिळून साडेतीन माणसें अवश्य असतात.

हा कुळधर्म, घरचें मेहुण, बाहेरचें मेहुण, अक्करमाशाचें मेहुण, विकेशा विधवा व मुंजा, असा साडेसात माणसांचा असल्याचेंहि सांगतात.

हा कुळधर्म शाळिग्राम, ढेकणे, आठघरे वैद्य, टिल्लू, पारखी, चिंचवडकर देव व पंतसचिव वगैरे पुरातन घराण्यांत आहे.

साडेतीनशें वर्षें महाराष्ट्राशीं संबंध नसलेल्या आणि काशीसारख्या दूरच्या ठिकाणीं जाऊन राहिलेल्या जोशी घराण्यांतहि हा कुळधर्म असल्याचें आढळतें.

या कुळधर्माचा स्वयंपाक साडेतीन किंवा साडेसात माणसांपुरताच करण्याची पद्धत आहे. अन्न अधिक झाल्यास तें जमिनींत पुरून टाकतात. घरांतील मंडळी दुसरा स्वयंपाक करून भोजन करतात. कुमारिकांच्या तर दृष्टीसहि पडूं देत नाहींत. साध्वी म्हणून विधवा स्त्रीस बोलावून कुळधर्म करण्याची चाल असल्याचें एका प्रसिद्ध व्यक्तीनें कळविलेलें आहे.

अलीकडे अशा स्त्रिया मिळत नसल्यानें नैवेद्य दाखवून गाईला घालण्याची किंवा नैवेद्य नदींत टाकण्याची पद्धत कांहीं घरांत पडत चालली आहे.

राजराजेश्वरी किंवा राजळादेवी या देवतेचें स्थान कोणतें आणि त्याचा इतिहास काय याची माहिती मात्र मिळत नाहीं.

**५ खंडोबा—**

ही मूळची कानडी प्रान्तांतील देवता आहे. ' महाराज कानडी राजे, कऱ्हेपठारीं नित्य चौघडा वाजे' या लोकप्रचारांतील गाण्यांत तसेंच म्हटलें आहे. खंडोबासंबंधीं रूढ असणारे शब्दहि कानडी भाषेंतील आहेत. खंडोबाचे मुख्य उपासक धनगर लोक आहेत. धनगर हा शब्द कानडी असून त्याचा अर्थ मेंढपाळ असा आहे. कानडींत धनगरच्या ऐवजीं

"दनगर" असा उच्चार आहे. याशिवाय एळकोट हा शब्द खंडोबाची तळी भरतांना जयजयकारार्थ वापरतात. 'सात कोट सैन्याला जिंकणारा' असा एळकोट शब्दाचा अर्थ आहे. खंडोबानें मणिमल्ल नांवाच्या दैत्यांचें सात कोट सैन्य जिंकलें. बहिरोबाकरितां 'चांगभले' हा शब्द वापरतात, तसाच हा शब्द आहे.

कुळधर्मांतील पदार्थः—टोंबरा म्हणजे जोंधळे शिजवून दहींमीठ घालून खंडोबाचे नैवेद्यावर घालावा लागतो; कणकीचा रोडगा व वांग्याचें भरीत, पातीचा कांदा व लसूण, तसेंच उंडी म्हणजे गव्हाच्या ओंब्या, हुरडा, तीळ व गूळ असें एकत्र कांडून त्याचा दिवा करावयाचा व त्यांत फुलवात लावावी लागते.

चंपाषष्ठी हा शब्द महाराष्ट्रांतच प्रसिद्ध आहे. पुराणांत ही षष्ठी स्कंदषष्ठी या नांवानें प्रसिद्ध आहे. पण स्कंद आणि खंडोबा यांत इतर साम्य नाहीं.

खंडोबाच्या अंगावर चंपाषष्ठीचे आदले दिवशीं तिळाचें तेल ओतण्याची पद्धत आहे. त्याला 'तेलहंडा' असें म्हणतात. खंडोबाबरोबर एक दिवटीबुधलीहि असते. ती दर पिढीला ओहरयात्रेच्या वेळीं बदलतात.

या देवाला पुरुष व स्त्रिया वाहण्याची चाल परवांपर्यंत होती. वाहिलेल्या पुरुषाला वाघ्या आणि स्त्रीला मुरळी म्हणतात. ही चाल आतां कायद्यानें बंद केलेली आहे. मुरळी करण्याचा विधि म्हणजे खंडोबाच्या खंडा नांवाच्या तलवारीशीं तिचें लग्न लावणें हा होय. तिनें जन्मभर देवदासी म्हणून संन्यस्तवृत्तीनें राहावयाचें असतें. वाघ्यामुरळीवरील श्रीएकनाथमहाराजांचीं भारुडें प्रसिद्ध आहेत. खंडोबाची उपासना महाराष्ट्रांत देवगिरीच्या जाधवांच्या वेळेपासून आढळते.

खंडोबाचीं स्थानें:—प्रथम प्रेमपूर (मैलार) येथें मार्तंडानें मणिमल्लांचा वध केला, म्हणून ऋषींच्या विनंतीवरून ते तेथें लिंगद्वयरूपानें

मार्ग. शु. ६ स प्रगट झाले. प्रेमपूर हें सदर्न मराठा रेल्वेच्या देवरगुड्ड स्टेशनपासून १ मैल अन्तरावर आहे. दुसरें स्थान निजामच्या राज्यांत सोलापुरापासून २६ मैलांवर नळदुर्ग येथें आहे. तेथें मार्तंडाचा बाणेशीं विवाह श्रावणी पौर्णिमेस झाला. तिसरें स्थान साताऱ्यानजीक पाली येथें आहे. तेथें म्हाळसा व मार्तंड यांचा विवाह पौर्णिमेस झाला. चौथें स्थान जेजुरी. ही मार्तंडाची प्रिय राजधानी आहे. पांचवें खेड तालुक्यांत भीमा नदीच्या तीरीं निंबगांवीं आहे. सहावें शेगुडगांवीं आहे. सातवें कृष्णातीरीं मनसुळी येथें आहे. आठवें स्थान गंगातीरीं साताऱ्याजवळ आहे.

मार्तंडाच्या ईशान्येस हेगडी प्रधान असतो. ( जेजुरीमाहात्म्य )

कांदाः— हा पदार्थ धर्मशास्त्रानें निषिद्ध मानलेला आहे. हा भक्षिल्यास पुनरुपनयन करावें असें सांगितलें आहे. पण खंडोबाचा, कांदा हा प्रिय पदार्थ आहे. खंडोबाला कांद्याचा नैवेद्य दाखवावा लागतो. आचारशील ब्राह्मण खंडोबास भरीतरोडग्याचा नैवेद्य दाखवितात व कच्चा पातीचा कांदा देवापुढें ठेवून त्याचा दुरून नैवेद्य दाखवितात. सोवळ्यानें कांद्याला शिवतहि नाहींत. धार्मिक कार्यांत कांद्याचा संबंध आणीत नाहींत. चातुर्मासांत कांदा वांगें वर्ज करतात व चंपाषष्ठी झाल्यावर कांदेवांगीं खातात. देवाशीं कांद्याचा संबंध कधींच आणीत नाहींत. कांदा खाण्याचा महाराष्ट्रांतील ब्राह्मणांचा आचार बराच जुना दिसतो. याचें कारण महाराष्ट्रांतील भौगोलिक परिस्थिति होय. इतर बागाइताचा, पाण्याच्या अभावीं संभव नसल्यानें व कांद्याचें पीक अशा स्थितींतहि विपुल होत असल्यानें कांदा हा धार्मिक दृष्ट्या वर्ज्य असणारा पदार्थहि व्यवहारांत आला आणि त्याला खंडोबामुळें धार्मिक साहाय्य मिळालें. खानदेश व वऱ्हाड या भागांत कांद्याशिवाय एक दिवसहि चालत नाहीं. उन्हाळ्यामुळें कांदा सतत जवळ बाळगून त्याचा उपयोग करावा लागतो. संयुक्तप्रांत, बंगाल वगैरे भरपूर बागायती प्रान्तांत मात्र कान्दा सध्यांहि निषिद्ध समजतात. पण राजपुता-

त्यांत कांदा केव्हांहि खाल्ला तरी चालतो अशी तिकडे धार्मिक लोकांतहि समजूत आहे. जेजुरीमाहात्म्यांत चंपाषष्ठीला खंडोबाला कांद्याचा नैवेद्य दाखवून जे कांदे खातात त्यांना कांदा खाण्याचा दोष लागत नाहीं, असें सांगितलें आहे ( जेजुरीमाहात्म्य, पा. ६१ ).

याशिवाय आहाळांतून चालण्याचा खंडोबाचा कुळधर्म कांहीं घरांत आहे. त्यांत पांच पावलें विस्तवावरून चालतात.

६ टांक—

आपल्या समाजांतील प्रयेक व्यक्तीच्या घरांत कुलदैवतांचे सोनें, चांदी तांबें यांचे टांक केलेले असतात. खंडोबाचा टांक प्रायः सोन्याचा असतो. तो ठसा घोड्यावरचा असून म्हाळसायुक्त असतो. भैरोबाचा टांक चांदीचा अथवा तांब्याचा असतो. जोगेश्वरी, भवानी, अंबाबाई यांपैकीं देवतांचा कुलचाराप्रमाणें एक किंवा अनेक टांक असतात. सटवाई आणि जीवंतिका यांचे दोन टांक असून त्या प्रत्येकावर दोन दोन बाहुल्यांचे ठसे असतात. वतनाचा संपादक, मूळपुरुष, सती, जीवास जीव देणारा किंवा जीवदान देणाराचे टांक आढळतात. कुलपरत्वें टांकांची संख्या ठराविक असते. नेवासें ( जि. नगर ) येथील करंदे यांचेकडे महारमांगांचे टांक असून त्यांची नित्य पूजा करतात व वर्षांतून एकदां महार व मांग यांना बोलावून त्यांची पूजा करून त्यांना जेवावयास घालतात.

७ गोंधळ—

कुलधर्मांत विशेषतः देवीचा, खंडोबाचा व भैरोबाचा गोंधळ करण्याची पद्धत आहे. गोंधळाचे बरेच प्रकार आहेत.

१ **डाक्याचा**—दोन काड्यांनीं वाजविण्याचें कातडी वाद्य.

२ **खापराचा**—मद्याचा. ३ **चुडीचा**—दिवटीचा.

गोंधळ याचा अर्थ त्या त्या देवतांचे ब्राह्मणेतर जातीचे जे उपासक त्यांचें भजन व कीर्तन करणें हा दिसतो. हे गोंधळ करणारे लोक परंपरेचे

आहेत. देवीचे भुते, खंडोबाचे वाघ्यामुरळी, भैरोबाचे सिद् हे ते लोक होत. पण सध्यां यांना कवनें वगैरे येत नाहींत व म्हणण्याचा अभ्यासहि नाहींसा झाल्यामुळें तें काम सध्यां गोंधळी नांवाच्या गाण्याचा धंदा करणाऱ्या जातीकडून करून घेण्यांत येतें. या गोंधळाला 'डाकापांजी' असा रूढ शब्द आहे. डाका म्हणजे डमरू. पांजी म्हणजे नैवेद्य. डमरूला नैवेद्य दाखवून भजन करणें असा याचा अर्थ आहे. घरांत कांहीं मंगल कार्य झालें तर किंवा प्रतिवर्षीं कुळधर्माच्या वेळीं गोंधळ करण्याची चाल असते. त्या दिवशीं गोंधळ करणाऱ्या लोकांना साधुसंतांसारखा मान देऊन, गौरव करून, दक्षिणा देऊन, सन्मान करण्याची पद्धत आहे. हे गोंधळी लोक कीर्तनाप्रमाणेंच पूर्वरंग-उत्तररंग करून नाथांच्या भारुडाच्या आधारें सध्यां गोंधळ करतात आणि त्या त्या देवतांची उपासना वाढविण्याचा प्रयत्न करतात.

८ आरती—

वेगवेगळ्या देवतांच्या सांप्रदायिक आरत्या प्रसिद्ध आहेत. त्या त्या घराण्यांत त्याच आरत्या म्हणाव्या लागतात. व्यंकोबाच्या कांहीं कानडी आरत्या मराटींतील लोकसुद्धां म्हणतात. आरतीच्या वेळीं पुरणाचे, साखरेचे, खव्याचे, लोण्याचे व उंडीचें वगैरे दिवे करण्याची पद्धत आहे. दिव्यांची संख्या प्रत्येक घराण्यांत कमीजास्त असते. नवसानें दिवे वाढविले जातात. औंधकर पंतप्रतिनिधींच्या येथें तर नवरात्रांत प्रतिदिवशीं एक एक आरती वाढविण्याची पद्धत आहे; म्हणजे प्रतिपदेला एक आरती तर नवमीला नऊ आरत्यांचीं ताटें होतात.

तिळाचा दिवा आरतीकरितां करण्याची पद्धत अनगळ घराण्यांत आहे.

खंडोबाच्या आरतीचा दिवा उंडीचा ( ओंब्या, हुरडा, तीळ, व गूळ, यांचा ) करतात.

९ जोगवा—

देवीचा जोगवा मागण्याची पद्धत कुळधर्म म्हणून पुष्कळ घराण्यांत आहे. चार घरीं जाऊन 'जोगवा' म्हणून कोरडी भिक्षा मागतात व त्याचा नैवेद्य करून प्रसाद म्हणून खातात. बोलावलेल्या ब्राह्मणसुवासिनीच्या पानापुढें जाऊनहि अंबाबाईचा जोगवा म्हणून मागण्याची चाल आहे. खरूज, नायटे वगैरे त्वचारोगांवर दैवी उपाय म्हणून जोगवा मागून मंगळवारीं खातात.

१० मुंजोबा—

पुष्कळ घराण्यांत मुंजोबा हें कुलदैवत असतें. मुंजोबाचें प्रतीक म्हणून पांच घागऱ्यांची पूजा करण्याची पद्धत आहे. मुंजोबाचीहि महाराष्ट्रांत पुष्कळ प्रसिद्ध स्थानें आहेत. हें स्थान प्रायः पिंपळाचे खालीं असतें. याकरितां कुळधर्म म्हणून श्रावणांतल्या कोणत्याहि शनवारीं मुंजाचे ब्राह्मण म्हणून मुंज झालेल्या अकरा मुलांना जेवावयास घालण्याची पद्धत आहे. ही देवता भूतयोनींतील आहे. कोणीहि मुंज झालेला मुलगा मयत झाला असतां अपुऱ्या वासनेमुळें भूतयोनींत जाऊन घरच्या लोकांना त्रास देतो. त्याच्या समाधानाकरितां कुळधर्म व देवतास्थापनाचा प्रकार करितात. पुत्रसंतान होऊन वंश चालावा म्हणूनहि मुंजोबाची स्थापना करतात आणि पिंपळाचें झाड लावून त्याची मुंज करतात.

या देवतेचा स्वतंत्र टांकहि असतो.

११ नवरात्रें—

रामनवमीचें नवरात्र वर्षप्रतिपदेच्या दिवशीं बसून दशमीचे दिवशीं उठतें. नित्य पूजा, नंदादीप, मंत्रपुष्प, आरती, अध्यात्मरामायणवाचन, कथाकीर्तन, ब्राह्मणसंतर्पण, यांपैकीं शक्त्यनुसार कार्यक्रम असतात. नऊ दिवसपर्यंत उपवास किंवा धान्यफराळ करण्याची पद्धति आहे. नवमीचे दिवशीं जन्माचें कीर्तन झाल्यानंतर उपवास सोडण्याचीहि कांहीं ठिकाणीं

पद्धति आहे. दे. ऋ. ब्राह्मणांत पुष्कळ घराण्यांत राम हें उपास्यदैवत असून त्याच्या नवरात्राची पद्धत वर दिली आहे.

श्रीनृसिंहाचें नवरात्र वैशाख महिन्यांत शुद्ध ८ मी पासून बसतें. चतुर्दशीस सायंकाळीं जन्म झाल्यानंतर दुसरे दिवशीं पारणें होऊन नवरात्र उठतें. नृसिंह ही देवता पुष्कळ माध्व-वैष्णव-घराण्यांत उपास्यदैवत आहे. तेथें नित्यपूजा, अभिषेक, पुराणवाचन, ब्राह्मणसंतर्पण, कीर्तन वगैरे कार्यक्रम असतात.

श्रीगोकुळअष्टमीचें नवरात्र, श्रावण वद्य प्रतिपदेपासून सुरू होतें. अष्टमीस मध्यरात्रीं जन्म झाल्यानंतर नवमीस पारणें होऊन हें नवरात्र संपतें. अष्टमी तिथि संपून नवमी लागल्याशिवाय पारणा होत नाहीं. या नवरात्रांत श्रीमद्भागवतसप्ताहाचें विशेष माहात्म्य आहे. निदान भागवतांतील दशमस्कंद तरी या नवरात्रांत वाचतात किंवा श्रवण करतात. नवमीस पारणा झाल्यानंतर गोपाळकाला झाल्याशिवाय हा उत्सव पूर्ण झाला असें मानीत नाहींत. गोपाळकाल्याकरतां नाथांचें भारूड प्रसिद्ध आहे. याशिवाय नित्य कार्यक्रमांत अखण्ड नामसप्ताह, कीर्तन आणि भण्डारा यांना महत्त्व देण्यांत येतें. हें नवरात्र लक्ष्मीनारायण, गोपाळकृष्ण, मुरलीधर व विठ्ठलरुक्मिणीचे मंदिरांत साजरें करण्यांत येतें. वर दिलेलीं उपास्यदैवतें पुष्कळ दे. ऋ. ब्राह्मणांच्या घराण्यांत आहेत.

गणपतीचें नवरात्र म्हणून नसलें तरी भाद्रपद शुद्ध १ पासून पंचमीपर्यंत घरच्या गणपतीचा नवरात्रासारखा नित्यपूजा, अभिषेक, कथाकीर्तन ब्राह्मणभोजन वगैरे कार्यक्रमांनीं उत्सव साजरा करण्याची पद्धत अष्टविनायकांचीं स्थानें, चिंचवडकर देव, सरदार मुजुमदार, सरदार देशपांडे ( जुन्नर ) वगैरे घराण्यांत अद्यापि आढळते. माघ महिन्यांतहि शुद्ध प्रतिपदेपासून पंचमीपर्यंत असाच गणपतीचा उत्सव साजरा करतात. तसेंच ज्येष्ठ शुद्ध पौर्णिमेस गणेशजयंती साजरी करतात. श्रावण महिनाभर

गणपतीचा नित्य पार्थिव करण्याची पद्धत कांहीं घराण्यांत आढळते. गणेशचतुर्थीपासून अनंतचतुर्दशीपर्यंत होणारा गणेशोत्सव हे मूळ पार्थिव गणपतीच्या चालीचें सध्याचें बदललेलें रूप आहे. पार्थिवगणपतीचें नित्य विसर्जन व दररोज नवा करण्याची मूळची पद्धत आतां प्रायः बंद पडली आहे.

शारदीय नवरात्र, हें आश्विन शुद्ध प्रतिपदेपासून नवमीपर्यंत असतें. हें नवरात्र मुख्यतः देवीचें आहे. पण इतर देवतांचींहि नवरात्रें, पूजा व पाठ वगैरे या नवरात्रांत केलीं जातात. या नवरात्रांतील मुख्य आचार, देवतास्थापन, नंदादीप, मालाबंधन, देवतापूजा, पाठवाचन, ब्राह्मण--सुवासिनी--कुमारीभोजन, उपवास, कथाकीर्तन वगैरे असतात. अष्टमी तिथी, मंगळवार व शुक्रवार हे दिवस विशेष महत्त्वाचे मानले जातात. रविवारीं किंवा शेवटच्या दिवशीं देवीबरोबर श्रीखंडोबाची तळी व आरति केली जाते. नवमीस किंवा दशमीस पारणा केली जाते. नैवेद्याच्या पदार्थांत पुरणपोळीला प्राधान्य आहे. हें नवरात्र सर्वत्र अत्यंत महत्त्वाचें समजलें जातें. हें नवरात्र नाहीं असें घर नाहीं.

श्रीव्यंकटेशाचें नवरात्र आश्विनांतच साजरें करण्यांत येत असलें तरी, श्रीव्यंकटेशाचें पारणें मार्गशीर्षांतच करण्याची चाल आहे. मार्गशीर्ष महिन्यांत पारणा न झाल्यास फाल्गुन अखेरपर्यंत तरी तें करावें अशी चाल आहे. या पारण्यांतील विशेष म्हणजे चित्रान्नासारखा नैवेद्याचा पदार्थ करतात. इतर कुलधर्मासारखा प्रकार असतो.

श्रीपांडुरंगाचें नवरात्र आषाढ शुद्ध १ पासून नवमीपर्यंत व कार्तिक शुद्ध १ पासून नवमीपर्यंत असें दोनदां असतें. श्रीक्षेत्र पंढरपूर येथें मुख्य श्रीविठ्ठलाच्या मंदिरांत फक्त नित्य कीर्तन होतें. श्रीविठ्ठलाचे उपासकांनीं आपल्या घरोघरीं ही चाल नेलेली दिसते. नित्य पूजा, अर्चा, नंदादीप, ब्राह्मणसंतर्पण, कथाकीर्तन व मुख्य यजमानानें उपवास करण्याची

पद्धत आहे. हें नवरात्र दशमीस उठतें. काला वगैरे कार्यक्रमहि असतो. भागवतसप्ताह करण्याचीहि या वेळीं पद्धति आहे. माळ बांधण्याची पद्धति नाहीं.

या वेळीं हें नवरात्र बसविण्याचें कारण पुराणादिग्रंथांमध्यें सांपडत नाहीं. आषाढांतील नवरात्र चातुर्मास्याचा आरंभ म्हणून असते. पण कार्तिकांत पैठणच्या श्रीएकनाथ महाराजांचे पणजे 'भानुदास' यांनीं अनागोंदीहून विठ्ठलाच्या मूर्ति परत पंढरपुरास आणल्या, तोच श्रीपंढरीनाथाचा जन्म असें समजून हें नवरात्र व हा उत्सव करण्याची प्रथा पडली असें म्हणतात. पंढरपूरच्या विठ्ठलाची मूर्ति, अनागोंदीच्या रामराजानें पंढरपुराहून नेली होती.

श्रीभैरवनाथाचें नवरात्र कार्तिक वद्य १ पासून अष्टमीपर्यंत असतें. या अष्टमीस कालाष्टमी म्हणतात. या नवरात्रांत इतर नवरात्राप्रमाणेंच सर्व कार्यक्रम असतात. या देवाचे उत्सव माघ शुद्ध १५ पासून चैत्र शुद्ध १५ पर्यंत गांवोगांवीं करण्याची पद्धति आहे. त्या वेळीं देवाचा छबिना कुस्त्यांचा फड, खेळ तमाशे वगैरे कार्यक्रम असतात. त्याला सामान्य भाषेंत उरूस ( उत्सव ) म्हणतात. महाराष्ट्राचें खेडेगावाचें श्रीभैरव हें ग्रामदैवत आहे. याला क्वचित् पशुबलीहि दिला जातो. तोच देव टाकरूपानें पुष्कळांचे घरीं कुलदैवत म्हणून पूजिला जातो.

चंपाषष्ठीचें नवरात्र मार्गशीर्ष शुद्ध १ पासून षष्ठीपर्यंत असतें. चंपाषष्ठी ही स्कंदषष्ठी या नांवानें पुराणांत प्रसिद्ध आहे. आणि खंडोबाचीहि पण तीच तिथि मानण्यांत येते. तथापि स्कंद आणि खंडोबा यांचा परस्पर संबंध आहे असें त्यांच्या कथांवरून दिसत नाहीं. या नवरात्रांत नित्यपूजा, आरती, मल्हारीमाहात्म्यवाचन, ब्राह्मणसुवासिनीभोजन, उपवास, कीर्तन वगैरे कार्यक्रम असतात. षष्ठीचे दिवशीं तळी-आरती होऊन हें नवरात्र संपतें.

श्रीदत्तात्रेयाचें नवरात्र मार्गशीर्ष शुद्ध ८ पासून पौर्णिमेपर्यंत असतें. इतर नवरात्रांप्रमाणें बहुतेक कार्यक्रम असतात.

शाकंभरी देवीचें नवरात्र पौष शुद्ध ७ ला सुरू होऊन पौषी पौर्णिमेस पूर्ण होतें. नित्याचे कार्यक्रम, पूजा, नंदादीप, पाठवाचन वगैरे इतर नवरात्रांप्रमाणेंच असतात. पौषी पौर्णिमेचे दिवशीं देवीचा नैवेद्य साठ भाज्या व साठ कोशिंबिरी असा असतो. या पौर्णिमेचा कुलधर्म घरांतील शिलकी सामान न घेतां सर्व साहित्य बाजारांतून आणून करण्याची चाल आहे असें दामोदर विनायक क्षीरसागर ( फलटण ) यांनीं कळविलें आहे. या देवीचें मुख्य ठिकाण विजापूर जिल्ह्यांतील बदामी हें आहे. महाराष्ट्रांतील पुष्कळ ब्राह्मणांचें हें कुलदैवत आहे.

माघ महिन्यांत मोहनीराजाचें नवरात्र पुष्कळांच्या घरीं असतें. या दैवताचें मुख्य स्थान नेवासें ( जि. नगर ) हें आहे. माघ शुद्ध ८ पासून पौर्णिमेपर्यंत नवरात्र असतें. नवरात्रांत पूजा, आरती, नंदादीप, ब्राह्मण-सुवासिनीभोजन, कथाकीर्तन इ. कार्यक्रम असतो. या दैवताचा वार रविवार हा मानण्यांत येतो. त्या दिवशीं पुष्कळ भक्तलोक सायंकालपर्यंत उपवास करतात. पौष शु. १५ पासून माघ शु. १५ पर्यंत धरणेंपारणें करण्याचीहि पद्धति आहे. एक दिवस उपवास व एक दिवस भोजन या क्रमाला धरणेंपारणें असें म्हणतात. मोहनीराजाचें स्वरूप अर्धनारीनटेश्वराचें आहे. मोहनीराजाला महालया असेंहि म्हणतात.

---

## प्रकरण ११ वें,

# सांप्रदाय व पंथ.

**धर्मसंस्थापनेचे नर, ते ईश्वराचे अवतार ॥**
**झाले आहेत पुढें होणार, देणें ईश्वराचें ॥** दास १८–६–२०.

**१ प्रास्ताविक—**

मनुष्याच्या स्वभावाची पारख प्रसंगाशिवाय होत नसते. अडचणीचा प्रसंग आला असतां मनुष्य कसा वागतो हें पाहावें लागतें. मनुष्याच्या स्वभावांत असणारे चांगले किंवा वाईट गुण प्रसंगाशिवाय व्यक्त होत नसतात. आणि त्याच वेळीं माणसाची खरी पारख होते. कस्तुरीचा वास जसा झाकून ठेवतां येत नाहीं तसे प्रसंग येतांच माणसांतील गुण उसळी मारून बाहेर आल्याशिवाय राहत नाहींत. म्हणून मनुष्य स्वस्थतेच्या काळीं करीत असलेल्या वर्तनावरून बरा किंवा वाईट हें ठरविणें अत्यंत धोक्याचें असतें.

जी स्थिति माणसाची तीच स्थिति समाजाची, वर्गाची किंवा राष्ट्राची होय. या दृष्टीनें आपल्या समाजांत उत्पन्न झालेले सांप्रदाय किंवा पंथ निर्माण करणाऱ्या सत्पुरुषाकडे आपल्याला पाहिले पाहिजे.

सांप्रदाय किंवा पंथ निर्माण करणें आणि ते व्यवस्थित चालविणें हीं गोष्ट वाटते तितकी सोपी नाहीं. एकादी छोटीशी संस्थासुद्धा स्थापन करून चालविणें किती अवघड असतें हें आपण पाहतों. सर्व तंत्रें संभाळून लोकांचा विश्वास संपादन करावा लागतो. नाना स्वभावाच्या लोकांशीं जुळतें घेऊन सर्वांचा मेळ राखावा लागतो. रोज नवा कार्यक्रम काढून लोकांचा उत्साह कायम ठेवावा लागतो, आणि या सर्व खटाटोपांतून कांहीं तरी चांगलें निष्पन्न होतें आहे हें सर्वांच्या नजरेस आणावें लागतें.

परंतु या सर्वांपेक्षां अत्यंत महत्त्वाची गोष्ट म्हणजे जुन्या वळणांतून नव्या वळणांत लोकांना आणतांना सहन करावा लागणारा लोकांचा विरोध होय. विशेषतः धार्मिक व सामाजिक बाबतींत असा विरोध कमालीचा होत असतो. त्याला तोंड देण्याची शक्ति असल्याशिवाय सांप्रदाय, पंथ किंवा संस्था काढणें अशक्य असतें. या बाबतींत आवश्यक असणारा कणखरपणा आपल्या समाजांतील लोकांनीं भरपूर दाखविला आहे. समाजाच्या स्थैर्याला आवश्यक असणारे विचार तडफदारपणें व्यक्त करण्याची, निर्मळ आचारांनीं लोकांचा विश्वास संपादन करण्यांची आणि त्यागानें सर्व लोकांना दिपविण्याची शक्ति असल्यामुळेंच अनेक सांप्रदाय व पंथ आपणांला निर्माण करितां आले, आणि टिकवितांहि पण आले.

२ आचार्यपीठें—

दक्षिण हिंदुस्थानांत हिंदुस्थानांतील बहुतेक प्रमुख आचार्य उत्पन्न झालेले आहेत. श्रीशंकराचार्य ( शृंगेरी ), श्रीरामानुजाचार्य ( कांची ), श्रीमध्वाचार्य ( उडुपी ) आणि श्रीवल्लभाचार्य ( नाथद्वार ) हे चारहि प्रमुख आचार्य दाक्षिणेंतील आहेत. आणि हे सर्व ऋग्वेदी व कृष्ण-यजुर्वेदी आहेत.

आद्य शंकराचार्य नंबुद्रीब्राह्मण होते. नंबुद्रीब्राह्मण हे मूळ तेलंगणांतील कृष्णयजुर्वेदी ब्राह्मण होते. त्यांच्या शिष्यांत सर्व प्रान्तांतील लोक होते. तथापि पीठावर ऋग्वेदी किंवा कृष्ण यजुर्वेदी द्राविडब्राह्मण बसण्याची पद्धत आहे. तसेंच इतर आचार्यांबाबत आहे.

यापैकीं श्रीशंकराचार्यांची करवीरसंकेश्वर ही शाखा महाराष्ट्रांत आज कांहीं शतकांपेक्षां अधिक वर्षें अखंडपणें चालू आहे. त्या गादीवर बसलेले सर्व पुरुष देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणच आहेत. आणि इतर सर्व ब्राह्मणांपेक्षां देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणच त्या पीठावर बसण्यास अधिकारी

समजले जातात. याला फक्त करवीर पीठावर ऱ्हाडे ब्राह्मणांपैकीं नुक-तेच समाधिस्थ झालेले पित्रेस्वामी अपवाद आहेत.

श्रीआद्यशंकराचार्यांच्या अद्वैतमतप्रतिपादनाचे बाबतींत आवश्यक असणारें बुद्धिकौशल्य खर्च करण्यांत आणि श्रमसाहस अंगीकारण्यांत आपल्या समाजांतील व्यक्तींनीं केलेली कामगिरी हिंदुस्थानाच्या काना-कोपऱ्यांत झालेला त्या मताचा प्रचार आपणांस सांगत आहे. त्याचप्रमाणें संस्कृत व देशी भाषेंत झालेल्या शांकर अद्वैतमत प्रतिपादणाऱ्या ग्रंथांची प्रचंड संख्याहि आपणांस त्यासंबंधीं झालेल्या प्रचंड कार्याची कल्पना आणून देऊं शकेल.

श्रीशंकराचार्यांच्या पीठाचें काम कोणतेंहि स्वतंत्र मत प्रतिपादन करणें हें नाहीं. केवळ वेदशास्त्र, स्मृतिपुराणें या ग्रंथांनीं प्रदिपादिलेल्या धर्माचा प्रचार करणें हें ते आपल्या पीठाचें मुख्य काम समजतात. पतिव्रता स्त्रीला नवऱ्याशिवाय स्वतंत्र अस्तित्वच नसतें. अगदीं तशीच आचार्य पीठांची स्थिति आहे. अक्षरशः सर्व लोभांचा त्याग करून हीं पीठें चाल-विलीं जातात. पीठस्थ व्यक्तीचें नांवसुद्धां शिल्लक राहूं नये, अशी एकंदर पीठांची मूळपासून योजना आहे. त्यामुळें हीं पीठें सन्मानानें हजारों-पेक्षां अधिक वर्षे आपलें कार्य करीत राहूं शकलीं आहेत.

**३ माध्व-वैष्णव-सांप्रदाय--**

हा संप्रदाय श्रीमध्वाचार्यांनीं सुरू केला. खुद्द श्रीमध्वाचार्य हे तुलव ब्राह्मण होते. त्यांनीं सुरू केलेला द्वैतमत प्रतिपादन करणारा हा सांप्रदाय विशेषतः कर्नाटकांत व महाराष्ट्रांत आढळतो. मध्वाचार्यांनीं वेद, उप-निषदें, व्याससूत्रें, रामायण, महाभारत वगैरेंच्या आधारें संस्कृत भाषेंत विपुल ग्रंथसंपत्ति निर्माण केली आहे. उपासना आणि भक्ति यांचा प्रचार करण्यांत आणि आचारप्रधानता टिकविण्यांत त्यांनीं आपल्या प्रति-पादनानें, उत्सवादि साधनानें, अन्नदानानें आणि मठमंदिरांच्या संघटने-

च्या साहाय्यानें उत्तम यश संपादन केलेलें आहे. एकापेक्षां एक विद्वान् माणसांची अखंड परंपरा या सांप्रदायांत उत्पन्न झालेली आहे आणि त्यांच्या द्वारा या सांप्रदायाच्या प्रचाराचें काम सतत चालू आहे.

हा सांप्रदाय आपल्या समाजांतील व्यक्तींनीं यशस्वीपणें चालविलेला पंथ आहे. त्या सांप्रदायांत ब्राह्मणेतर नाहींत. तसेंच अगदीं अलिकडे कोंकणस्थ, कऱ्हाडे यांच्यापैकीं अगदीं तुरळक घराणीं या सांप्रदायांत सामील झालेलीं आहेत.

खुद्द पीठस्थ आचार्यांतहि महाराष्ट्रांतील देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणांची संख्या संख्येनें व कर्तबगारीच्या दृष्टीनें लक्षांत भरण्यासारखी आहे. श्रीमध्वाचार्यांच्यानंतर पन्नास वर्षांनीं त्यांच्याच गादीवर आलेले जयतीर्थ यांची योग्यता विशेष मानण्यांत येते. जयतीर्थ अक्षोभ्यतीर्थांचे शिष्य होत. जयतीर्थांचें पूर्वाश्रमींचें नांव धोंडो रघुनाथ देशपांडे असें आहे. पंढरपूर जवळील मंगळवेढ्याचे हे राहणारे. मध्वाचार्यांनीं जरी माध्वसांप्रदाय स्थापन केला आणि ग्रंथ लिहिले, तरी त्या सांप्रदायाला व ग्रंथांना शास्त्रीय रूप देण्याची कामगिरी जयतीर्थांनीं केली आहे. यांच्या टीकाग्रंथाचें नांव 'सुधा' असें आहे. मध्वाचार्यांच्या प्रत्येक ग्रंथावर यांची टीका आहे. यांच्या "सुधा" नांवाच्या टीकाग्रंथाची आज शेंकडों वर्षे विद्वत्समाजांत सारखी वाहवा होत आलेली आहे. सुधेच्या स्पष्टीकरणार्थ शेंकडों टीकाग्रंथ उत्पन्न झालेले आहेत व नवे ग्रंथ निर्माण होत आहेत. 'सुधा वा पठनीया, वसुधा वा पालनीया' अशी विद्वानांत यासंबंधीं म्हण प्रचारांत आली आहे. या म्हणीचा अर्थ 'पृथ्वीचें राज्य तरी करावें किंवा सुधेचें अध्ययन तरी करावें' असा आहे ( स. १३३५ ).

यांच्यानंतर या पीठावर वाईच्या सुरत्राण व सामक या घराण्यांतील व्यक्तिहि बसल्याचें ऐकिवांत आहे. पण त्यांचीं नांवें व काल कळलेला नाहीं. नुक्तेच समाधिस्थ झालेले या पीठावरील आचार्य श्रीसत्यध्यानतीर्थ

हेहि महाराष्ट्रांतीलच होते. ते अत्यंत कर्तबगार, व्यवहारचतुर आणि निष्णात पंडित होते. त्यांनीं गीतारहस्याबाबत लो. टिळकांशीं पुणें येथें वादविवाद केला होता.

या सांप्रदायांत पीठाधिष्ठित आचार्याशिवाय कोणीहि संन्यास घ्यावयाचा नाहीं असा नियम आहे.

**४ महानुभाव—**

महाराष्ट्रांत सुरू झालेल्या सांप्रदायांत महानुभाव सांप्रदायाला विशेष महत्त्व आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं भागवतधर्माचा पाया घालण्यापूर्वींच वऱ्हाडांत महानुभाव सांप्रदाय सुरू झाला होता. आणि त्याचे गद्यपद्यात्मक रसाळ ग्रंथ रामदेवराव यादवांच्या राजधानी देवगिरीवर वर्चस्व गाजवूं लागले होते. या सांप्रदायांत अनेक जातीच्या लोकापेक्षां महाराष्ट्र ब्राह्मणांचेंच वर्चस्व विशेष होतें. त्यांतहि आपल्या समाजांतील पुष्कळ व्यक्ति चमकून गेलेल्या आहेत. त्यापैकीं पुढील व्यक्तींनीं आपण ऋग्वेदी आश्वलायन असल्याचें स्पष्टच म्हटलें आहे.

त्यांत पारमांडल्य आम्नायदीक्षित पंडित हिरण्यगर्भ ऊर्फ हयग्रीव व्यास[१] यांचें नांव सांगावयास पाहिजे. हे गोदावरीचे कांठीं पांचाळेश्वराजवळ राक्षसभुवन येथें होते. यांच्या पित्याचें नांव माधवभट्ट व माता कावेरी. यांचें भगवद्गीतेवर विशेष लक्ष असे. हें भागवताच्या दशम स्कंधाचा नित्यपाठ करीत. हे काशीयात्रेस जात असतां वऱ्हाडांत पार्श्वनाथाच्या शिरपूर गांवीं ज्ञानेराज व्यासाशीं यांचा धर्मविषयक वाद झाला व त्यांचे हे शिष्य झाले. मग पैठणास येऊन राहिले. यांनीं दशमस्कंधावर श्लोकबध्द टीका लिहिली, ती गद्यराज या नांवानें प्रसिद्ध आहे.

महानुभाव साम्प्रदायांतील सात प्रमुख ग्रंथांपैकीं ' रुक्मिणीस्वयंवर ' हा ग्रंथ नरेंद्र कवीनें लिहिला आहे ( स. १२८८ ). यांना नृसिंह आणि

१ ( जन्म स. १२६५, दीक्षा स. १३०९, मृत्यु १३२४ ).

शैल्य असे दोन बंधु होते. यांचें आडनांव ' अयाचित '. नृसिंहानें मराठी ओवीछंदांत ' नलोपाख्यान ' व शैल्यानें ' रामायण ' लिहिलें. नामदेवानें साळ्या रसाळाच्या रामायणाचा उल्लेख केला आहे. साळ्या रसाळ हा शैल्य असावा, अशी शंका येते. (म. वाङ्मयाचा इतिहास पा. ४६५). नरेंद्रानें आपलें ' रुक्मिणीस्वयंवर ' देवगिरीच्या रामदेवराव यादवाला वाचून दाखविलें होतें.

याशिवाय विश्वनाथ बाळापूरकर यांनीं अनेक ग्रंथ केले. त्यांपैकीं 'ज्ञानचन्द्रिका' हा गद्य ग्रंथ व 'ज्ञानप्रबोध' (स. १३३१) ही ओवीबद्ध टीका विशेष प्रसिद्ध आहे. ज्ञानप्रबोध हा सांप्रदायाच्या पवित्र साती ग्रंथांपैकीं शेवटचा ग्रंथ होय.

**५ रामदासी सांप्रदाय--**

पारमार्थिक खराच पण व्यवहार व. राजकारण यांकडेहि पूर्णपणें लक्ष देणारा असा रामदासी सांप्रदाय श्रीसमर्थ रामदासस्वामींनीं उत्पन्न केला. इतर पारमार्थिक सांप्रदायांपेक्षां हा अगदीं वेगळा सांप्रदाय आहे. केवळ परलोकाकडे लक्ष ठेवून जगाच्या राहटीकडे दुर्लक्ष करणाऱ्या लोकांचा समर्थांनीं कडक शब्दांनीं निषेध केला आहे. व्यवहाराच्या धक्काधक्कींत जो अपेशी होतो, त्याला परमार्थांतहि यश प्राप्त होण्याची अशा नको, असा यांचा उपदेश आहे. रामदासी सांप्रदायांत कडकडीत वैराग्याला अत्यंत महत्व दिलेलें आहे. पण त्यांचें वैराग्य निष्क्रिय नसून कर्मयोगानें रसरसलेलें आहे. एकान्तांत बसून आत्मचिंतनाप्रमाणें भिक्षामिषानें घरोघर हिंडून लोकनिरीक्षण करण्याचाहि त्यांनीं उपदेश केलेला आहे. सर्व जनतेंत मिसळून वागण्यास आणि लोकांना शहाणें करून सोडण्याविषयीं त्यांनीं आपल्या दासबोधांत कळकळीची विनंती केली आहे. "उत्कट भव्य तेंचि घ्यावें" असें त्यांनीं सांगितलें आणि त्याकरतां रामदासी सांप्रदायाची, भगव्या कपड्याची आणि कुबडी धारण केलेल्या लोकांची

संघटना निर्माण करून हजारों शिष्य आणि मठ निर्माण केले. ती परंपरा आजहि अखंडपणें चालू असून चौंडेमहाराजांसारखीं रत्नें त्या सांप्रदायांत आजहि चमकत आहेत व सांप्रदायाची परंपरा आपल्या शक्तीप्रमाणें वाढवीत आहेत. रामदासी सांप्रदायाचे ग्रंथ, कागदपत्रें वगैरे साहित्य प्रसिद्ध करण्याकरितां श्री. शं. श्री. देवांसारख्यांनीं आपलें सर्व आयुष्य खर्ची घातलें आहे. इतकी स्फूर्ति उत्पन्न करण्याचे सामर्थ्य आज तीनशें वर्षांनंतरहि श्रीसमर्थांच्या चारित्रांत कायम आहेत. कालाचा ओघ ओळखून लोकांच्या हिताकरतां नवी संघटना निर्माण करण्याचें आणि नवें तत्वज्ञान प्रतिपादण्याचें अलौकिक धैर्य श्रीएकनाथांनन्तर समर्थांनीं दाखविलेलें आहे

यांनीं तीर्थयात्रेकरितां बारा वर्षे हिंडून देशाचें अवलोकन केलें. नंतर महाराष्ट्रांत येऊन श्रीरामचंद्राचें आदर्श चारित्र्य आणि मारुतीची उदात्त तत्वानिष्ठा यांचा निष्ठेनें प्रचार करून नवें राष्ट्र निर्माण केलें आणि अव्वल मराठेशाहींत सत्ययुगाचा भास उत्पन्न केला. याच वेळीं यांचा शिष्यसमुदाय विशेष वाढला. यांच्या राजकारणी शिष्यांत श्रीशिवाजीमहाराज, बाळाजी आवजी चिटणीस, प्रल्हाद निराजी, निळो सोनदेव, रामचंद्र नीळकंठ अमात्य इत्यादि मंडळी होती. धर्मकारणी शिष्यांत उद्धव, कल्याण, दिवाकर, वासुदेव, स्वानुभवादिनकरकर्ते दिनकर, भीम, शिवाय वेणु व अक्का या दोन स्त्रियाहि पण आहेत. यांची परंपरा अजूनहि अखण्डपणें चालू आहे.

**६ गाणपतसांप्रदाय–**

या सांप्रदायांतील प्रमुख साक्षात्कारी मोरया गोसावी होत (स. १३७५). यांच्या घराण्यांत गणपतीची उपासना पूर्वीपासून होती. यांच्या पित्याचें नांव वामनभट्ट शालिग्राम. वामनभट्टांनीं मोरगांवीं तपश्चर्या केली. श्रीच्या कृपेनें पुत्ररत्न झालें. तेच सुप्रसिद्ध मोरया गोसावी होत. यांनीं जटाघनान्त ऋग्वेदाचें अध्ययन केलेलें होतें. यांनीं थेऊर येथें घोर तपश्चर्या करून

श्रीचा अनुग्रह संपादन केला. हे महायोगी होते. यांनीं १८६ व्या वर्षी चिंचवड येथें जिवंत समाधि घेतली. यांचीं गणपतीवर केलेलीं रसाळ पदें प्रसिद्ध आहेत. यांच्या घराण्यांत एकापेक्षां एक थोर पुरुष उत्पन्न झाल्यानें यांना 'देव' असें गौरवपर नांव प्राप्त झालें. तेंच त्यांच्या घराण्याचें आज उपनांव झालें आहे. यांनीं वैदिक पद्धतीनें गणपतीच्या उपासनेचा प्रचार केला.

याशिवाय गणेशयोगी ( स. १७८७ ) या महागाणपताचें नांव सांगितलें पाहिजे. यांचा शिष्यपरिवार मोठा आहे. यांची समाधि मोरगांवीं आहे. यांनीं संस्कृत भाषेंत गणेशगीतेवर टीका लिहिली आहे. शिवाय समओवी मराठी टीकाहि लिहिली आहे. यांनीं गणेशविजय नांवाचा २२ अध्यायांचा ४५२२ ओव्यांचा एक ग्रंथ केला आहे. शिवाय गुह्यस्तोत्र, मयूरेशचरित्र व इतर पदें वगैरे पुष्कळ आहेत ( मं. त्रै. १२.४, ले.२५). यांचा सांप्रदाय बराच पसरलेला आहे. सुप्रसिद्ध अंकुशधारी महाराज हे विद्वान गृहस्थ यांच्या सांप्रदायांत होऊन नुकतेच दिवंगत झाले. ( स. १९१९ ) या सांप्रदायाचें यांनीं तेलगू लिपींतील ताडपत्रावरील पुष्कळ संस्कृत वाङ्मय संग्रहीत केलेलें आहे. त्यांचे शिष्य श्री. गणेशभक्त हेरंबराज बाळशर्मा ऊर्फ केसकरमहाराज हे तो सांप्रदाय निष्ठेनें पुढें चालवीत आहेत. त्यांच्यावर पुष्कळ भाविकांची अतिशय श्रद्धा आहे. इतर गाणपत सांप्रदायांपेक्षां हे तत्वज्ञान आणि आचार या दृष्टीनें सुद्धां वेगळे आहेत. अथर्वशीर्ष, गणेशगीता यांवरील गणेशयोगींद्रकृत भाष्यांत यांचा सांप्रदाय व तत्वज्ञान व्यवस्थित मांडलेलें सांपडतें.

श्री. गणेशयोगी व केसकरमहाराज हे देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण असून श्री. अंकुशधारी महाराज कऱ्हाडे होते.

श्री. केसकरमहाराजांनीं २१ वर्षें "अंकुश" मासिक चालविलें व अनेक सांप्रदायिक ग्रंथ प्रसिद्ध केले आहेत. गाणपत सांप्रदायाची परंपरा आद्य

श्रीशंकराचार्यशिष्य गिरिजासुतयोगींद्रापर्यंत जाऊन पोंचतें.

**७ दत्तसांप्रदाय—**

महाराष्ट्रांतील दत्तोपासना महानुभावानंतर स्वतंत्र सांप्रदायरूपानें श्रीनृसिंहसरस्वतीस्वामींनें सुरू केलेली दिसते. गुरुचरित्र नांवानें प्रसिद्ध असणारें बावन अध्यायांचें त्यांचें चरित्र सरस्वतीगंगाधर साखरे ( स. १४९८ ) यानें लिहिलें.

तो अत्यंत प्रासादिक असणारा ग्रंथ महाराष्ट्रांत अत्यंत भक्तिभावानें आणि व्रतस्थपणानें वाचला जातो. नित्यनेमानें या ग्रंथाच्या कांहीं ओंव्या वाचल्याशिवाय अन्नग्रहण करावयाचें नाहीं, असा नियम पाळणारे महाराष्ट्रांत हजारों लोक आहेत.

स्वामींचें घराणें शुक्लयजुर्वेदी होतें साखऱ्यांचें घराणें कृष्णयजुर्वेदी आपस्तंब होतें व त्यांची माता ऋग्वेदी आश्वलायन होती. दोन्ही घराण्यांचा पाहिल्यापासून गुरुशिष्यसंबंध होता.

श्रीनृसिंहसरस्वतीच्या वेळीं दत्तोपासना महाराष्ट्रांत बरीच पसरलेली होती. यांच्यानंतर शंभर वर्षांनीं श्रीएकनाथमहाराज पैठण येथें झाले. नाथांचे गुरु श्रीजनार्दनस्वामी हे दत्तोपासक होते. श्रीजनार्दनस्वामीवर नाथांची परमभक्ति होती, तथापि त्यांनीं दत्तोपासनेसह श्रीविठ्ठलोपासनेचा पुरस्कार करून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं सुरू केलेल्या भागवतसांप्रदायाची व्यवस्थित उभारणी करण्याकरितां सर्व आयुष्य वेंचलें.

नाथांनीं या सांप्रदायाची परंपरा अत्रि, दत्त, सहस्रार्जुन यदु, जनार्दनस्वामी अशी दिली आहे.

यानंतर जोगाईच्या आंब्याचे मराठी भाषेंतील प्रसिद्ध कवि दासोपंत हेहि दत्तोपासकच होते ( स. १५५१-१६१५ ).

मुसल्मानी आक्रमणानंतर धर्मभावनेला आवाहन करून भागवतसांप्रदायानें ज्याप्रमाणें आबालवृद्धांना धर्माच्या निशाणाखालीं आणलें, त्या-

प्रमाणेंच दक्षिण महाराष्ट्रांतील कर्मठ ब्राह्मणांनीं दत्तसांप्रदायाच्या द्वारां स्वत्त्वरक्षण करून मुसलमांनी आक्रमणाला तोंड देण्याचा यशस्वी प्रयत्न केला.

दत्तोपासकांत श्रीनृसिंहसरस्वतीसारख्या संन्याशानें कर्मठपणाचा पुरःस्कार केलेला असून, भागवतसांप्रदायांत ज्ञानेश्वरांखेरीज एकनाथ-तुकारामादि गृहस्थाश्रम्यांनीं त्यागाचा आणि विरक्ततेचा संदेश दिलेला दिसतो.

असा विचित्र देखावा स्वदेश, स्वधर्म, आणि स्वाभिमान यांचें संरक्षण करण्याच्या उच्च हेतूनेंच चाललेला होता याबद्दल मात्र संशय नाहीं.

हें दत्तभक्तीचें लोण आजच्या काळांत श्रीटेंबेस्वामीसारखे विरक्त आणि श्रीनारायणमहाराज केडगांवकर यांच्यासारखे ब्रह्मचारी यांनीं आतांच्या काळांपर्यंत आणून पोंचविलेलें आपण पाहत आहोंत.

श्रीनारायणमहाराज केडगांवकर यांनीं केडगांवजवळ बेटांत श्रीदत्ताचें सुंदर देवालय बांधून उत्तम वसाहत निर्माण केली आहे. मुक्तद्वार अन्नसंतर्पण वेदपारायणें आणि लाखों सत्यनारायण करून दत्तोपासनेचा उत्कृष्ट प्रचार त्यांनीं केला आहे.

**८ भागवतसांप्रदाय–**

भागवत किंवा वारकरी सांप्रदायाची उभारणी करण्याकरितां पाया घालणाऱ्या श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या सहकाऱ्यांत आपल्या समाजांतील पुष्कळच माणसें असलीं पाहिजेत. त्यापैकीं ज्ञानेश्वरीचें लेखन करणारे सच्चिदानंद बाबा थावरे यांचें नांव सुप्रसिद्ध आहे ( स. १२९० ).

श्रीज्ञानेश्वरमहाराजांचे वडील विठ्ठलपंत हे पंढरीचे वारकरी होते. ज्ञानेश्वरमहाराजांच्या नंतर सुमारें शंभर वर्षांनीं श्रीएकनाथ महाराजांचे पणजे भानुदास यांनीं आपल्या वारीच्या तपाचा प्रत्यय लोकांना दाखविला. राजसत्तेच्या जोरावर अनागोंदीच्या राजाईभक्त रामराजानें पंढरीच्या श्रीविठ्ठलाची मूर्ति अनागोंदी येथें नेली. आणि सुंदर मंदिर

बांधून त्या मूर्तीची तेथें स्थापना केली. यामुळें विठ्ठलभक्त वारकऱ्यांत एकच गोंधळ उडाला. अशा वेळीं यांनीं पुढाकार घेऊन अनागोंदीस गमन केलें, आपल्या भक्तीचा प्रत्यय दाखवून राजाकडून श्रीविठ्ठलाची मूर्ति परत मिळवून ती पुनः पंढरपुरास आणली आणि तिची पुनः स्थापना केली. तेव्हांपासून कार्तिक शुद्ध प्रतिपदेपासून नवमीपर्यंत पंढरीच्या विठ्ठलमंदिरांत उत्सव करण्याची प्रथा पडली असें म्हणतात. श्रीविठ्ठलमूर्ति पंढरीला परत गेल्यामुळें हंपी येथील मोकळें पडलेलें विठ्ठलमंदिर आजहि आपणांस तुंगभद्रेच्या तीरीं विरूपाक्ष मंदिराशेजारी पाहावयास मिळतें.

तेथें भानुदासानें हृदयास पीळ पाडणारे केलेलं पुढील अभंग प्रसिद्ध आहेत. ' जैं आकाश वर पडों पाहे । ब्रह्मगोळ भंगा जाये । वडवानळ त्रिभुवन खाये । तरी तुझीच वाट पाहे गा विठोबा ।। न करी आणिकांचा पांगिला । नामधारक तुझाच अंकिला ।। ध्रु. ।। (अभंग ५०)

ज्ञानेश्वर, एकनाथ व तुकाराम या भागवतसांप्रदायाच्या मुनित्रयापैकीं पैठणचे एकनाथमहाराज हे एक प्रमुख होत.[१] ज्ञानेश्वरी, एकनाथी भागवत व तुकारामाची गाथा हे या सांप्रदायाचे प्रमुख ग्रंथ होत. या तिघांच्या विचारसरणींत बरेंच साम्य असून हे तिघे पक्के अद्वैतवादी आहेत. भक्ति आणि उपासना यांचा प्रचार हें यांचें ध्येय होतें. पंढरीचा विठ्ठल हा यांचा देव आहे. श्रीशंकराचार्यांच्या अद्वैतवादाशीं हे पक्के समरस झालेले दिसतात. द्वैती आणि ज्ञानविन्मुख अशा सांप्रदायापेक्षां यांचा भागवतसांप्रदाय वेगळा आहे. भागवतधर्माचा प्रचार इतरांपेक्षां यांनीं पद्धतशीरपणें केला आहे. यांच्या प्रतिपादनांत तत्परता आणि समंजसपणा दिसून येतो. ज्ञानेश्वरींतील तत्वज्ञानाच्या मांडणीचा पक्केपणा यांना पटलेला होता; म्हणून ज्ञानेश्वरीची संशोधित प्रत यांनीं तयार केली आणि

१ स. १५३३-९९

तिचा भागवत सांप्रदायाचा मुख्य ग्रंथ म्हणून यांनीं प्रचार सुरू केला. समाजांत प्रतिष्ठा पावलेल्या शास्त्रीपंडितांकडून ज्ञानेश्वरीला अद्यापि मान्यता मिळालेली नव्हती. तें काम पैठणसारख्या क्षेत्रांत राहाणाऱ्या या सदाचारी ब्राह्मणांनीं पार पाडलें. यांनीं ज्ञानेश्वर समाधि असलेल्या आळंदी गांवाचें माहात्म्य वाढविलें व आळंदीला वारी करण्याकरितां जाण्यास यांनीं उत्तेजन दिलें. त्या समाधीचा जीर्णोद्धार केला आणि तुकारामासारख्याला स्फूर्ति देऊन भागवत सांप्रदायाचा भव्य आणि सर्वसंग्राहक प्रासाद उभारला. ज्ञानेश्वरमहाराजांचें योगशास्त्र यांच्यापर्यंत टिकून होतें. यांच्या भागवतांत त्या योगाचें सविस्तर वर्णन आढळतें. पण तो योग या सांप्रदायांतून पुढें नष्ट झालेला दिसतो.

यांचें भागवत काशीस मनकर्णिका घाटावर, ते मराठी भाषेंतील होतें म्हणून, सांगण्यासहि प्रथम पंडितलोकांकडून विरोध झाला. पण यांचें प्रतिपादन ऐकून त्या ग्रंथाची काशींतील लोकांवर एवढी छाप पडली, कीं तेथें त्या ग्रंथांची पालखींतून मिरवणूक काढण्यांत आली. यांनीं आपला भागवत-ग्रंथ काशींतच पुरा केला.

हा भागवत ग्रंथ नाथांनीं जरी श्रीमद्भागवतावर टीका म्हणून केलेला असला, तरी तो ज्ञानेश्वरीवर केलेल्या विस्तृत भाष्यासारखा आहे असें विद्वानांचें मत आहे. एकनाथी भागवत म्हणजे सुबोध ज्ञानेश्वरीच अशी यांच्या ग्रंथाची कीर्ति आहे.

यानंतर कालक्रमानें वारकरी सांप्रदायांत प्रामुख्य सम्पादलेल्या निळोबाराय पिंपळनेरकराचें महत्व सांगितलें पाहिजे. वारकरी सांप्रदायानें ज्यांचें वाङ्मय मान्य केलें आहे, असे हे शेवटले सन्त होत. तुकाराममहाराजांच्या चवदा टाळकऱ्यांपैकीं कोणालाहि जो सन्मान प्राप्त झाला नाहीं तो यांना तुकाराममहाराजांचा प्रत्यक्ष सहवास नसतांनाहि प्राप्त झाला. तुकाराममहाराज वैकुंठवासी झाल्यानन्तर पुष्कळ वर्षांनीं यांनीं त्यांचा

अनुग्रह मिळावा म्हणून ४२ दिवस निराहार उपवास केला, तेव्हां तुकाराममहाराजांनीं यांना दर्शन देऊन अनुग्रह केला आणि माळ अर्पण केली.

यानंतर यांनीं अभंग केले आणि सांप्रदायाची कीर्तनभजनद्वारा फारच उत्तम सेवा केली. पुष्कळ लोकांचें यांच्या अभंगाकडे अजून जावयास पाहिजे तितकें लक्ष गेलें नाहीं. यांनीं ३०० श्लोकांत तुकाराममहाराजांची स्तुति केली असून एकंदर १६०० अभंग केले आहेत. यांच्या अभंगांची भाषा अगदीं अर्वाचीन असून वाणींत प्रसाद आहे. विशेषतः यांचें गौळणीचे अभंग फारच अप्रतिम आहेत. ते वाचले म्हणजे तुकारामांना शोभणाराच हा त्यांचा शिष्य आहे असे उद्गार सहजच निघतात.

यानन्तर महिपतिबुवा ताराबादकरांच्या इतपत जाडा ग्रंथकार या सांप्रदायांत अद्यापि कोणी झालेला नाहीं. यांनीं संतलीलामृत, भक्तलीलामृत वगैरे ग्रंथ करून सविस्तर संतचरित्रें लिहून काढलीं (स. १७१५ ते ९०).

चिमाजीअप्पा पेशव्याच्या वेळीं ( स. १७४० ) पुण्यांत श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं स्वप्नांत अनुग्रह दिलेले श्रीअच्युतमहाराज केसकर हे ज्ञानेश्वरीवर उत्कृष्ट प्रवचन करणारे होते. त्यांच्या घराण्यांत श्री. शामराजतात्या केसकर हे पुढें झाले. यांनीं स. १८५० मध्यें पुणें येथें समाधि घेतली. मुंबईतील दाक्षिणी हिंदुसमाजांत यांचा उपदेश व उपासनाप्रचार विशेषतः शेणवी, पाठारे वगैरे प्रभू ज्ञातींत विशेष असे. यांच्या शिष्यसांप्रदायांनीं सदाशिव पेठेंतील श्रीविठ्ठलाचें मंदिर बांधून त्यांत यांची समाधि बांधली. यांचीं पदें व अभंग वगैरे पुष्कळ कविता होती. ती प्रसिद्ध हरदास बिनायकबोवा सातारकर यांच्या पठणांत होती. ख्रिस्ती धर्माकडे झुकलेले मुंबईचे हरि केशवजी पाठारे यांस हिंदुधर्माची महती त्यांचे गुरु शामराज तात्या यांनीं पटवून दिली व ते कट्टे भागवतधर्मी बनले. सुप्रसिद्ध सावरे महाराज यांच्याच परंपरेंतील होत.

अलीकडच्या काळांत सांप्रदायाची ज्यांनीं नांव घेण्यासारखी सेवा केली

त्यांत सोलापूरच्या भाऊसाहेब काटकरांचें नांव अवश्य सांगितलें पाहिजे. यांचें ज्ञानेश्वरीवर अप्रतिम प्रभुत्व होतें. यांना संस्कृतचा गंधहि नव्हता, तरीहि यांचीं कीर्तनें ऐकण्याकरितां पुण्याहून देहूस कै. म. गो. रानडे, चिपळूणकर वगैरे मंडळी जात असत. भाऊसाहेबांचीं कीर्तनें ऐकलेली मंडळी अद्यापि हयात आहेत. आणि अजून त्यांचे शब्द कानांत गुणगुणतात असें ते म्हणतांना ऐकूं येतात.

कृष्णाजी पंढरीनाथ केणे, श्रीगोंदे ( जि. नगर ) हे भाऊसाहेब काटकरांच्या शेवटल्या दिवसांत उदयास आले. यांचें संस्कृत भाषेवर उत्तम प्रभुत्व होतें. त्याप्रमाणेंच ज्ञानेश्वरीवरहि होतें. यांची त्यावेळीं ज्ञानेश्वरीबुवा म्हणूनच प्रसिद्धी होती. हे प्रवचन व निरूपण उत्तम करीत. अमृतानुभवाचें भाषान्तर यांच्या पद्धतीनें करून यांच्या नातवानें प्रसिद्ध केलें आहे. पुण्याचे प्रसिद्ध वकिल कै. पांडुरंग बचाजी वहुलीकर हे यांचे सख्खे सावसभाऊ होत.

सध्यांची तुकारामाच्या अभंगांवरील संगतवार निरूपणाची पद्धति श्री. गंगूतात्या शिरवळकर यांनीं प्रचारांत आणली अशी समजूत आहे.

कै. ल. रा. पांगारकर हे या सांप्रदायांतलि असून त्यांचा संतवाङ्मयांचा व्यासंग दांडगा होता. यांनीं आपल्या रसाळ वाणीनें आणि लेखनानें भागवतसांप्रदायाचें वाङ्मय लोकप्रिय करण्याचा यशस्वी प्रयत्न केला.

सध्यांच्या हयात व्यक्तींत अनेक आचारशील आणि व्यासंगी असे आपल्या समाजांतील लोक या सांप्रदायांत आहेत. रावसाहेब पां. ज्ञा. कुलकर्णी ऊर्फ पं. पांडुरंगशर्मा यांचा व्यासंग सर्वश्रुतच आहे.

---

## प्रकरण १२ वें,

# पंडित व संस्कृत ग्रंथकार

मागें ज्ञानी होउनि गेले । तेंहीं बहुत कष्ट केले ।
तरी मग विख्यात झाले । भूमंडळीं ॥ —दास.

### १ प्रास्ताविक—

पांडित्य संपादन करणें हें आपल्या समाजाचें वैशिष्ट्य आहे. पांडित्य-संपादनास अवश्य असणारा काटकपणा, कष्टाळूपणा आणि निष्ठा आपल्या समाजांतील व्यक्तींनीं चांगली व्यक्त केली आहे. जेवढें कष्टाचें, त्यागाचें आणि बुद्धीचें काम असेल, तितक्या प्रमाणांत याच्या अंगांत वीरश्रीचा संचार होतो. आपला समाज सन्मानाचा भुकेला आहे. त्याला मान मिळत असेल, तर तो केवढेंहि दिव्य करण्यास तयार होईल. मात्र सरळ मार्गाचा हा भुकेला आहे. जें करावयाचें तें मनापासून, तळमळीनें करावें अशी याची वृत्ति आहे. पोषाखीपणा, पोकळपणा आणि ढोंग याला साधत नाहीं. हंसाचें खाद्य जसें मोती, तसें ब्राह्मणाचें अन्न म्हणजे मान-सन्मान होय. तो मिळतो अशी खात्री होतांच यानें पांडित्याची अशी सम्पादणी केली कीं, सर्व हिंदुस्थानांत याच्या पांडित्यानें दरारा उत्पन्न केला. प्रत्येक शास्त्राला यांनीं मौलिक ग्रंथ तयार करून ऋणी करून ठेवलें आणि आपला, आपल्या समाजाचा आणि देशाचा उद्धार केला.

आपल्या पांडित्याच्या इतिहासाची सुरवात वेदकालापासून होते. पुष्कळ ब्राह्मणग्रंथ दक्षिणेंत पूर्ण झाले असावेत. दाक्षिणात्यांच्या आचारांची विशेष नोंद करणारीं कृष्णयजुर्वेदाचीं सूत्रें दक्षिणेंत निर्माण झालीं असलीं पाहिजेत. पाणिनीसूत्रावर वार्तिक लिहिणारा कात्यायन दाक्षिणात्य होता. नागार्जुन हा सुप्रसिद्ध पंडित दाक्षिणात्यांपैकीं महाराष्ट्रीय असला पाहिजे.

असें त्याच्यासंबंधीं असलेल्या अनेक निर्देशांवरून वाटतें. कामसूत्रकार वात्स्यायनांनीं केलेल्या कुन्तल शातकर्णी, दाक्षिणात्यांचे विशेष आचार आणि अन्न यांच्या निर्देशावरून तो दाक्षिणेकडील ठरतो. राजशेखर महाराष्ट्रीय असला पाहिजे. यासारखे अनेक मोठे कीर्तिशाली ग्रंथकार कोणत्या प्रांतांतील होते ? त्यांची जात कोणती ? ते ब्राह्मण असले तर कोणत्या वेदाचे, शाखेचे किंवा सूत्राचे होते ? त्यांचें गोत्र किंवा कुलपरंपरा काय ? याची माहिती ते आपल्या ग्रंथांत अंशतः सुद्धां देत नाहींत. हीच स्वतःबद्दल माहिती देण्याच्या बाबतींतील आत्यंतिक उदासीनता किंवा हेळसांड ज्योतिषी भास्कराचार्य, मिताक्षराकार विज्ञानेश्वर, मुग्धबोधकार बोपदेव वगैरे थोरथोर चिकित्सकांच्या बाबतींतहि आढळून येते. कांहींनीं त्यांच्या कल्पनेप्रमाणें दिलेली माहिती त्रोटक, अपुरी आणि कांहीं वेळां संशयनिराकरणाच्या ऐवजीं संशय उत्पन्न करणारी होऊन बसते. कोणाला कोणती माहिती आवश्यक वाटेल हें सांगतां येत नाहीं. कदाचित् व्यापक क्षेत्रांत वावरणाऱ्या ग्रंथकाराला प्रान्त, शाखा, जाति वगैरेंच्या मर्यादा सोयीच्याहि वाटत नसतील,कांहीं असलें तरी आपल्या समाजाच्या दृष्टीनें माहिती देतांना तपशीलवार माहिती मिळणें अशक्य होतें, ही गोष्ट निश्चित आहे.

केवळ नांवावरून निर्णय करणें फारच धोक्याचें असतें. शिवाय प्रत्येक काळांत नांव लिहिण्याच्या पद्धतींतहि फरक पडतो. संस्कृतभाषा ही त्या वेळची ग्रंथभाषा असल्यानें कोणत्याहि प्रान्तांतील पंडित संस्कृत भाषेंत लिहीत. शिवाय प्रांतिक नांवांचें संस्कृतीकरण केल्यानें मूळ नांव नष्ट होई. उदाहरणार्थ—चौधरी या उपनांवाचें चतुर्धर असें केलेलें आढळतें. नीलकंठ चतुर्धर हा आपणास सप्तशतीच्या टीकेंत चतुर्धरमिश्र असें म्हणवून घेतो. मिश्र हें उपपद दाक्षिणी पंडित लावीत नाहींत. या प्रकारच्या घोटाळ्यांतून नेमका महाराष्ट्रांतील देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण शोधून काढणें अशक्य होतें. याला अपवाद फक्त भवभूतीचा आढळतो. हा आढळ्या

शतकांतील असूनहि त्यानें आपल्या नाटकाच्या आरंभीं नांव, गांव, गोत्र, शाखा वगैरे माहिती दिलेली आहे.

**२ भवभूति**—( स. ७१०—५० )

हा वऱ्हाडांतील चांद्याजवळच्या पद्मपूर येथें राहणारा उदुंबर उपनांवाचा तैत्तिरीय शाखेचा कृष्णयजुर्वेदी काश्यपगोत्री ब्राह्मण होता.

" करुणरसाचा राजा " या नांवानें प्रसिद्ध असणाऱ्या भवभूतीची योग्यता आज उत्तररामचरितांतील शब्दन्‌शब्द सांगण्यास समर्थ आहे. वेद, वेदान्त, धर्मशास्त्र, नीतिशास्त्र, काव्यें इत्यादींच्या सखोल अध्ययनाचें इतकें उत्कृष्ट प्रतिबिंब त्याच्या ग्रंथांत पडलें आहे कीं, त्याच्या विद्वत्तेबद्दल अन्दाजच बांधतां येत नाहीं. " प्रसन्नकर्कशा यत्र विपुलार्था च भारती " असेंच कोणीहि त्याचेच शब्दांत म्हणेल. " हारिणी " वृत्त, विशेषतः उत्तररामचरिताच्या तिसऱ्या अंकांतील हरिणीवृत्त भवभूतीला इतकें उत्कृष्ट साधलें आहे कीं, मेघदूताच्या मन्दाक्रांता वृत्ताची आपणांस सहजच आठवण होते.

भावनांचा उद्रेक, निसर्गदृश्यें व सूक्ष्म मानवी भावना रंगवतांना भवभूतीची लेखणी इतक्या वेगांत येते कीं, लेखकाबरोबर वाचकहि वाहत जातो.

उत्तररामचरित जरी लोक उत्कृष्ट मानत असले तरी महावीरचरित, माल्तीमाधव, गुणरत्न इत्यादि त्याचे ग्रंथ अगदींच सामान्य नाहींत.

याचा गुरु कुमारिलभट्ट. अम्बक नांवानें याचा कुमारिलाच्या वार्तिकावर टीकारूप ग्रंथ आहे. भट्ट गोपाळ–नीळकंठ–श्रीकंठ ( भवभूति ) असा यांचा वंश आहे.

**३ भास्कराचार्य**—

सह्याद्रीच्या पायथ्याशीं असणाऱ्या विज्जलबीड गांवीं महेश्वरभट्ट नांवाचा ब्राह्मण रहात असे. त्याच्या पोटीं स. १११४ मध्यें भास्कराचार्यांचा जन्म

झाला. यांनीं वयाच्या ३६ व्या वर्षी सिद्धान्तशिरोमणि नांवाचा ग्रंथ रचिला. त्यापैकीं पहिल्या भागांत अंकगणित व महत्त्वमापन हा विषय दिलेला असून त्याचें नांव पाटीगणित असें आहे. हा भाग यांनीं आपल्या लीलावती नांवाच्या मुलीला उद्देशून लिहिला, म्हणून याचें नांव ' लीलावती ' असें पडलें, अशी दन्तकथा आहे.

यांच्या पूर्वी आर्यभटीय हा ज्योतिषावर पौरुषग्रंथ केरळ प्रान्तांत झालेला होता ( जन्म स. ४७६ ). त्याचा यांनीं उल्लेख केला आहे. यांच्या पूर्वीचा सहावा पुरुष भास्कर हा भोजदेवाचा विद्यापति होता.

यांच्यामागें तीनचार पिढ्या अध्ययनपरंपरा चालली. सन १२०७ मध्यें खानदेशांतील चाळीसगांवाजवळ पाटण गांवीं यांचा नातू चंगदेवानें सिंघण यादवाच्या आश्रयानें गणिताच्या शिक्षणासाठीं स्वतंत्र विद्यापीठ स्थापिलें. ती परंपरा मध्यें मोडकळीस आलेली असली तरी अद्यापि 'सिद्धान्तशिरोमणि' सारखे ग्रंथ सांग शिकवणारे क्वचित् आढळतात.

बाकी आमच्या नव्य शिक्षितांना इंग्लिश व मुसल्मानी पद्धतीनें इतकें भारलें आहे कीं, यांचे बेरीज व वजाबाकीकरितां असणारे योग व अन्तर हे शब्द सध्यां समजणेंहि अशक्य झालें आहे. या, का, नी, पी, लो, हीं समीकरणाकरितां अक्षरें योजण्याचें सोडून ए, बी, सी, डी किंवा अ ब क ड हीं अक्षरें सध्यां योजिलीं जातात.

कमळाच्या राशींतून कांहीं सूर्यास, कांहीं विष्णूस, कांहीं शंकरास आणि बाकीचीं गुरुचरणीं अर्पण केलीं, इत्यादि प्रकारचीं उदाहरणें सध्यां कोठेंच आढळत नाहींत.

याप्रमाणेंच संशोधन, नव्या कल्पना व सूक्ष्मता वगैरे दृष्टीनें याचे ग्रंथ बुद्धिमत्तेचे आणि अपूर्व आहेत.

सिद्धान्तशिरोमणीचे लीलावती, बीजगणित, ग्रहगणित व गोल असे चार विभाग आहेत. आणि ते जवळजवळ त्या त्या गणितशाखेवरील

स्वतंत्र ग्रंथच होत. याच्या ग्रंथांत विवेचन अत्यंत पद्धतशीर आहे. त्यामुळें इतर आचार्यांचे ग्रंथ मागें पडून यांचे ग्रंथ सर्व हिंदुस्थानभर शिकविण्यास सुरवात झाली. ब्रह्मगुप्तास भास्कराचार्य आपला गुरु मानतो. पण याच्या ग्रंथाच्या सोईस्करपणामुळें ब्रह्मसिद्धान्ताचें सुद्धां अध्ययन लोकांना नकोसें झालें. याच्या ग्रंथांत सोप्या रीती व नवे शोध आहेत.

यांनीं चारी वेद व सहा शास्त्रें आपण शिकलों असल्याचा उल्लेख केला आहे. पण आपण कोणत्या वेदाचे आहोंत, हें कोठेंहि लिहिलेलें नाहीं. पण पाटण येथील यांचें घराणें अद्यापि तेथें नांदत असून ते लोक सध्यां देशस्थ ऋग्वेदी आहेत. त्यावरून भास्कराचार्य हे देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण असण्याचा संभव मान्य करावा लागतो.

**४ गणेश दैवज्ञ**—( स. १४९८—१५९८ नंतर मृत्यु ).

आपल्या समाजांतील जगप्रसिद्ध ज्योतिषी व संशोधक भास्कराचार्य यांच्या सुप्रसिद्ध घराण्यानंतर कोकणांतील समुद्रकांठच्या नांदगांवीं राहणाऱ्या गणेश दैवज्ञाची माहिती आपणांस असावयास पाहिजे. यांची ग्रहलाघव या ग्रंथामुळें जरी आज साडेतीनशें वर्षें प्रसिद्धि असली तरी यांनीं भास्कराचार्यांच्या सिद्धान्तशिरोमणीवर टीका व इतर पुष्कळ ग्रंथ लिहिलेले आहेत.

यांचें घराणेंच ज्योतिष्याचें होतें. यांच्या पित्यानें केलेला ' ग्रहकौतुक ' ग्रंथ विद्वत्तेच्या दृष्टीनें वाखाणण्यासारखा आहे. यांच्या पित्याचें नांव केशव दैवज्ञ होय.

यांच्या ग्रहलाघव ग्रंथानें सर्वांचेच ग्रंथ मागें पडले. पूर्वीच्या ज्योतिष्यांनीं ज्याचापावांचून क्वचित गणित केलें; पण यानें तर, सर्वच सिद्धांतोक्त गणित ज्याचापावांचून करून दाखविलें ! असा हा शोधक आणि कल्पक होता. यानें विनय न सोडतां पूर्वजांचा गौरव करून आपलाहि मोठेपणा ग्रहलाघवाच्या शेवटीं सांगितला आहे.

याच्या पित्यानें एक ग्रहण वर्तविलें. तें बरोबर मिळालें नाहीं, तेव्हां त्याचा उपहास झाला. तेव्हां त्यानें नांदगांवच्या गणेशमंदिरांत बसून तपश्चर्या आरंभिली. त्या वेळीं त्या वृद्ध गृहस्थास गणपतीनें दृष्टांत दिला कीं, ' आतां तुझ्या हातून ग्रह शोधण्याचें कार्य होणार नाहीं. मीच तुझ्या पोटीं अवतार घेऊन तें कार्य करीन ' त्याप्रमाणें केशव दैवज्ञानें झालेल्या आपल्या पुत्राचें नांव गणेश असें ठेवलें. आजहि ज्योतिषी लोक गणेशदैवज्ञास ईश्वरी अवतार मानतात. ईश्वरानें अवतार घेऊन करावें इतक्या थोर योग्यतेचें काम यांनीं केलें आहे यांत शंका नाहीं.

यांच्या पायांस डोळे होते म्हणून यास चालतांना जमिनीकडे पाहावें लागत नसे. तसेंच समुद्रकांठीं प्रचंड शिलाखंडावर बसून हा सारखा आकाशाकडे पाहात असे. या दोन्ही आख्यायिका याच्या गौरवपर आहेत. याचें लक्ष सतत आकाशाकडे असणें स्वाभाविक आहे. हा नुसतें गणित करणारा नव्हता, तर प्रत्यक्ष वेध घेणाराहि होता. तसें यानें आपल्या ग्रहलाघव ग्रंथांत म्हटलेलें आहे.

यांचे ग्रंथ लवकरच लोकप्रिय होऊन त्यांवर गंगाधर, मल्लारि विश्वनाथ वगैरेंच्या टीकाहि झाल्या.

यांनीं सोप्या युक्त्या योजून गणित सुलभ केलें. पण त्या मानानें तें जरा स्थूल झालेलें आहे. यांच्या घराण्यांत क्रमानें अनेक पिढ्या एकापेक्षां एक ग्रंथकार निर्माण झाले. गणेश–बल्लाळ–केशव यांचे ग्रंथ उपलब्ध आहेत. तसेंच बल्लाळपुत्र केशवाचा भाऊ अनंत याचा ग्रंथ उपलब्ध आहे.

हें घराणें देशस्थ ऋग्वेदी आहे. यांचा वंश अद्यापि नांदगांव येथें नांदत आहे. आतां ते जोशी असें आडनांव लावतात. पण घरांत ज्योतिषाचें विशेष ज्ञान असलेला कोणी दिसत नाहीं. यांचें गोत्र कौशिक आहे.

**५ जगन्नाथ जोशी सम्राट्—**

ग्रहलाघवकार गणेश दैवज्ञाची माहिती दिल्यानंतर सवाई जयसिंगाच्या

पदरीं असणाऱ्या सम्राट् घराण्याच्या पूर्वजांची माहिती दिली पाहिजे. साताऱ्याजवळच्या निंबगांवचे पं. जगन्नाथशास्त्री जोशी हे जयपूरच्या सवाई जयसिंगाचे गुरु होत. हे ज्योतिषशास्त्रांत निष्णात होते.

सवाई जयसिंग कच्छवाह हा जयपूरचा सुप्रसिद्ध राजा मोठा विद्वान आणि कर्तबगार होता. यानें ज्योतिषशास्त्रावर अनेक ग्रंथ केलेले आहेत. यानें दिल्ली, उज्जनी, जयपूर, बनारस व मथुरा या ठिकाणीं ज्योतिष-शाळा व वेळशाळा स्थापन केल्या. ग्रहांचे वेध घेण्याचीं नवीं यंत्रें यांनीं बनविलीं. बिनचूक वेध घेऊन यांनीं एक नवें पंचांग सुरू केलें. धातूंचीं यंत्रें लहान असतात व झिजतात, म्हणून यानें चुन्याचीं व दगडांचीं यंत्रें तयार केलीं. त्यांत जयप्रकाश, यंत्रसम्राट्, भित्तियंत्र, वृत्तषष्ठांश इत्यादि कांहीं यंत्रें नवीं कल्पिलीं, त्यांवर वेध घेऊन 'सिद्धान्तसम्राट्' हा ग्रंथ तयार केला.

हा सर्व ज्योतिषविषयक प्रचंड उद्योग पं. जगन्नाथ जोशी यांच्या सल्ल्याप्रमाणें आणि यांच्या हस्तें चालत असे. जागोजाग येणाऱ्या सम्राट् शब्दावरूनहि ही कल्पना येण्यासारखी आहे. सिद्धान्तसम्राट् हा ग्रंथ पं. जगन्नाथ जोशानें केल्याचें त्या ग्रंथांत स्पष्ट म्हटलें आहे.

पं. जगन्नाथ जोशी यांनीं जयपूर येथें अनेक सम्राट्, पौण्डरिक वगैरे यज्ञ केल्यानें त्यांना सम्राट् हें उपनांवच प्राप्त झालेले होते.

सवाई जयसिंगाचे हे गुरु असून राजघराण्याच्या गुरुत्वाचा मान अद्यापिहि या घराण्याकडे चालू आहे. यांच्या घराण्यांतील व्यक्तींना जयपूर येथें आजहि राजगुरु या पदवीनेंच संबोधितात. या घराण्यांतील व्यक्तींनींहि अद्यापपर्यंत लाखों रुपयांच्या जहागिरी परत करून पांचसात गांवेंच फक्त उपजीविकेकरितां ठेवून आपला त्यागी ब्राह्मणबाणा अद्यापि राखला आहे. पालखी, दरबारांत उत्थापन वगैरे मान अद्यापि तेथें यांना आहेत. सध्यां पं. राजगुरु गोपीनाथशास्त्री सम्राट् हे तेथें राजगुरु आहेत.

**६ डॉ. दप्तरी, केशव लक्ष्मण—**( ज. स. १८८० )

गणेश दैवज्ञानंतर गणितज्योतिषविषयक अभ्यास व संशोधनविषयक कामगिरी करण्याचें काम पुष्कळ विद्वानांनीं केलें असून त्यांची नांव-निशीवार माहिती देणें सुद्धां स्थलाभावीं अशक्य आहे. त्यांनीं आपले ग्रंथ लोकांच्या पुढें परीक्षणाकरितां ठेवलेले आहेत व त्यांपैकीं पुष्कळांची माहिती कै. शं. बा. दीक्षित यांच्या 'भारतीय ज्योतिषशास्त्राचा इतिहास' या सुप्रसिद्ध ग्रंथांत पाहावयास मिळेल.

सध्यां हयात असणाऱ्या गणितज्ञ ज्योतिष्यांत अभ्यास व संशोधन या दृष्टीनें नागपूरचे डॉ. केशव लक्ष्मण दप्तरी यांचें स्थान अद्वितीय आहे. कै. शं. बा. दीक्षितांच्या ज्योतिषशास्त्राच्या इतिहासाला पुरवणी म्हणून 'ज्योतिःशास्त्रनिरीक्षण' या नांवानें यांनीं लिहिलेला ग्रंथ यांच्या संशोधनात्मक सूक्ष्म दृष्टीची कल्पना आणून देण्यास पुरेसा आहे. यांच्या संशोधनाचा गौरव करण्याकरितां नागपूर युनिव्हर्सिटीनें यांना एल. एल. डी. ही पदवी दिली आहे.

खानापूरकरशास्त्री यांनीं गणितज्योतिषांत केलेले परिश्रम ग्रंथरूपानें लोकांच्या पुढें आहेत. तसेंच सांगलीच्या ज्योतिषशाळेचे गुरुजी श्री. दत्तात्रेय सीताराम नाथजोशी यांनींहि सिध्दान्तग्रंथांत अनेक विद्यार्थी तयार करून पुण्याची वेदशास्त्रोत्तेजकसभा व बडोदा वगैरे ठिकाणीं परीक्षेस पाठविले आहेत.

**७ काशींतील पंडित-घराणीं—**

काशींत महाराष्ट्रीय देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणांची वसाहत सनाच्या नवव्या शतकापासून असल्याचें पुराव्यानें सिद्ध होतें. अनंगपालाच्या वेळीं महीपति धर्माधिकाऱ्याचें घराणें काशींत रहात होतें. अनंगपालानें या घराण्याला तेथें विशेष धार्मिक अधिकार दिले व यांना तेथील धर्माधिकारी केलें. ही गोष्ट गंगापुत्र व महाराष्ट्रीय यांचा उपाध्येपणाबद्दलचा तंटा

कोर्टांत गेला असतां सिद्ध झाली आहे ( स. १९०४ ). काशींत हें दे. ऋ. ब्रा. चें घराणें अद्यापि नांदत आहे.

महाराष्ट्रांतील पंडितांना काशीसारख्या उत्तर हिंदुस्थानांतील क्षेत्रांत पंधराव्या शतकापासून पहिल्या प्रतीचा मान आहे. त्या वेळीं काशींत जाऊन स्थायिक झालेलीं महाराष्ट्रांतील पंडितांचीं प्रमुख घराणीं म्हणजे भट्ट, शेष आणि मौनि या तीन उपनावांचीं आहेत. या तीनहि घराण्यांत एकापेक्षां एक नामांकित पंडित उत्पन्न झाले. त्यांच्या पांडित्याला ग्रंथकर्तृत्वाची, वक्तृत्वाची, त्यागाची आणि लोकसेवेची जोड होती. त्या मुळें त्यांच्याकडे समाजाचें पुढारीपणहि सहजच चालत आलें. काशीक्षेत्र उत्तर हिंदुस्थानांत असूनसुद्धां त्या प्रान्तांतील पंडितांना या महाराष्ट्रीय पंडितांइतका मान तेथें कधींच प्राप्त झाला नाहीं. धर्म, विद्या आणि कर्तबगारी या सर्वच दृष्टींनीं या पंडितांपुढें उत्तर हिंदुस्थानांतील पंडितांचें तेज कधींच पडत नसे. या घराण्यांतील लोकांनीं प्रत्येक शास्त्रांत ग्रंथरचना करून आपलें पांडित्य परीक्षणाकरितां कायमचें लोकांपुढें ठेवलें आहे. त्यामुळें गेल्या पांचशें वर्षांचा संस्कृतविद्येचा किंवा हिंदुस्थानांतील पांडित्याचा इतिहास म्हणजे महाराष्ट्रांतील देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणांचा इतिहास होय.

यापैकीं भट्ट हे पैठणचे, मौनि हे पुणें जिल्ह्यांतील वाल्ह्याचे आणि शेष हे मूळ तेलंगणांतील तेलंगी ब्राह्मण होत. पण शेष हे आचार, विचार, भाषा व सोयरिकी यामुळें तीनशें वर्षांपूर्वींपासून पूर्ण महाराष्ट्रीय बनले आहेत. हीं सर्वच घराणीं पांडित्याच्या दृष्टीनें आज चारशें वर्षांपेक्षां अधिक काळ हिन्दुस्थानांत अग्रेसर असलीं तरी सर्व प्रसंगीं पहिला मान भट्टांनाच देण्याची पद्धत आहे. भट्ट घराणें अद्यापि काशींत नांदत असून मौनि घराणें गेल्या पिढींत नामशेष झालें आहे.

या घराण्यांपैकीं भट्टांच्या घराण्यास अद्यापिहि पांडित्याच्या बाबतींत पहिला

मान देण्यांत येतो. बंगाल्यांत नवद्वीप वगैरे ठिकाणीं पंडित-परंपरा या कालावधींत चांगलीच जागृत होती. तिचें वजन बंगालपुरतेंच होतें. पण नारायणभट्टासारख्या महाराष्ट्रीय पंडिताच्या विद्वत्तेचा अधिकार खुद्द काशी, कनोज, मिथिला येथेंच काय पण खुद्द बंगाल्यांतहि मानला जात असे. यानें सर्व हिंदुस्थानभर प्रवास केला होता. तसेंच यानें व याच्या घराण्यांतील लोकांनीं अनेक शास्त्रांत एकापेक्षां एक उत्कृष्ट ग्रंथ केले आहेत. आपलें सुदैव असें कीं, यांच्या घराण्यांत ओळीनें सातसात पिढया एकापेक्षां एक विद्वान् लोक उत्पन्न झाले. महाराष्ट्रीय पंडितांची वसाहत व वर्चस्व काशीसारख्या ठिकाणीं नवव्या शतकापासून आढळत असलें तरी यांच्या कर्तृत्वामुळें तिकडील महाराष्ट्राची वसाहत वाढून भरभराटीस आली यांत मात्र शंका नाहीं.

यांच्या घराण्यांतील एका पुरुषानें ‘ गाधिवंशानुचरित ’ नांवानें प्रसिद्ध असणारा एक काव्यग्रंथ लिहिला असून त्यांत या घराण्याचा इतिहास दिला आहे. हे महाराष्ट्रांतील पैठणकडील आश्वलायन सूत्राचे देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण होते. यांचा मूळ पुरुष गोविंदभट्ट हा पंधराव्या शतकांत दाक्षिणेंत पंडित म्हणून प्रसिद्ध होता. त्याचा नातू नारायणभट्ट होय. नारायणभट्टाचा पिता रामेश्वरभट्ट. रामेश्वरभट्टाचें विद्यापीठ पैठण येथें होतें. तें विद्यार्थ्यांनीं इतकें गजबजून गेलें असे कीं, त्याला श्रीरामचन्द्राच्या सैन्याच्या छावणीची उपमा देण्यांत येत असे. त्या वेळीं निजामशहाच्या दरबारांत याला सुवर्णमुद्रांकित निमंत्रण पाठवून बोलावण्यांत आलें होतें व याचा मोठा सत्कार करण्यांत आला होता. पुढें रामेश्वरभट्टाचा विजयनगरच्या कृष्णदेवरायाकडेहि बहुमान झाला. तेथून द्वारकेस जात असतां यास नारायणभट्ट नांवाचा पुत्र झाला ( सन १५१४ ). यानें द्वारकेस कांहीं दिवस पाठशाळा चालविली व मग हा काशीस जाऊन तिकडेच कायम राहिला. तिकडे त्यांच्या शिष्यपरंपरेला पौर्णिमेच्या समुद्राप्रमाणें भरती आली आणि सर्व

प्रान्तांतून विद्यार्थीवर्ग त्यांच्याकडे लोटत राहिला.

बादशहा अकबराचा प्रधान तोडरमल्ल यांच्या येथें सुप्रसिद्ध बंगाली पंडित विद्यानिवास बानर्जी यांच्याशीं यांचा वाद झाला व त्यांत नारायणभट्टाचा जय होऊन पं. बानर्जींचा पराजय झाला. वादाचा मुद्दा श्राद्धांत सजीव ब्राह्मण बोलवावेत का चटश्राद्ध करावें असा होता. कलियुगांत योग्य ब्राह्मण मिळत नाहींत म्हणून चटश्राद्ध करावें असें पं. विद्यानिवास बानर्जींचें म्हणणें होतें. पण यांनीं दर्भाच्या चटमूर्तीपेक्षां कलियुगांतील सत्पात्र नसणारा ब्राह्मणहि श्रेष्ठच असा पक्ष सिद्ध केला आणि तो बंगाली पंडिताकडून मान्य करून घेतला. अनेक शास्त्रीय विषयांवर वाद करण्याच्या कौशल्याबद्दल यांची ख्याति होती.

यांच्या नांवावर अनेक ग्रंथ असून संस्कारासंबंधीं 'नारायणभट्टी' ऊर्फ 'प्रयोगरत्न' हा यांचा ग्रंथ सर्वमान्य आहे. धर्मशास्त्राप्रमाणें मीमांसा व वेदान्त या विषयावरहि यांचें सर्वमान्य असे ग्रंथ आहेत.

मोगल दरबारांतहि यांचें वजन होतें. एका भयंकर दुष्काळाच्या वेळीं यांनीं आपल्या दैवी सामर्थ्यानें चोवीस तासांत पाऊस पाडला. म्हणून यांना मुसलमानांनीं उध्वस्त केलेल्या श्रीकाशीविश्वेश्वराच्या मन्दिराचा जीर्णोद्धार करण्याची परवानगी देण्यांत आली. त्याप्रमाणें यांनीं त्या मंदिराचा जीर्णोद्धार केला, तेव्हां यांची सर्व हिंदुस्थानभर वाहवा झाली व यांना 'जगद्गुरु' ह्या अत्यंत सन्माननीय शब्दांनीं गौरविण्यांत आलें. यांच्याच घराण्यांतील गागाभट्टानें छत्रपति शिवाजीमहाराजांना रायगडावर राज्याभिषेक केला होता.

गागाभट्टांचें मूळ नांव विश्वेश्वरभट्ट असें आहे. तथापि गागाभट्ट या नांवानेंच त्यांची प्रसिद्धि आहे. यांनीं मीमांसा, धर्मशास्त्र, अलंकार व वेदान्त यांवर ग्रंथ लिहिले आहेत. जैमिनिसूत्रावर यांची टीका आहे. कुमारिलभट्टाचें श्लोकवार्तिक श्रीशिवाजीमहाराजांच्या आग्रहावरून यांनीं पुरें केलें. 'शिवा-

र्कोदय' हा ग्रंथ यांनीं संन्यास घेतल्यावर केला. तसेंच 'समयनय' हा नीतिशास्त्रावरील ग्रंथ यांनीं छत्रपति संभाजीमहाराजांकरितां केला होता. असा हिंदुस्थानांत पहिल्या प्रतीचा ठरलेला काशीचा पंडित, शिवाजी महाराजांच्या राज्याभिषेकाकरितां, मुद्दाम आलेला होता. त्यामुळें यांचें नांव आपल्याकडे सर्वतोमुखी झालें आहे. महाराष्ट्रांतील ब्राह्मण आणि मराठे यांच्या कीर्तिचंद्राची ही पौर्णिमा होती आणि त्यामुळें सर्व भरतखण्ड आल्हादित झालें होतें.

निर्णयसिंधुकार कमलाकरभट्ट, द्वादशमयूख करणारे नीळकंठभट्ट हे सर्वच विख्यात असणारे महापंडित या भट्टघराण्यांतीलच होत. यांच्या ग्रंथांना लोकांत इतकी मान्यता प्राप्त झालेली आहे कीं, लोकांना व्यवहारांत यांची पदोपदीं आवश्यकता लागते. रोज व्यवहारांत उत्पन्न होणारे प्रश्न निर्णयसिंधु या ग्रंथावरून निर्णीत करण्याची सर्वत्र पद्धत आहे. मोठाले विद्वान लोक निर्णयसिंधु पाहूनच शास्त्रार्थ सांगतात. नीळकंठभट्टानें केलेल्या बारा मयूखांचीहि अशीच मोठी योग्यता आहे. व्यवहारमयूख हा व्यवहाराकरितां कोर्टकचेरींत मान्यता पावलेला सन्मान्यग्रंथ आहे. त्याप्रमाणेंच संस्कार, आचार, काल, श्राद्ध, नीति, दान, प्रतिष्ठा, प्रायश्चित्त, शांति वगैरेवर यांचे मयूख नांवाचे ग्रंथ आहेत. हा नारायणभट्टाचा नातू व कमलाकरभट्टाचा चुलतभाऊ होय. याच्या लेखनशैलीची फार प्रसिद्धि आहे.

**८ विद्यानिधि कवींद्र—**(स. १६२७–५०)

नारायणभट्टाप्रमाणेंच लोकांकडून व बादशाहांकडून अपूर्व सत्कार मिळविणाऱ्या सर्वविद्यानिधान विद्यानिधि कवीन्द्राची माहिती सांगितली पाहिजे. हे संन्यासी गृहस्थहि मूळचे महाराष्ट्रांतील आश्वलायनशाखेचे देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण होते.[१]

---

[१] गोदातीरनिवासी पश्चाद्येनाश्रिता काशी। ऋग्वेदीयाम्यस्ता साङ्गा शाखाश्वलायनी शस्ता ॥ कवींद्रचंद्रोदयः ३

गोदावरीच्या कांठीं असणाऱ्या नाशिकचे हे राहणारे. १ कवींद्रचंद्रोदय ( मानपत्रसंग्रह ). २ कवींद्रग्रंथसूची व ३ कवींद्रकल्पद्रुम हे यांच्यासंबंधींचे तीन संस्कृत ग्रंथ प्रसिद्ध झालेले आहेत.

यांचा ग्रंथसंग्रहहि मोठा होता. यांच्या संग्रहांतील ग्रंथ अद्यापि यांच्या त्या ग्रंथावर घातलेल्या नांवावरून शोधून काढतां येतात. यांचें नांवसुद्धां लोकांच्याकरितां केलेल्या कार्यामुळेंच इतिहासांत कायम होऊन बसलेलें आहे

यांच्या वेळीं काशी व प्रयाग येथें जाणाऱ्या यात्रेकरूकडून कर वसूल केला जाई व त्यामुळें यात्रेकरूंना अत्यंत त्रास होत असे. ही गोष्ट यांना सहन झाली नाहीं. यांनीं यासंबंधीं चळवळ करून पंडितांच्या मेळाव्यासह आग्रा येथें गमन केलें. कारण शहाजहान बादशहा आग्रा येथें रहात असे. बादशहाची दरबारांत भेट घेऊन यांनीं हिंदूंचा प्रतिनिधि म्हणून यात्रेकरूंची उत्कृष्ट वकिली केली. यांचें अलौकिक वक्तृत्व आणि वकिली-चातुर्य पाहून दरबारांतील देशोदेशींचे विद्वान अत्यंत चकित झाले. अखेर शहाजहान व दाराशेखो यांनीं हिन्दुयात्रेकरूंवरील कर माफ केल्याचा हुकूम दिला. त्या वेळीं विद्यानिधिस्वामींचा सर्व हिन्दुस्थानाकडून फार मोठा गौरव करण्यांत आला. तो दिवस लोकांनीं सणासारखा साजरा केला, आणि यांच्यावर हिंदुस्थानच्या सर्व भागांतून मानपत्राचा नुसता पाऊस पडला. या वेळीं बादशहानें यांना ' सर्वविद्यानिधि ' हा किताब दिला. त्यापैकीं यांना मिळालेल्या शंभर मानपत्रांचा संग्रह कलकत्ता रॉयल ए. सोसायटीच्या संग्रहांत आहे व आतां तो प्रसिद्धहि झालेला आहे.

९ इतर घराणीं—

यानंतर उदयास आलेले नागोजीभट्ट यांनीं आपल्या टीकाग्रंथानें सनाथ केलें नाहीं असें एकहि शास्त्र नाहीं. सर्व शास्त्रांत यांचे ग्रंथ असले तरी व्याकरणशास्त्रावरील यांचे ग्रंथ विशेष मान्यता पावलेले आहेत. विद्यादानाबद्दल यांची विशेष ख्याति होती ( स. १७७५ ). विद्वत्तेबद्दल यांचेच

शिष्य वैद्यनाथ पायगुंडे ऊर्फ अन्नंभट्ट यांची विशेष ख्याति आहे. मिताक्षरेच्या व्यवहारकांडावरील यांची टीका विशेष प्रसिद्ध आहे. पायगुंडे, नागेशभट्ट व भट्ट या घराण्यांचा परस्पर नातेसंबंध होता. काशींतील भारद्वाजांचें घराणें नारायणभट्टांच्या जामातापैकीं होतें. महादेवभट्ट भारद्वाजानें सिद्धान्तमुक्तावलीवरील दिनकरी नांवाची टीका लिहिली. म. म. दामोदरशास्त्री व गोविंदशास्त्री भारद्वाज हे अनुक्रमें बनारस व कलकत्ता येथें संस्कृतचे प्राध्यापक होते. पायगुंडे आणि चतुर्धर हीं दोन्ही घराणीं प्रसिद्ध आहेत. नीळकंठ चतुर्धर पंडितानें संपूर्ण महाभारतावर टीका लिहिलेली आहे. तसेंच त्याचें शतपथब्राह्मणावर भाष्यहि आहे. मात्र भारतावरील टीका प्रसिद्ध झाली आहे तसें भाष्य प्रसिद्ध झालेलें नाहीं. पण तसें भाष्य केल्याचा त्यांनीं महाभारतटीकेंत निर्देश केला आहे. तसेंच यांची सप्तशतीवर सुबोधिनी नांवाची टीका आहे. त्या टीकेंत यांनीं आपणास चतुर्धरमिश्र म्हणवून घेतलें असलें तरी हा नगर जिल्ह्यांतील कोपरगांवचा चौधरी आडनांवाचा दे. ऋ. ब्राह्मण होय. पुण्यास यांचे वंशज चौधरीशास्त्री आज हयात आहेत.

गेल्या पांचशें वर्षांचा संस्कृत विद्येचा आणि पांडित्याचा इतिहास म्हणजे महाराष्ट्रांतील देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणांचा इतिहास होय. या परंपरेचा शेवटला प्रतिनिधि स्पष्टवक्तेपणा आणि निस्पृहपणा याबद्दल प्रसिद्ध असलेला सुप्रसिद्ध न्यायमूर्ति रामशास्त्री प्रभुणे हा होय. ही गोष्ट म. म. हरप्रसादशास्त्री यांनीं आपल्या लेखांत आणि ओरिएन्टल कान्फरन्स लाहोर येथें केलेल्या अध्यक्षीय भाषणांत स्पष्टपणें मांडिली आहे (इंडि. अँटि. १९१२).

याशिवाय पायगुंड्यांचे जामात देव, म. म. गोपाळाचार्य कऱ्हाडकर, गोविंदाचार्य अष्टपुत्रे, काशीनाथशास्त्री अष्टपुत्रे, राघवेंद्राचार्य गजेंद्रगडकर, रड्डी, ऐनापुरे, वळे, झळकीकर वगैरे घराणीं प्रसिद्ध आहेत.

नागपूरकडे सदाशिवशास्त्री घुले, भट्टजीशास्त्री घाटे हे चांगले वैयाकरण होते व त्यांचे ग्रंथहि आहेत.

विठोबाअण्णा दप्तरदारांचा सुश्लोकलाघव हा ग्रंथ रसिकांना मान्य झालेला आहे. गोपाळाचार्यअण्णा कऱ्हाडकर यांची व्याकरणांतील उपस्थितीबद्दल प्रसिद्धि होती. माहुलीस कुंभारेशास्त्री तसेच प्रसिद्ध होते.

नाशिकचे गोविंदबुवा होशींग हे फारच अप्रतिम कीर्तनकार होते. त्यांच्या कीर्तनावर लुब्ध होऊन ग्वाल्हेरचे राजे श्री. जयाजीराव शिंदे यांनीं त्यांना गुरु केलें. पुढें कांहीं कारणामुळें संन्यास घेऊन ते काशींत येऊन राहिले. त्यांचें संन्यासाश्रमांतील नांव तारकाश्रम. त्यांनीं दुर्गाघाटावर तारकमठ, मणिकर्णिकाघाटीं गंगामहाल नांवाचें कृष्णमंदिर व असीघाटाजवळ चैतन्यमठ अशा संस्था स्थापन केल्या. त्यांत ते आळीपाळीनें रहात. यांचेच शिष्य प्रसिद्ध कीर्तनकार रामचन्द्रबोवा चांदवडकर व त्यांचे बंधु गोविंदबुवा व गोपाळबुवा होत. यांची वेदान्तशास्त्रविषयक व कीर्तनविषयक परंपरा उज्वल आहे.

जुन्या पिढींतल्या लोकांप्रमाणेंच पं. शंकरशास्त्री मारुलकर आनंदाश्रम पुणें, पं. कृष्णशास्त्री घुले नागपूर, पं. रंगाचार्य रड्डी वाई, वगैरे सध्यांच्या पंडितांनीं संस्कृतभाषेंत ग्रंथ लिहून पांडित्याप्रमाणेंच संस्कृतभाषेंत ग्रंथलेखनाची परंपरा आजहि उत्कृष्टपणें चालविली आहे.

पुणें जिल्ह्यांतील कै. रघुपतिशास्त्री वाजपेयी हे महामहोपाध्याय या विद्वत्तादर्शक पदवीनें भूषित होते. सध्यां भोरचे सीतारामशास्त्री शेंडे हे कलकत्ता येथें महामहोपाध्याय आहेत.

काशीचे सुप्रसिद्ध पंडित कै. म. म. लक्ष्मणशास्त्री व त्यांचे चिरंजीव राजेश्वरशास्त्री द्रविड हे महाराष्ट्रीय पंडितांचे सध्यांचे प्रतिनिधि होत. त्यांची ख्याति अखिलभारतीय असून सनातनधर्माचें उज्वल स्वरूप दाखविण्याची त्यांची कामगिरी उल्लेखनीय आहे.

ही पंडितांची परंपरा आजपर्यंत अखंड चालू आहे. पंडितानें अध्ययन व अध्यापनाबरोबर ग्रंथलेखनहि करावें लागतें. त्याप्रमाणें संस्कृत या

सर्वत्र चालणाऱ्या ग्रंथभाषेंत लेखन करण्याची परंपरा आपल्या पंडितांनीं अखंड चालविलेली आहे.

कै. विद्यावाचस्पति अप्पाशास्त्री राशिवडेकर व सध्या शंकराचार्यांच्या पीठावर असणारे डॉ. कूर्तकोटी यांची संस्कृतलेखन व भाषणाबद्दल अखिल भारतांत कीर्ति आहे. एका बंगाली गृहस्थानें चालविलेलें 'संस्कृतचंद्रिका' नांवाचें उत्कृष्ट मासिक संस्कृत भाषेंतील लेखननैपुण्यामुळें त्यांनीं अप्पाशास्त्री राशिवडेकरांच्या ताब्यांत दिलें आणि त्यांनींहि तें उत्कृष्टपणें अनेक वर्षें चालवून त्याला ' सुनृतवादिनी ' या सुमधुर संस्कृत साप्ताहिकाची जोड दिली. शिवाय त्यांनीं अनेक टीकात्मक व स्वतंत्र प्रबंध लिहिलेले आहेत. सध्यां ' मधुरवाणी ' नांवाचें संस्कृत मासिक बेळगांव येथें बुर्ली श्रीनिवासाचार्य व गलगली रामाचार्य हे चालवीत आहेत.

---

## प्रकरण १३ वें.

# राजे, सेनापति व मुत्सद्दी

**महायत्न सावधपणें । समयीं धारिष्ट धरणें ॥**
**अद्भुतचि कार्य करणें । देणें ईश्वराचें ॥** —दास १८।६।१५.

**१ प्रास्ताविक—**

महाराष्ट्राचा राजकीय इतिहास शालिवाहनांच्या पासून देतां येतो. शालिवाहन राजांनीं सुमारें साडेचारशें वर्षें हिंदुस्थानांत साम्राज्य गाजविलें. तें घराणें जातीनें ब्राह्मण होते आणि महाराष्ट्रीय होतें यजुर्वेदी असण्यापेक्षां ते ऋग्वेदी असण्याचा जास्त संभव आहे. पुराणांनीं गैरमाहीतगारीनें त्यांना आंध्रदेशांतील ठरविलें. त्याचा अर्थ शेवटीं त्यांचें छोटें राज्य आंध्रप्रान्तांत शिल्लक होतें इतकाच आहे.

पुराणें भारतीयुद्धानन्तर लवकरच लिहिलीं गेलीं असलीं, तरी त्यानंतर गुप्ताच्या वेळेपर्यंत त्यांच्यावर कांहीं संस्करणें झालीं. त्या संस्करणांत पुराणांतील प्राचीनवंश, वंशानुचरित वगैरे भाग जसेच्या तसेच कायम ठेवण्यांत आले. पण कालानुरूप उदयास आलेल्या देवतांचीं माहात्म्यें, भविष्यकालीन राजवंश आणि नीतिधर्मविषयक प्रचलित कल्पनांची त्यांना जोड देण्यांत आली. सध्यांची पुराणाची आवृत्ति गुप्तांच्या काळीं प्रयागच्या आसपास संस्करण केलेली आपल्यापुढें आहे. शालिवाहनांचें राज्य त्या वेळीं जीर्ण होऊन आंध्रप्रांतांत नाममात्र शिल्लक होतें. त्यावरून पुराणांत त्या घराण्याची नोंद आंध्र किंवा आंध्रभृत्य या नांवानें झाली. वास्तविक हें घराणें महाराष्ट्रीय ब्राह्मणांचें होतें. त्यांचे महत्वाचे पुष्कळ शिलालेख महाराष्ट्रांत सांपडलेले आहेत. आणि त्यांत त्यांनीं केलेल्या पुष्कळच यज्ञांची नोंद आहे. त्यावरून हें घराणें यज्ञप्रिय वैदिकांचें होतें यांत शंका राहत नाहीं. शिवाय त्यांनीं अश्वमेधासारखे यज्ञहि केले होते. पुढें त्यांच्यासंबंधीं नानाप्रकारचे गैरसमज पसरलेले दिसतात. त्यांना संस्कृत येत नव्हतें, त्यांची कुळी शुद्ध नव्हती, वगैरे अपवाद त्यांच्यासंबंधीं होते. पण जित आणि जेते यांच्यांतील संबंध ध्यानांत घेतल्यास या अपवादांतील रहस्य आपल्या ध्यानांत येईल. विशेषतः उत्तरेकडील आलेल्या सम्राटाच्या अनुयायांनीं या जित लोकांविषयीं उत्पन्न केलेल्या कंड्यांतून या सर्व आक्षेपांचा जन्म झालेला आहे. स्थानिक लोकांनीं शालिवाहनशक चालवून आपण विचलित किंवा कलुषित झालेलो नाहीं हें चांगलें निदर्शनास आणलें आहे. महाराष्ट्रांतील जनता शालिवाहनशक व शालिवाहन घराण्याबद्दल अद्यापि पूज्यभावच दाखवीत आहे.

क्षत्रियानें राजा व्हावें आणि ब्राह्मणांनीं त्याचे मंत्री असावें ही योजना खरी; पण ब्राह्मणांनीं वेदशास्त्राप्रमाणें शस्त्रविद्येंतहि पांडित्य मिळविल्याचें दिसतें. शस्त्र आणि शास्त्र यांत पारंगत असणें आणि प्रसंगीं त्यांचा उप-

योग करणें हें त्यांना कर्तव्यच वाटत असे. द्रोण, अश्वत्थामा, कृप यांच्यासारखे कौरवपांडवांचे शस्त्रास्त्रविद्येंतील गुरु प्रत्यक्ष रणांगणांतहि तितक्याच अहमहमिकेनें भाग घेतांना महाभारतांत आपणांस आढळतात. पांचाल देशाचें राज्यहि पांचालराज द्रुपदाला जिंकून द्रोणाचार्यांनें संपादन केलें होतें. भारतीयुद्धांत सेनापति भीष्म पडल्यानंतर सेनापतिपदावर द्रोणाचार्यांची योजना झाली. द्रोणाचार्यांचें कृष्णाजिनकमंडलुयुक्त निशाण जोंपर्यंत सेनापतीच्या अधिकारानें रणांगणावर वावरत होतें, तोंपर्यंत पांडवांना जयाची आशा दिसेना. तेव्हां त्यांनीं याचा पुत्र अश्वत्थामा मेल्याची खोटीच बातमी उठवली आणि सत्यनिष्ठ धर्मराजाच्या तोंडूनहि 'नरो वा कुंजरो वा' ची पुस्ती त्याला जोडवली. तेव्हां या सेनापतिपदावर असणाऱ्या ब्राह्मणांनीं पुत्रशोकानें सेनापतिपदाचा त्याग करून प्रायोपवेशनाचा मार्ग पत्करला. दुर्योधनानें शेवटीं याचा पुत्र अश्वत्थामा यासहि सेनापतिपदावर नेमिलें होतें. पंजाबांतील सुप्रसिद्ध पुढारी रामभुजदत्त हे आपण खास द्रोणाचार्यांच्या वंशांतील आहोंत असें नेहमीं जाहीरपणें सांगत असत. मधल्या कालांत अशीच ब्राह्मण राजांची व वीरांची परंपरा नांदत असली पाहिजे. त्याशिवाय शुंग, काण्व ही ब्राह्मण सम्राटांचीं घराणीं एकदम उदयास येणें शक्य नाहीं. महाराष्ट्रांतील शालिवाहनाचें राज्य खास महाराष्ट्रीय ब्राह्मणांचें होतें. त्यांनीं हिंदुस्थानांत सुमारें ४५० वर्षें साम्राज्य गाजविलें.

त्यानंतर अफगाणिस्थानांतील शाहीघराणें आणि मुहंमदकासीमनें सिंधमधील पराजित करून नष्ट केलेलें दाहीर नांवाचें राजघराणें शुक्लयजुर्वेदी ब्राह्मण होतें.

**२ यादवकालीन ब्राह्मणवीर—**

यादवकाळीं बऱ्याच ब्राह्मणांनीं तलवार उचलली होती. त्यांत खोलेश्वर ही प्रख्यात व्यक्ति आहे. हा सिंघण यादवाचा सेनापति असून मुद्गल-

गोत्री ऋग्वेदी ब्राह्मण होता. यानें अन्याच त्याच्या गुजराथेवर करून वाघेलांना जिंकलें. आणि सिंघणाच्या तांब्यातील मुलूख वाढविला. यानें संवक्रोश म्हणजे अजिंठ्याच्या डोंगरालगतचा भाग जिंकून तेथें आपली वस्ती केली. यानें शेंदुर्णी येथें बांधलेल्या देवळाचें नांवहि खोलेश्वरच ठेवलें. या खोलेश्वरचा राम म्हणून एक मुलगा होता. तो वीरधवल वाघेलाशीं लढत असतां मारला गेला. दुसरा बिचण होता, तोहि पराक्रमी होता. सिंघण यादवाचा काल स. १२००–१२५० हा होय.

पांचसहाशें वर्षांचा महाराष्ट्राचा इतिहास पहातां त्यांत नांवारूपास चढलेल्या राजेमहाराजांच्या उत्पत्तीचें व कार्यक्षेत्रांचें स्थान सह्याद्रीची पूर्व बाजू असल्याचें दिसतें. त्यांच्या उद्योगांत स्थानिक लोकांचा हात शिरणें सहाजिक होतें. मनुष्याची निवड करतांना कोणीहि झालें तरी त्या ठिकाणच्या लायक लोकांनाच हाताशीं धरणार. परस्थ व अपरिचित मनुष्याची कर्तबगारी डोळ्यांत भरण्यासारखी असल्याशिवाय त्यांचा दरबारीं प्रवेश होणें अशक्यच असल्यानें मुसलमानी शाहींत व त्याच्यापासून पुढें उत्पन्न झालेल्या मराठेशाहींत देशस्थ बहुसंख्य दिसले तर नवल नाहीं.

राजकारण म्हणजे सुळावरील पोळी. जीवित कस्पटवत मानून आज अंबारींत तर उद्यां उलट्या अंबारींत असला येथें मामला. तेव्हां त्यांत प्रवेश करणारी व्यक्ति अगर समाज वैभवाचा आभिलाषी, परंतु प्रसंगोपात त्याला दूर सारून काळाला कवटाळण्यास सदैव तत्पर असल्याखेरीज तिला राजकारणाची हवा मानवतच नाहीं. आणि ही राजकारणांतील विशिष्ट वृत्ति मराठे व देशस्थऋग्वेदी ब्राह्मण यांच्यांत आनुवंशिक संस्कारांनीं दृढतर होऊन बसल्याकारणानें स्वदेशी व परदेशी दरबारांत त्यांचाच समावेश झालेला आहे.

### २ मुसलमानी अमदानींतील ब्राह्मणवीर—

यादवांना धुळीस मिळवून मुसलमानांनीं दक्षिणेस आपलें अधिराज्य

स्थापलें तरी यादवांचे अमदानींतील महाराष्ट्रीय ब्राह्मणांचें राजकीय स्थान त्यांना ढळवतां आलें नाहीं. मुसलमानी अंमलामुळें ब्राह्मणांच्या एका हातांत लेखणी व दुसऱ्या हातांत तलवार राहायची ती त्यांच्या हातांत फक्त लेखणी राहिली. त्यामुळें मुसल्मान आले तरी ब्राह्मण जसेच्या तसे राहिले व दोन्ही हातांत पट्टा बाळगणाऱ्या मराठ्यांचा मात्र उजवा हात गळून पडला.

याच वेळीं आपल्या तेजानें पूर्ण उत्कर्षांत असणाऱ्या अकण्णा व मादण्णा या दोघां बंधूंचीं नांवें महत्त्वाचीं आहेत. मुत्सद्देगिरीबरोबरच तलवार गाजवण्यांतहि कुशल असणाऱ्या या जोडीनें केलेली स. १६७२ तील सय्यद मुझावरखानाची पेशकारी, १६७५ तील दिवाणगिरी व पुढें कर्नाटकाच्या बंडाचा मोड इत्यादि केलेलीं एकापेक्षांहि एक कामें इतिहास कधींहि विसरणें शक्य नाहीं.

आदिलशाहींतील व कुतुबशाहींतील मोंगलाकडे ओढा असणाऱ्या पठाणाचें वर्चस्व नाहींसे करण्याकरतां यानें कुतुबशहास पुढें करून शिवाजीच्या साहाय्यानें अदिलशाहींतील पठाणांचें वर्चस्व कमी करण्याची फार मोठी कामगिरी केली. पठाणांच्या जागा मराठ्यांना देऊन पठाण विरुद्ध दाक्षिणी असा डाव उभा केला आणि मोगलांविरुद्ध तीनचार वर्षें यशस्वी तोंड दिलें. याचा परिणाम असा झाला कीं, मादण्णा व अकण्णा ही जोडी जोंपर्यंत आदिलशाहीच्या मागें आहे तोंपर्यंत औरंगजेबाला दक्षिणेंत पाऊल घुसवण्याची आशा दिसेना.

इकडे कुतुबशाहींतहि यांचें वाढतें वर्चस्व सहन न होणारीं माणसें होतींच. अबुलहसनची पत्नी व पठाण यांचेवर क्षुब्ध न झाली तरच नवल. सर्व दक्षिणी राज्याचा यानें गट केल्यानें मोंगल फक्त यांच्या तोडलेल्या शिरांची वाट पहात होते. पुढें कुतुबशहानें शहाअलमशीं तह करितांच मोंगलांनीं यांचेविरुद्ध कट केला. मादण्णाला कटाचा सुगावा

लागूनहि मोंगल पाठीशीं असल्यानें गुरगुरणाऱ्या मिनराज या कटवाल्या पुढाऱ्याचा बंदोबस्त करतां येईना. त्रास नको म्हणून यानें आपल्या जहागिरीचें कोलकुंडा, हसनाबाद, राजगोपाळपेठ हे भाग निरनिराळ्या भावांना दिले. अशा रीतीनें काम आटपून येत असतांना यांचा व अक्कण्णाचा खून झाला. निर्दयपणें यांचीं प्रेतें रस्त्यांतून फरपटण्यांत आलीं ! ! आणि डोकीं घेण्यास औरंगजेब तयार होताच ! ! !

याच वेळीं कऱ्हाडचे यानतराव देशपांडे आणि आळंदीजवळील तुळापूर येथें सुवर्णतुला करणारा महाराजाधिराज मुरार जगदेव ही आपल्या समाजांतील थोर मंडळी कोठे सेनापति तर कोठें मुख्य प्रधान अशा जबाबदारीच्या जागीं चमकत होती.

**४ दादोजी कोंडदेव—**

गुणाच्या वाढीला नेहमीं त्यांना वळण लावणाऱ्या एकाद्या शक्तीची आवश्यकता असते. हिरा तेजस्वी खराच, परंतु पैलू पाडून तो अधिक तेजस्वी दिसतो त्याचें कारण हेंच आहे. हीच गोष्ट शिवाजीमहाराज व त्यांचे गुरु दादोजी कोंडदेव यांचे बाबतींत आपल्या दृष्टोत्पत्तीस येते. यांनीं शिवाजीच्या गुणांना योग्य प्रकारचें वळण मर्दुमकीच्या बरोबरच जमीन-महसुलाचें शिक्षण दिलें. ह्यानेंच स्वतंत्र स्वराज्यस्थापनेच्या कल्पनेची मुहूर्तमेढ शिवाजीमहाराजांच्या मनांत रोविली. पुढील पिढींत तयार झालेले ब्राह्मणमुत्सद्दी तयार करण्याचें महत्त्वाचें काम यानें पार पाडलें असावें. यांच्या कामगिरीचें महत्त्व तत्कालीन लोकांच्याहि लक्षांत आलें होतें. कारण या कामगिरीबद्दल याला ७०० होनांची बढती मिळाली होती. पवित्र, पापभीरु व निश्चयी असणाऱ्या या गुरूचे शिष्यहि तसेच निपजले यांत नवल नाहीं.

महाराष्ट्राचे पांग फेडण्याचा मान—भोसले घराण्यांतील शहाजी—शिवाजी—संभाजी—राजाराम व शाहू या पुण्यपुरुषांच्याकडे येतो. परन्तु

त्यांचा कलिजा होण्याचा मान मात्र देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणांच्याकडे जातो, हें इतिहास ठणठणीत शब्दांत सांगत आहे. शहाजी शिवाजीच्या जीवनांतील कोणताहि प्रसंग घ्या, त्यांत त्यांच्या बरोबरीनें ब्राह्मणसमाज आपणांस आढळतो. थोडक्यांत शिवाजीमहाराजांच्या उत्कर्षाचा इतिहास म्हणजे दे. ऋ. ब्राह्मणांच्या पराक्रमाचा इतिहास आहे असें म्हटलें तर वावगें होणार नाहीं. या वेळीं प्रथम खानाचा वकील म्हणून येऊन नंतर शिवाजीचा मित्र बनलेला सुभेदार कृष्णाजी भास्कर, चन्द्रराव मोऱ्याचे लढाईंत पुढाकार घेणारा राघो बल्लाळ अत्रे, शिवाजीशीं एकरूप होऊन कार्य करणारा म्हणून प्रसिद्ध असलेला राघो बल्लाळ कोरडे, शहाजीनें शिवाजीबरोबर दिलेले बाळाजी हरी व राघो बल्लाळ मेंडजोगी हे पितापुत्र, शिवाजीचा सर्वांत जुना चरित्रकार कृष्णाजी अनंत सभासद (हिरेपारखी), नीळकंठराव सरनाईक, शिवाजीचा अफझुलखानाकडील वकील पंताजी गोपीनाथ बोकील हे सर्व लोक आपल्या समाजांतील असून त्यांचीं चरित्रें म्हणजेच शिवशाहीचा इतिहास असें म्हटलें तर वावगें ठरेल काय ? फार कशाला, या काळांत तलवार पाजळीत फिरणारा किंवा लेखणीच्या फटकाऱ्यानें जग उलटें सुलटें करणारा ब्राह्मण आढळल्यास तो देशस्थ ऋग्वेदीच आहे असें म्हटलें तर उपलब्ध इतिहास तरी हें असें कसें ? असें विचारूं शकत नाहीं. मात्र या समाजाचा आनुवांशिक स्वभाव व तत्कालिन परिस्थिति यांचा अभ्यास केला पाहिजे.

**५ मोरोपन्त पिंगळे—**

शिवाजीमहाराजांच्या अष्टप्रधानांपैकीं सात प्रधान देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण होते. त्या वेळच्या पद्धतीप्रमाणें राजकारणांत पडणारा ब्राह्मण लेखणीप्रमाणें तलवारहि सफाईनें चालविणारा असे. केवळ कागदोपत्रीं व्यवहार सफाईनें करणारा ब्राह्मण त्या काळांतल्या राजकारणाला अगदीं अयोग्य समजत. त्या दृष्टीनें मुख्य प्रधान मोरोपंत पिंगळे यांचे कामाला तोड नाहीं.

ते जमाखर्चीं, डावपेची आणि दरबारीं कामांत निष्णात होते. त्याप्रमाणें रणनीतींतील त्यांची कुशलताहि अपूर्व होती. त्याचा प्रत्यय त्यांनीं वणी-दिंडोरी आणि साल्हेरमुल्हेरच्या युद्धांत उत्कृष्टपणें दाखविला. गनिमी-काव्यापासून तों ठाणबंदीच्या युद्धापर्यंत सर्व प्रकारचे चमत्कार यांनीं बाद-शाही सैन्याला दाखविले. वीसवीस हजार बादशाही सैन्याला यांनीं तोंड दिलें. बादशाही सैन्य घोड्यावर आणि यांचें सैन्य पायदळ असतांना यांनीं मोंगल सैन्याला पराभूत केलें. हा या युद्धांतील चमत्कार विशेष लक्षांत ठेवण्यासारखा आहे. सभासदानें आपल्या बखरींत प्रल्हाद निराजी, मोरोपंत पिंगळे, रामचन्द्र नीळकंट यांना शिवाजीमहाराजांच्या खालोखाल कर्तबगार म्हणून सांगितलें आहे.

**६ अण्णाजी दत्तो—**

" तुम्ही राज्याचे आधारस्तंभ " असें प्रत्यक्ष शिवाजमिहाराजांच्या-कडून गौरवलेल्या अण्णाजी दत्तोचें नांव इतिहास कसें विसरेल ? शिवाजी-महाराजांचा उल्लेख उत्कृष्ट रत्नपारखी म्हणून करत असत कीं नाहीं हें कांहीं सध्यां कळण्यास मार्ग नाहीं. पण नररत्नांची पारख करण्याची त्यांची कुशलता पाहून मन थक्क होऊन जातें. प्रल्हाद निराजी, मोरोपंत पिंगळे, बाळाजी आवजी, निळो सोनदेव, पंताजी गोपीनाथ अशा अनेक शिवाजी-शोधित रत्नांतील अण्णाजी दत्तो कोहिनूर आहेत हें मात्र निःसंशय. शिवाजीचा यांचेवरील विश्वास, अफझलखानाला मारण्यास जातांना याला जिजाबाई व संभाजी यांचे संरक्षणाकरतां गडावर ठेवणें, दिल्लीला गेला असतां यांचेवर राज्यांचा भार टाकणें व शिवाजी कर्नाटकांत गेला असतां यांचेवरच राज्याचा भार टाकला या व अशा अनेक गोष्टींनीं सिद्ध झाला आहे.

तलवार व लेखणी सारख्याच लीलेनें चालवणाऱ्या मनुष्याला त्या वेळीं मान मिळत असे. हिशेबी व लेखनकुशल अण्णाजी दत्तोना खास-

गीचा कारभार, पत्रव्यवहार, दप्तरे इत्यादि गोष्टींची व्यवस्था पहाण्याचें काम कराव्या लागणाऱ्या वाकनिसांचे काम मिळालें हें सोन्याहून पिवळें झालें. कारण यामुळेंच यांची योग्यता लक्षांत येऊन " राजपत्रें होतलि त्यांत न्यूनाधिक अक्षर, मजकूर, शोध करणें, महाल परगण्याच्या हिशेबाचा शोध लावणें, राजपत्रावर संमत करून वारचिन्ह रुजू करणें इत्यादि " कामें करण्याची सुरनिशी यांना दिली.

लढाई गाजवण्यांत हा मागेंपुढें पहात नसे, असें सुरतेची लूट, हुबळीची लूट, फोंड्याचा छापा, पन्हाळा जिंकणें इत्यादि कामांत यानें घेतलेला महत्वपूर्ण भाग पाहून वाटतें.

राज्याभिषेकाच्या वेळीं अन्तर्गत खात्याचा प्रमुख या नात्यानें याला छत्र धरण्याचा मान मिळाला होता. शिवाजी मेल्यावर हा सोयराबाईच्या बाजूला होता. परंतु तें कारस्थान हाणून पडलें व संभाजी गादीवर आला. परन्तु यानें परत अकबरामार्फत शिरक्यांना चिथावणी देण्याचें काम आरंभलें. ही बातमी संभाजीला कळून याला हत्तीच्या पायीं देण्यांत आलें.

६ हणमन्ते घराणें—

मराठ्यांच्या इतिहासांतील अत्यंत वादग्रस्त इतिहासापैकीं हणमंते घराण्याचा इतिहास आहे. सबंध कुटुंबचें कुटुंब राष्ट्रसेवेस वाहिलें, अशापैकीं हें घराणें आहे. नारोपंत, बाळकृष्णपंत, जनार्दनपंत, निळोपंत व अवधूत बाबूराव इतकीं हणमंत्यांचीं नांवें बखरींत सांपडतात. यांचीं नातींहि अनुपलब्धच आहेत. तरी आपणांस नारोपत व जनार्दनपंत हे भाऊभाऊ होते, असें उपलब्ध माहितीवरून समजतें. यापैकीं नारो त्रिमल, दादोजी कोंडदेवांचे पदरीं होता. तो स.१६५३ त मेल्यावर त्याचा मुलगा रघुनाथपंत, त्याचें काम पाहूं लागला. याच वेळीं नारोपंतांचे वगीनें जनार्दनपंत शिवाजीच्या पदरीं राहिला व पुढें त्यास शिवाजीनें आपले वजीर नेमलें. जनार्दनपन्तांचा वडील मुलगा गंगाधरपन्त याजकडे खाजगी मह-

ल्यांचा कारभार होता. दुसरा मुलगा श्रीनिवासपन्त यास व्यंकोजीनें आपले मुजुमदार नेमलें होतें.

शहाजी जिवंत असतां रघुनाथपंत फारसा प्रसिद्ध नव्हता. कर्नाटकच्या स्वारींतील शिवाजीच्या हालचाली म्हणजे रघुनाथपंत हणमंत्याच्या कर्तबगारीचा चालता बोलता इतिहासच होय. " आधींच पंडित, त्यांत कारभारी, विशेष विद्वज्जनांचा समागम, न्यायनीतिकुशल ज्ञाते " असे त्यांच्याविषयींचे बखरकारांचे उद्गार अगदीं सार्थ आहेत. शिवाजीचा धूर्तपणा ओळखून राष्ट्रहित सम्पादण्याचे बाबतींत यांची मदत अचाटच आहे. दोनही कामें रघुनाथपन्तांनीं सारख्याच तडफेनें आटोपलीं. व्यंकोजी राजांचें काम करून महाराजांच्या मुलुखाचें व फौजेचें काम बिनबोभाटपणें पार पाडलें. प्रत्यक्ष शिवाजीचे यांचेसंबंधीं उद्गार पाहा. " बरकड मनुष्यें आम्हीं सम्पादलीं, परन्तु तुम्ही वडलोपार्जित सेवक, आपली योग्यता दुसऱ्यास येणें नाहीं इ. " हणमंते कुटुंबाचा बडेजाव शिवाजीच्या हातून इतका वाढण्यास रघुनाथपंताची कामगिरीच कारणीभूत आहे. छत्रपति संभाजीनें तर हा कर्नाटकांतून भेटण्यास आला असतां बिरवाडीस स्वतंत्र मंडप उभारून दरबार भरविला व तेथें यांची भेट भेतली व यांस अमात्यपद दिलें.

### ७ प्रल्हाद निराजी—

राजारामाचे वेळीं राष्ट्रोद्धाराचें काम अत्यंत स्वार्थत्यागानें करणाऱ्या तरुण मंडळींत प्रल्हाद निराजी हा प्रमुख होता. हा शिवाजीचा न्यायाधीश निराजी रावजीचा मुलगा. संभाजीच्या कारकीर्दींत आपल्या गुणांचें प्रदर्शन करण्यास त्याला जरी संधी मिळूं शकली नाहीं, तरी त्या वेळच्या लोकांत त्याची अत्यंत शहाणा गृहस्थ म्हणून कीर्ति होती. शहाणपण व स्वार्थत्याग या गुणाबद्दल ग्रँट डफहि त्याची मनापासून तारीफ करतो. " यानें रायगडावर धान्याचा, द्रव्याचा व शिबंदीचा बंदोबस्त शिवाजीप्रमाणें ठेवला. शत्रूची बातमी राखून राजारामानें रायगडपासून विशाळगडपर्यंत

रहावें ही योजना प्रल्हाद निराजीचीच. "

प्रल्हाद निराजी जिवंत असेपर्यंत महाराष्ट्र व कर्नाटक या दोन प्रांतांचा कारभार अत्यंत एकसूत्रीपणानें चालला होता. प्रल्हादपंत व रामचन्द्र नीलकंठ हे एकदिलानें कारभार करीत. परन्तु प्रल्हादपंताचे मृत्यूनें राजारामापाशीं चांगला सल्लागार मनुष्य उरला नाहीं. त्यामुळें त्याच्या हातून बऱ्याच चुका होऊं लागल्या आणि त्याचाच परिणाम धनाजी व संताजी यांमधील वितुष्ट व संताजीचा वध होय. पुढें शाहूनें गदाधर प्रल्हाद नाशिककर यास आपला प्रतिनिधि नेमलें होतें.

८ रामचंद्र नीळकंठ अमात्य—

हिंदवी साम्राज्याचा डोलारा औरंगजेबाच्या वावटळीपासून शिरसलामत सावरणाऱ्या रामचन्द्र नीलकंठाचें कर्तृत्व कोणास ठाऊक नाहीं ? संभाजी मारला गेला, फितुरीमुळें रायगड तत्रस्थ मंडळींच्यासह शत्रूच्या ताब्यांत गेला आणि राजारामास सुरक्षितपणाकरितां कर्नाटकांत जावें लागलें. अशा वेळीं—राजा व पैसा या दोन महत्वाच्या गोष्टी अभावानेंच तळपत असतांना—औरंजेबाचे मुसंडीला यशस्वी तोंड देणें ही सामान्य गोष्ट नव्हे !

अशा परिस्थितींत अधिकाराचा नेकीनें उपयोग करून खजिन्यांत तूट पडूं न देतां मोंगलांना त्राहि भगवन् करून सोडून शिवाजीची परंपरा अजून तुटली नाहीं हें यानें पुनः सिद्ध केलें.

संभाजीचे वधानें लोक चिडले होते, शाहूच्या कैदेनें लोकांना चेव आला होता व संताजी व धनाजी ही जोडी लोकांचे मनांत आत्मविश्वास निर्माण करीत होती. अशा या आगीच्या कोठारावर वतनांचें नवें आमिष निर्माण करून यांनीं ठिणगी सोडली. मग स्फोट होऊन शत्रूच्या चिंधड्या होण्यास किती वेळ लागणार ?

यांचा राजनीति ऊर्फ आज्ञापत्र हा संभाजीला उद्देशून लिहिलेला ग्रंथ

यांच्या दूरदर्शित्वाची व राजनीतिकौशल्याची साक्ष देण्यास समर्थ आहे.

**९ शंकराजी नारायण—**

राजारामच्या वेळच्या भयंकर स्वातंत्र्ययुद्धाचे वेळीं रामचंद्र नीलकंठ अमात्याबरोबर कोणाचें नांव घेत असेल तर तें शंकराजी नारायण यांचें होय. राजारामानें जिंजीस जातांना आपल्या सबंध राज्याची मुखत्यारी रामचंद्रपंत व शंकराजी नारायण यांचे बळकट खांद्यांवर टाकली होती. सतत तीन पिढ्या एकनिष्ठेनें राज्याची सेवा करणारा मनुष्य राज्याचे आधीं स्वतःचें मरण पत्करील अशी राजारामाची खात्री होती. सातारा व कोंकणपट्टींतील जिंकलेला सर्व मुलुख धनाजी हाताखालीं दिलेल्या यांच्या ताब्यांत दिला जाई.

जिंजीपासून साताऱ्यापर्यंतच्या मुलखावर नजर ठेवून बादशहाला तोंड द्यायचें व सर्व लष्करी दळणवळण कायम ठेवून जिंजीचा वेढा लढवावयाचा असें महत्त्वाचें कार्य सिंहासन व खजिना अदृश्यावस्थेंत असतांना करून दाखवून मराठ्यांचें राज्य कोणत्याहि कठीण प्रसंगाला तोंड देण्यास नेहमीं सज्ज असतें हें यांनीं सिद्ध केलें आहे.

बादशहाच्या छायेंत तयार झालेल्या शाहूमहाराजांना सामील न होण्यांत यांनीं आपल्या ध्येयनिष्ठेची कमाल केली आहे. कारण शिवाजीच्या तालमींत तयार झालेल्या लोकांचे पक्ष, तेरड्याचे रंगाप्रमाणें तीन दिवसांत बदलत नसतात.

शाहूनें भेटावयास बोलावलें असतांहि हे गेले नाहींत. आणि जेव्हां शाहूच्याच आपल्याकडील प्रस्थानाची बातमी यांना कळली तेव्हां हिरकणीच्या साहाय्यानें यांनीं आपल्या तत्त्वाचा बचाव केला. वचनाला बाध येण्यापेक्षां मरणच सत्यप्रतिज्ञ लोक पसंत करीत असतात.

**१० मालेगांवकर राजेबहादूर—** ( मृत्यु स. १७७५ )

माळवा प्रांत जिंकण्याकरतां पहिल्या जोराचे प्रयत्नांत जी मंडळी

दक्षिणेंतून उत्तरेंत गेली; त्यांत या घराण्याचा मूळपुरुष नारोशंकर हा उदाजी पवाराचे बरोबर होता ( १७२० ). १७३० त याची नेमणूक मल्हारराव होळकराकडे झाली. नारोशंकर, अंताजी माणकेश्वर वगैरे लोक आरंभापासून शिंदेहोळकरांबरोबर उत्तरेंतील उद्योगांत थेट पानपतपर्यंत वावरत होते. स. १७४२ त यानें ओर्च्छा हें ठिकाण घेतलें. तेव्हां यालाच त्या प्रांताचे सुभेदार नेमण्यांत आलें. या वेळीं यास जरीपटका, नौबत व १५ लाखांचा सरंजाम मिळाला होता. नंतर यांनीं गुजरातच्या व सावनूरच्या लढाईंत पराक्रम केल्यानें यांना उत्तरेकडे रवाना करण्यांत आलें. राघोबादादाच्या कारकीर्दीत हा कांहीं दिवस प्रतिनिधींचेंहि काम करीत असे. पानपतच्या युद्धांत दिल्ली जिंकण्यांत यानें कौशल्य दाखविलें, त्यामुळें दिल्ली ताब्यांत येतांच तेथील मुख्यसंरक्षक यांनाच नेमण्यांत आलें. यांच्या ताब्यांत दिल्ली आली असतां बादशहानें आपले रक्षणाबद्दल यांस " राजेबहादूर " हा किताब दिला. शिवाय याला मालेगांव व त्याचे आसपासचीं गांवेंहि बक्षिस म्हणून मिळालीं. १७४० त यानें नाशिकला रामेश्वराचें देऊळ बांधून तेथें प्रचंड घंटा टांगली. ती आजहि नारोशंकरी या नांवानें सुप्रसिद्ध आहे. यांचे मुलाकडे—त्रिंबकराव नारायणकडे कांहीं दिवस शिंद्यांची दिवाणगिरी होती. यांचे भाऊ आबाजी व लक्ष्मण हेहि आपल्या भावाबरोबर वावरत होते. लक्ष्मण शंकरचा मुलगा विश्वासराव हा झांशीचे सुभ्यावर बरेंच दिवस होता.

**११ विठ्ठल शिवदेव विंचूरकर**-( १६७५-१७६७)

यांचें उपनांव दाणी असून यांचें वतन सासवड येथें होतें. दाणी घराण्याच्या पुढें दोन शाखा झाल्या. वडील शाखा मालेगांवास राजेबहादूर या नांवानें उदयास आली, व विठ्ठल शिवदेव यांचे वंशजास विंचूरकर हें नांव मिळालें. नरसिंह हें यांचें दैवत असून नीरानरसिंहपूरचें देऊळ यानेंच बांधलें आहे. हा लहानपणापासून हूड असे. दांडगाई फार करत

असल्यानें बापानें याला घराबाहेर हांकून दिलें. तेव्हां मढ्यांच्या अमृत-स्वामीच्या सेवेस हा जाऊन राहिला. तेथें शाहूच्या बक्षीशीं यांची ओळख होऊन हा बक्षीचे पागेंत नोकरीस राहिला. पुढें शाहूचा पळणारा डुक्कर यानें हातानें अडवून धरल्यानें शाहूनें खुष होऊन यास पागेंत दहा स्वारांची मनसब दिली. १७२० त चिमाजीअप्पानें हबशांवर स्वारी केली तींत यानें सिद्धीसाताचे घोडे पकडून चांगला पराक्रम व्यक्त केल्यानें यास शाहूनें पेशव्याचे हाताखालीं नेमलें. पुढें हा बाजीरावाच्या बहुतेक स्वाऱ्यांचे वेळीं हजर होता. पुढें यानें आपली बरीच मोठी फौज जमा करून दखबहाद्दर व बंगष यांचेवरील स्वाऱ्यांत फार मोठा पराक्रम गाजविला. १७३९ च्या वसईवरील मोहिमेंतहि हा हजर होता.

माधवरावाच्या वेळच्या कर्नाटकच्या युद्धांत यानें मोठा पराक्रम केला. सावनुरांत विठ्ठल शिवदेवांनीं बहुत पराक्रम केला. सबब त्यास चौघडा, जरीपटका व साहेब नौबत अशीं राजभूषणें व जवाहीर वगैरे दिलें. त्यास या लढाईत तलवारीची जखम झाली होती. १७४० च्या नासिरजंग-वरील स्वारींत मिळालेल्या प्रांताची वहिवाट बाजीरावानें याला सांगितली होती. पानपतच्या युद्धांत हा जखमी होऊन परत आला होता. शौर्य आणि नेकी याबद्दल यांची ख्याति होती.

**१२ गंधे, हिंगणे, तांबवेकर.—**

बादशहा व वजीर यांमध्यें बादशहातर्फे लढून प्रसिद्धीला आलेल्या अंताजी माणकेश्वर या पेशव्यांच्या सरदाराचें नांवहि बरेंच महत्त्वाचें आहे. या लढाईंत जाटांना पळतां भुई थोडी करण्याबद्दल यांस इटावा व फुंपुंद हे दोन प्रांत जहागिर म्हणून मिळाले होते. कामरगांवच्या वाड्याचा भव्य कोट अजून यांच्या वैभवाची साक्ष देण्यास समर्थ आहे.

अहमदशहा अब्दालीस यानें बराच हात दाखवला होता.

पानपतच्या युद्धांतून हा, बाजी हरी, नाना पुरंदरे व मल्हारराव होळकर

असे दिल्लीकडे रात्रौ चालले असतांना दांडग्यांच्या हुल्लडींत फरुखाबादच्या जमीनदाराकडून हा व बाजी हरी ठार झाले.

दिल्लीस कायम राहून मराठेशाहीच्या राजकारणाचीं सूत्रें हालविणाऱ्या नाशिकच्या हिंगणे घराण्यांतील थोर व्यक्तींची महत्त्वाकांक्षा आणि दूरदर्शीपणा त्यांच्या प्रसिद्ध झालेल्या पत्रांतून पदोपदीं दिसून येतो. बादशाहासुद्धां सर्व राजेरजवाड्यांवर त्यांचा उत्कृष्ट वचक असे.

महादजी शिंदे यांना कर्ज देऊन सराफीच्या धंद्याबरोबर तलवारहि तितक्याच जोरदारपणें चालवणाऱ्या गोपाळनाईक तांबेकरांचें नांवहि लक्षांत ठेवण्यासारखें आहे. १७७८ त दादाच्या सरदारांनीं पुण्यावर केलेल्या स्वारींत हा होता. याला पेशव्याची पोतदारी पाहिजे होती, तेव्हां दादास मदत करून दादाला पुण्याची गादी मिळवून देऊन त्याच्याकडून ती मिळवण्याच्या खटपटींत हा होता.

१३ सखारामबापू बोकील—

मराठेशाहीचा अत्यंत थोर राजकारणी पुरुष या नात्यानें लोकांच्या दृष्टीसमोर सदैव खेळत रहणारी व्यक्ति म्हणजे सखारामबापू बोकील होय. जनता त्याला" राजकारणांतील विधि " " प्रतिसृष्टि निर्माण करणारा " या नात्यानें ओळखत असे. प्रत्येक मुत्सद्यास आपलें महत्त्व ताजें ठेवावें लागणाऱ्या त्या काळांत राजकारणांतील महत्त्व म्हणजे सुळावरील पोळी असे. परंतु ज्या ज्या वेळीं राजकारणाचें खेंगटें इतरांना आवरेनासें होई तेव्हां सखारामबापू पुढें येऊन तें चुटकीसारखे सोडवून टाकत असे आणि मग लोक मागून इतके सोपें आपणास न आल्याबद्दल जळफळत.

प्रसंगानें मनुष्याच्या बुद्धीची किंवा शौर्याची पारख होत असते. हीच गोष्ट सखारामबापूचे बाबतींत दिसते. बाजीराव, नानासाहेब, नारायणराव व सवाई माधवराव या चार लोकांचे कारकीर्दींत हा चमकला आहे. आणि शांततेच्या वेळीं याचे हितशत्रु याचेविरुद्ध पेशव्याचे कान फुंक-

ण्याचे बाबतींत अत्यंत तत्पर दिसत असले तरी ज्या ज्या वेळीं पेचप्रसंग उत्पन्न झाले त्या वेळीं यांचे हितशत्रूंनाहि याला सर्वाधिकार देण्याबाबत शिफारस करावी लागली.

नानासाहेब पेशवे यांनीं मृत्युसमयीं यास मुख्य कारभारी नेमिलें व पुढील बारा वर्षांत प्रत्येक आणीबाणीच्या प्रसंगीं मुख्य दिवाणगीरीचीं व शेवटीं सर्वाधिकारित्वाचीं कामें यांच्याकडे सोपाविलीं.

थोरल्या माधवरावानें मरतेसमयीं याला बोलावून घेऊन नारायणरावाला याचे ताब्यात दिलें व राज्यरक्षणाची सर्व जबाबदारी याचेवर टाकिली.

पेशवाईंत हातीं घेईल तें काम फत्ते करण्याची कर्तबगारी याच्याच हातीं होती. म्हणून याला त्या वेळीं राजकारणांतला प्रतिसृष्टिकार म्हणत.

कोणीं कांहीं म्हटलें तरी बारभाईचे कारस्थानाचे वेळीं यानें केलेल्या कामागिरीपासून लोक यास अत्यंत बुद्धिमान् व हातीं घेतलेलें काम पार पाडणारा म्हणून विशेष ओळखूं लागले हें निश्चित. वस्तुतः हा राघोबाच्या पक्षांचा व राक्षसभुवनच्या लढाओसारख्या लढायांत यानें आपली स्वामिनिष्ठाहि चांगलीच व्यक्त केली होती. तरी देखील राघोबाचें अयोग्य वर्तन घडतांच बारभाईचें कारस्थान रचून यानें त्याला पक्का नि योग्य धडा घालून दिला. नारायणरावाचे खुनाचे वेळींच याला राघोबाच्या बद्दल थोडा तिटकारा उत्पन्न झाला व त्याची परमावधि नारायणरावाचा खून करणाऱ्या सुमेरसिंग व मुहंमद युसुफ या गारद्यांना जेव्हां राघोबानें बक्षिसी दिली तेव्हां झाली. याचवेळीं नाना फडणीस व रामशास्त्री प्रभुणे यांनीं बारभाईचें कारस्थान करण्याकडे याचें मन वळवलें. पुढें साबाजी भोसल्याला निजामानें आश्रय दिल्यावरून राघोबा त्याचे पाडावाकरतां निघाला. ठरल्याप्रमाणें सिद्धटेकाहून पेडगांवला गेल्यावर हा मुलांच्या मुंजीच्या निमित्तानें परत फिरला. स्वारींत ठरल्याप्रमाणें राघोबाला पदच्युत करून गंगा-

भाईंच्या नांवानें राज्यकारभाराची द्वाही फिरविण्यांत आली. यांत प्रथम जरी बापू, नाना, मोरोबा, तात्या व त्रिंबकराव मामा हे पांच भाई होते तरी राघोबा, निजाम, भोसले, होळकर, शिंदे, इंग्रज यांची व्यवस्था लावून सगळीकडे स्थिरस्थावर करण्याची कामगिरी सर्व सखारामबापूनेंच केली आहे. बारभाईच्या कारस्थानानंतर यांचेकडे अनभिषिक्त पेशव्याचा दर्जा येऊन नाना याच्या हुकुमाचा ताबेदार बनला. पण महत्त्वाचे प्रसंग उलगडतांच नाना परभारेंच आपल्या जबाबदारीवर महादजी शिंद्याला आपल्या कंपूत घेऊन राज्यकारभार करूं लागला. त्याबरोबर त्यावेळीं मोरोबाच्या साहाय्यानें सखारामबापूनें नानाला नमवलें व मग काम संपतांच नानाशीं सहकार्य करून मोरोबाच्या बंडाचा नायनाट करून टाकला.

पुढें याच्या फितुरीसंबंधींच्या दोन चिठ्या, बहुधा बनावट राघोबानें शिंद्यांना दिल्या. त्याबरोबर याला कैद करण्यांत आलें. कांहींच्या म्हणण्याप्रमाणें नानानेंच, यानें अडथळा करूं नये म्हणून, याला तुरुंगांत टाकलें होतें. परंतु कांहींहि असो, तुरुंगांत असतांनासुद्धां "अंतःकलहांत परक्यास हात घालूं दिला असतां नाश होतो" असें निजामाच्या मदतीबाबत उत्तर देणाऱ्या या बाणेदार पुरुषाचा अंत शोकदायक झाला यांत शंका नाहीं.

### १४ सेनापति तात्या टोपे—

सेनापतींच्या मालकेंतील तात्या टोपे यांचें स्थान फारच उच्च आहे यांत शंका नाहीं. मनुष्याचें महत्व हें त्यानें केलेल्या कार्याचे यशापयशावरच अवलंबून असतें असें नाहीं. कारण, अपेशी म्हणून झिडकारलेल्या लोकांच्या अपेशावरच यशस्वी लोकांच्या यशांची तेजस्वी इमारत उभारलेली आपल्याला कधीं कधीं दृष्टोत्पत्तीस येते. साधनांची कमतरता असतांना, भोंवताली फितुरीचा बुजबुजाट माजला असतांना, यानें बंडाचे वेळीं से. हॅवलॉकच्या सैन्याचा मोड, काल्पीचा ताबा व शिंद्याचा पराभव करून कानपूर ताब्यात घेणें या एकापेक्षां एक केलेल्या धाडसाच्या गोष्टी

पाहून तोंडांत बोट घालावेंसें वाटतें. भोंवतालच्या लोकांचा बेशिस्तपणा व फितुरी यामुळें यांच्या कीर्तीचा चन्द्र जरी निस्तेज झाल्याप्रमाणें भासत असला, तरी यांची कामगिरी भावी हिन्दीस्वातंत्र्याचे इतिहासांत सुवर्णाक्षरांनीं लिहून ठेवण्याइतकी मोठी झालेली आहे, यांत मात्र कोणाचेंहि दुमत होणार नाहीं.

यांच्या वडलांचें नांव अण्णा टोपे. प्रथमतः हा आपल्या पित्यासह गोदावरीच्या कांठावर असणाऱ्या कान्हे या गांवीं व येवलें येथें रहात असे. तेथून ते बिंचूरकरांच्या पागेंत बाजीरावाकडे ब्रह्मावर्तास गेले. तात्या दिसण्यांत सुरूप व रुबाबदार असून बंडाचे वेळीं पन्नाशीच्या सुमाराचा असावा. १८ एप्रिल १८५९ रोजीं शिप्री येथें याला फांशीची शिक्षा देण्यांत आली.

**१५ अर्वाचीन मुत्सद्दी व राजकारणपटु—**

इंग्रजी राज्य सुरू झाल्यावर कांग्रेस वगैरे संस्थांचें राजकारण जसें सुरू झालें तसेंच इंग्रजांच्या कायद्याला अनुसरून मुत्सद्दीपणानें राजकारभाराचे पेंच सोडविणारीहि पुष्कळ मंडळी निर्माण झाली. त्यांत सर टी. माधवराव व दिवाणबहादुर रु. रघुनाथराव यांचीं नांवें प्रामुख्यानें घेतलीं पाहिजेत.

सर टी. माधवराव हे प्रथम त्रावणकोरचे चार वर्षे दिवाण होते ( स. १८५८–६२ ). तेथें त्यांच्या ज्ञानाची व कार्यकुशलतेची अत्यंत वाहवा झाल्यानें त्यांना इंदोरचे दिवाण नेमण्यांत आलें ( स. १८७३ ). तेथें तीन वर्षांचा करार असतां बडोदासंस्थानांत बिकट परिस्थिति निर्माण झाल्यानें यांना दोन वर्षे भरतांच बडोद्यास दिवाण म्हणून नेमण्यांत आलें ( स. १८७५ ). सयाजीरावासारखा कुशल महाराजा निर्माण करण्याचें श्रेय यांना आहे. यांनीं सैन्याचा व्यवस्थेकरितां केलेले नियम जर्मनीच्या पहिल्या वुईल्यमनें जर्मन भाषान्तर करून आपल्या सैन्यांत वाटले असें म्हणतात.

यांना मराठी भाषा चांगली येत असून मराठींत यांनीं चांगल्या कविता केल्या आहेत. इंग्रजींत व मराठींत यांचीं कांहीं पुस्तकें आहेत. ( मृत्यु स. १९०१ )

तसेंच दिवाणबहादुर रु. रघुनाथराव हेहि इंदोरमध्यें पांच वर्षें दिवाण होते ( स. १८७५-८० ). त्यानंतर पुन्हाहि यांना दिवाण नेमण्यांत आलें होतें ( स. १८८६ ). महाराज शिवाजीराव होळकर यांच्या कारकीर्दींत दिवाण म्हणून यांचा फार लौकिक झाला. यांनीं तेथील कायदे व्यवस्थित लिहून तयार केले.

या दोघांचीं घराणीं मराठेशाहींत तंजावरकडे गेलेलीं दे. ऋ. ब्रा. चीं होत.

१६ कॉंग्रेसचें राजकारण—

आतां आपणांस हल्लींच्या राजकारणाकडे वळायचें आहे. या कार्यांत चमकण्याचा पहिला मान असेल तर तो कॉंग्रेसचे आद्यसेवक असणाऱ्या कष्टाळू आर. एन. मुधोळकरांचा. कॉंग्रेसच्या १८८८ त भरलेल्या अहलाबादच्या कॉंग्रेसचे वेळीं यांनीं प्रथम पोलीसखात्याचे सुधारणेचे ठरावाला पाठिंबा दिला आणि यांचेनंतर बरोबर दोन तपांचे तपश्चर्येनंतर सन १९१२ त बांकीपूरच्या कॉंग्रेसचे यांना अध्यक्ष निवडण्यांत आलें. एवढ्या अवधींत शेतकऱ्यांची कर्जमुक्तता, दारिद्र्य, आर्थिक सुधारणा व औद्योगिक शिक्षण यांचा यांनीं सखोल अभ्यास केला व ते नंतर या विषयांतील तज्ज्ञ समजले जाऊं लागले.

वऱ्हाडांतील श्री. माधव श्रीहरि ऊर्फ बापूजी अणे यांनीं लो. टिळकांचे अनुयायी म्हणून राजकीय चळवळींत भाग घेण्यास सुरुवात करून म. गांधींच्या नेतृत्वाखालीं सुरू झालेल्या कॉंग्रेसच्या सर्व चळवळींत भाग घेऊन तुरुंगवासहि पत्करला आणि अनेक महत्वाच्या चळवळींच्या वेळीं कॉंग्रेसचे अध्यक्ष व सर्वाधिकारी म्हणूनहि यांनीं कामें केलीं. पण पुढें

कॉंग्रेसच्या धोरणाविरुद्ध व्हाइसरायांच्या एक्झिक्युटिव्ह कौन्सिलची जागा यांनीं पत्करली. कांहीं दिवस हे परराष्ट्रीय हिंदीवसाहतखात्याचे मंत्री होते, नंतर सिलोनचे एजंट झाले. बेळगांवचे श्री. गंगाधरराव देशपांडे बेळगांवच्या कॉंग्रेसचे स्वागताध्यक्ष व अनेक वेळां कॉंग्रेसचे जनरल सेक्रेटरी होते.

याशिवाय मजूर चळवळीचे पुरस्कर्ते आणि पूर्वी सर्व्हंट ऑफ इंडिया संस्थेचे सभासद असणारे नारायण मल्हार जोशी यांचें नांव राजकारणी समाजसेवक म्हणून घ्यावयास पाहिजे. याप्रमाणेंच अखिलभारतीय मजूर संघाचे प्रमुख डॉ. रुईकर यांचा उल्लेख करावयास पाहिजे.

म. गांधींच्या नेतृत्वानें चाललेल्या व कॉंग्रेसबाहेरच्या समाजसत्तावादाच्या चळवळींत आपल्या समाजांतील व्यक्तींनीं फार मोठ्या संख्येनें भाग घेतलेला आहे. व मोठालीं कामें यशस्वीपणें पार पाडलेलीं आहेत. पण त्यांचें तपशीलवार वर्णन देण्याचें हें स्थळ नव्हे.

---

## प्रकरण १४ वें.

# आपल्या कवींचा दृष्टिकोन

**नसता कवींचा व्यापार । तरी कैंचा असता जगदुद्धार ।**
**म्हणोनी कवी हे आधार । सकल सृष्टीसी ॥** दास. १.२१

### १ प्रास्ताविक—

मोठालीं राज्यें संपादन करणाऱ्या किंवा चालविणाऱ्या लोकांच्या पेक्षांहि जगाच्या ज्ञानांत आपल्या ग्रंथांनीं भर टाकणारे तत्त्वज्ञ किंवा कवि हे श्रेष्ठ होत. सर्वसंहारक कालाच्या तडाख्यांतून ज्यांना आयुष्य लाभलेलें आहे, अशा ग्रंथांची योग्यता निर्विवादपणें मान्य करणें भाग आहे.

जितका प्राचीन ग्रंथ असेल तितकी त्याची दीर्घकाळ टिकण्याची शक्ति कसाला उतरलेली आहे असें ठरतें. जुन्या ग्रंथाच्या महत्त्वाप्रमाणेंच नव्या ग्रंथाचीहि कसोटी असते. जुन्या ग्रंथापेक्षां कांहीं तरी निराळें सांगण्याकरितां पद्धत बदलून आणि आवश्यकता दाखवून नवा कवि किंवा ग्रंथकार पुढें येत असतो. खरोखरीच तशी त्याची योग्यता नसल्यास तो कालाच्या ओघांत टिकत नाहीं. लोकप्रिय होणारा कवि त्या कालाचा संदेश घेऊन आलेला असतो आणि संदेश देण्याची शक्ति जोंपर्यंत कायम असते, तोंपर्यंत ग्रंथाला आयुष्य लाभतें. मराठी भाषेंतील ग्रंथकारांच्या प्रतिपादनांतील ताजेपणा आपल्या प्रत्यहीं अनुभवास येत असतो.

आणि त्यांच्या ग्रंथांतील विशेष प्रकारची शक्ति आपणांस प्रेरणा देत असल्याचा आपणांस अनुभव येतो. त्याचें कारण त्यांची स्वतंत्र दृष्टि आणि सामाजिक कल्याण करण्याची तीव्र उत्कंठाबुद्धि हेंच असलें पाहिजे. मराठी कवींच्या ग्रंथांतील विषय आणि त्यांची विवेचनपद्धति त्यांनीं संस्कृत ग्रंथांतून घेतली असें वाटणें स्वाभाविक आहे. त्यांपैकीं बहुतेक ग्रंथकार ब्राह्मण असल्यानें वेदादि वाङ्मयाचा आणि संस्कृतभाषेचा पगडा त्यांच्यावर विशेष असला पाहिजे. म्हणून त्यांच्या विवेचनाचें मूळ संस्कृत ग्रंथांत शोधण्याची बुद्धि होते. ज्ञानेश्वरांनीं आपली ज्ञानेश्वरी लिहिण्याकरितां महाभारतांतील गीता हा ग्रंथ स्वीकारला, पण त्यावर विवेचन करतांना उपमाअलंकारांचीं लेणीं तर स्वतःच्या प्रतिभेंतून निर्माण केलींच पण योगविषयक ज्ञानहि अगदीं नवें सांगितलें. पातंजलयोगापेक्षां ज्ञानेश्वरमहाराजांनीं प्रतिपादलेला योग अगदीं निराळा आणि स्वतंत्र आहे. योगशास्त्रविषयक प्रतिपादन वेदांत नाहीं. उपनिषदांत अगदींच थोडें आलें आहे. पातंजलयोगशास्त्रांत उत्तरकालीन योगविषयक प्रतिपादनाचा विस्तार सांपडत असला तरी तो ज्ञानेश्वरांच्या प्रतिपादनाशीं जुळत नाहीं. कदाचित् ग्रांथिक विवेचन आणि प्रत्यक्ष अनुभव यांच्या-

मुळें सुद्धां विवेचनांत असा फरक पडणें शक्य असतें. पण कुंडलिनी-वर्णन वगैरे विषयसुद्धां अगदीं स्वतंत्र प्रतिपादलेले आढळतात. आणि त्यांची परिभाषासुद्धां एक नाहीं. नाथसांप्रदायाकडून ही परंपरा श्रीज्ञानेश्वरमहाराजांकडे आली. नाथसांप्रदाय हा तांत्रिक सिद्धींचा मार्ग ज्ञानेश्वरांना कुलक्रमानें जरी प्राप्त झाला होता, तरी त्यांतील चित्ताची एकाग्रता साधण्यास उपयुक्त असणारा भाग तेवढा घेऊन भक्तिप्रधान ज्ञानमार्ग हा अद्वैताचा मार्ग त्यांनीं पत्करिला. तथापि योगमार्गाची पकड त्यांच्यावर पक्की होती, याचा प्रत्यय त्यांच्या लेखनांत आपणांस येतो. खुद्द भगवद्गीतेंत योगाचें तितकें खोल विवेचन नाहीं. मूळ ग्रंथांत नसलेल्या पण स्वतःला विशेष परिचित असलेल्या आणि लोकांना सांगाव्याशा वाटणाऱ्या गोष्टी ज्ञानेश्वरींत ज्ञानेश्वरमहाराजांनीं प्रतिपादलेल्या आहेत. केवळ शब्दार्थांची चिकित्सा करणाऱ्या गतानुगतिक लोकांपेक्षां ज्ञानेश्वरादि महाराष्ट्र ग्रंथकारांत ही स्वतंत्र प्रतिभा, परंपरा आणि स्वतंत्र विषय पेलण्याची धमक असल्यामुळेंच त्यांच्याभोंवतीं नामदेवादि वृद्ध संतांचा मेळावा जमा झाला. श्रीशंकराचार्य वगैरेंनीं केला नव्हता असा नवा सयुक्तिक गीतेचा अर्थ करणें, चढत्या वाढत्या क्रमानें उपमारूपकांचा वर्षाव करून मूळ विषय सहज स्पष्ट करणें, योगांतील अगदीं स्वतंत्र माहिती सांगणें आणि इतका प्रासादिक व उच्च भूमिकेवरचा ग्रंथ लिहून समाधान न झाल्यामुळें कीं काय, अनुभवामृतासारखा, कोठेंच ज्याला तोड नाहीं असा ग्रंथ लिहिणें या सर्वच गोष्टी मराठी भाषेचा हा पहिला ग्रंथकार साधा पाईक नसून स्वयंप्रभ आणि स्वतंत्र प्रतिभेची जागती ज्योत आहे हें सिद्ध करण्यास पुरेशा आहेत.

**एकनाथ—**( स. १५३३-९९ )

वारकरी सांप्रदायाचा संघटनाकुशल नेता ही याची कामगिरी जितकी महत्त्वाची आहे, त्यापेक्षांहि स्वतंत्र बुद्धीचा कवि आणि लोकांना वळण

देणारा निःस्वार्थी सत्पुरुष, या दृष्टीनें यांनीं केलेली कामगिरी अधिक महत्वाची आहे.

पुत्र, पत्नी, विरोधी लोक, अस्पृश्य, यवन आणि वेश्या वगैरेंशीं प्रसंग आला असतां हा कसा वागला त्यावरून यांच्या विचारसरणीची आणि उदात्तभूमिकेची चांगली कल्पना येते. शांतता, दया, अक्रोध आणि समता या गुणांचा हा मूर्तिमंत अवतार होता असें मानावें लागतें. हजारों वर्षें चालू असलेल्या आणि प्रतिष्ठा पावलेल्या संस्कृतभाषेला आणि पंडितांना टाळून मराठी भाषेंतून आपला प्रचार व ग्रंथरचना करतांना याला केवढा विरोध झाला असेल, याची कल्पना सहज येण्यासारखी आहे. त्यांतून मार्ग काढण्याइतपत बळकट आत्मविश्वास यांच्याजवळ होता व तो यांच्या प्रत्येक शब्दांतून प्रगट झाला आहे.

यांचे एकनाथी भागवत, भावार्थरामायण इत्यादि ग्रंथ उत्कृष्ट असले तरी यांचें मूर्तिमंत दर्शन यांच्या अभंगांतून व विशेषतः भारुडां- तून होतें. हे कीर्तनकार असून यांना गाण्याचें अंगहि बऱ्याच प्रमाणांत असावें. समाजांतील वेगळाले थर ही खरी राष्ट्रीय संपत्ति आहे हें यांच्या ध्यानांत आलेलें होतें. त्यांच्या चालीरितीचा यांनीं तन्मयतेनें आणि सहृदयतेनें उपयोग करून घेतला आणि त्यावर आपलीं स्फुट कवनें उभारलीं. त्यामुळें समाजांतील सर्व जातीच्या लोकांना याबद्दल विशेष विश्वास व जिव्हाळा वाटूं लागला. यांच्या अभंग व भारूडांतील ताजेपणा व आकर्षकपणा अद्यापपर्यंत टिकला आहे याचें कारण मुख्यतः हेंच आहे.

प्रत्यक्ष नाथ जेव्हां आपल्या कीर्तनानिरूपणांत या कवनांचा उपयोग करीत असतील तेव्हांचा त्यांचा रंग तर अपूर्वच असला पाहिजे. करमणुकी- बरोबर तत्वज्ञान आणि ध्येयवाद याचा त्यांत उत्कृष्ट मिलाफ झालेला आहे. तत्वज्ञानाची बैठक असल्यानें यांच्या, वरवर विनोदी दिसणाऱ्या कवनाला भारदस्त स्वरूप आलें आहे. आजचे गोंधळी, भराडी, वासुदेव, वाघ्ये,

भुते, मुरळ्या वगैरे लोक सध्यांहि नाथांच्या कवनांचाच उपयोग करतात. यावरून समाजाला कशाची जरूरी आहे हें नाथांनीं बरोबर हेरलें होतें, हें स्पष्ट होतें. त्यामुळेंच त्यांच्या वाङ्मयाला मराठी भाषेंतील वेद व उपनिषदें यांचें माहात्म्य प्राप्त झालेलें आहे.

नाथांच्या सर्वच वाङ्मयांत त्यांच्या धीरगंभीर अधिकारवाणीचा साक्षात्कार होतो. जणूंकाय दलित जातींचा उद्धार करण्याकरतांच यांचा अवतार झाला होता असें वाटतें.

यांच्या या अलौकिक दिव्य दृष्टीची छाप आजपर्यंत समाजाच्या सर्व भागावर स्पष्ट पडलेली दिसते. यांच्या साक्षात्कारानें व प्रेरणेनें यांच्यानंतर अनेक ग्रंथकारांना लेखनाची स्फूर्ति झालेली आहे.

यांची रहाणी जशी साधी होती तसेंच यांचें वागणेंहि साधें होतें. हे जसे वागतात तसेंच लिहितात आणि जसें लिहितात तसे वागतात. हें कठीण खरेंच; पण त्याप्रमाणें यांनीं वर्तन केलेलें आहे. काशीहून आणलेली गंगेची कावड तान्हेनें तडफणाऱ्या गाढवाला पाजण्याचें धाडस नाथाशिवाय दुसरा कोण करूं शकणार ? श्राद्धाच्या ब्राह्मणांकरितां केलेला स्वैपाक भुकेल्यांना अर्पण करण्याची विश्वकुटुंबी वृत्ति इतरत्र आढळेल काय !

अनाथ दुबळ्यांना साहाय्य करावें, बुडत्याला हात द्यावा, विश्वकुटुंबी वृत्ति ठेवावी, असंतानाहि संत मानावें, सुंदर ग्रंथ आपण लिहावेत व दुसऱ्याकडून लिहवावेत, हेंच जीवितध्येय नाथांनीं मानल्यानें यांच्या चरित्रांत एक प्रकारची जादू उत्पन्न झाली आहे. पुनः कोठेंहि अहंकाराचा दर्प किंवा स्वार्थाचा भागहि सांपडत नाहीं. राष्ट्रपुरुष कसा असावा याचा नाथ म्हणजे एक निर्दोष आदर्श आहे.

त्यांच्या पूर्वायुष्यांत दौलताबादच्या किल्ल्यावर शत्रूचा हल्ला झाला असतां हातांत शस्त्र घेऊन लढण्याचा प्रसंगहि यांचेवर आलेला होता.

त्यामुळें समाजांतील कोणताहि भाग त्यांच्या दृष्टीच्या व अनुभवाच्या टप्प्यांतून सुटलेला नव्हता.

एकनाथमहाराजांचें विवेचन विस्तृत आणि एखादा सिद्धांत मनांत ठसविण्याकरितां त्याचें विविध प्रकारें स्पष्टीकरण करणारें आहे. त्यांचें विवेचन चालू असतां वारंवार त्यांना अशी शंका येते कीं, आपण ज्या भागवत–एकादशस्कंधावर टीका करतों, त्याला सोडून बोलतों आहोंत किंवा कसें ? तशी शंका आल्यानंतर तेच त्याचें स्पष्टीकरण करतात कीं, श्रोत्यांना वाटेल कीं, मी मुळाला सोडून बोलतों, पण तसें नाहीं; मूळ श्लोकांतील अमक्या पदाला उद्देशून मी बोलतों आहें.

तसेंच कांहीं वेळां मूळांत कांहींच आधार नसतो आणि यांचा तर ओव्यांचा वर्षाव सुरू होतो. तेव्हां हे मूळाला सोडून असणाऱ्या ओव्यांचें स्पष्टीकरण असें करतात कीं, मला हा विषय सांगितल्याशिवाय राहवेना. म्हणून इतकें लिहीत आहें; श्रोत्यांनीं क्षमा करावी.

याशिवाय ' भण्डाऱ्यांतील भात जेवढा कुत्र्यानें उष्टा केला असेल तेवढा काढून टाकावा व बाकीचा उपयोगांत आणावा, सर्व अन्न वाया घालवूं नये, ' वगैरे यांचें विवेचन व्यावहारिक दृष्टीनें केलेलें असून त्याला मूळांत आधार सांपडणार नाहीं.

ज्ञानेश्वरीसारख्या ग्रंथाची शुद्ध प्रत तयार करणें, ज्ञानेश्वरांना मुख्य ठरवून वारकरी सांप्रदायाची उभारणी करणें, आळंदीच्या वारीस महत्व देणें, स्वतःला गुरुपरंपरेनें आलेल्या दत्तोपासनेबरोबर घरांतील विठ्ठलोपासनेला विशेष महत्व देणें इत्यादि सर्व प्रकार यांच्या स्वार्थनिरपेक्ष त्यागाचे आणि दूरदृष्टीनें संघटना उभारण्याकरतां कराव्या लागणाऱ्या योजकतेचे द्योतक आहेत.

भावार्थरामायणासारख्या ग्रंथांत सुद्धां वाल्मीकिरामायणाच्या आधारें रामचरित्र वर्णन करतांना अनेक नवे छोटेमोठे प्रसंग निर्माण करून रामाच्या

चरित्राला नवे सुंदर पैलू निर्माण करून आपल्या प्रतिभेचा प्रकाश यांनीं त्यावर टाकला आहे. रामाच्या भेटीस्तव सीता आणण्याकरितां जाण्याचे वेळीं रामानें आपणहून सीता आणण्यास कां सांगितलें नाहीं, याबद्दलचा वानरांतील संवाद, सीतेकडे जाऊन तिला मंगलस्नान करावयास सांगितलें असतां तिनें दिलेलें उत्तर व पालखींत न बसण्याचीं दिलेलीं कारणें वगैरे प्रसंग अगदींच नवे असून नाथांस लोकांना उपदेशाकरितां ते पाहिजे होते. (युद्धकांड ६७).

**३ दासोपंत देशपांडे**—( जन्म स. १५५१–मृत्यु स. १६१५ )

हे मराठी भाषेंतील सुप्रसिद्ध कवि पंढरपूरजवळच्या जोगाईच्या आंब्याचे होत. तेथें यांचे वंशज अद्यापि नांदत आहेत. यांचे वडील दिगंबरपंत, बेदरच्या बादशाहाचे नोकर होते. दासोपंताच्या अठराव्या वर्षी भयंकर दुष्काळ पडला. दुष्काळांत दीनदुबळ्यांवर दया दाखविण्याने वेळेवर सरकारांतील भरणा यांजकडून झाला नाहीं. तेव्हां दिगंबरपंतानें दासोपंतांना सरकारांत ओलीस ठेवलें. दासोपंत अत्यंत सौंदर्यसंपन्न होते. बादशहानें असें प्रसिद्ध केलें कीं, रक्कम भरली न गेल्यास दासोपंताची सुंता करून त्यांना आपले जांवई करावयाचें व मुलगा नसल्यामुळें गादीचे वारस यांना करावयाचें. या रात्रींत दासोपंतांनीं दत्तात्रयप्रभूची करुणा भाकली आणि दत्तप्रभूनीं दिगंबरपंताच्या रूपानें येऊन रकमेचा भरणा केला. पितापुत्रांची भेट होतांच या दैवी घटनेचा उलगडा होऊन यांनीं आपलें आयुष्य दत्तचरणीं अर्पण केलें.

संस्कृतांत व्यासाएवढा जबर असा दुसरा लेखक जसा झाला नाहीं तसा दासोपंताइतका अफाट काव्यसंपत्ति निर्माण करणारा मराठींत दुसरा कवि झालेला नाहीं. उच्च प्रतीचें आणि स्वतंत्र विचाराचें लेखन करण्याचा यांचा संकल्प असे. रोज एका टबूची शाई खर्च केल्याशिवाय यांची बैठक उठत नसे. यांची साग्र कविता तीन लाखावर आहे. मराठीप्रमाणें संस्कृ-

तांत लिहिलेले यांचे पुष्कळ ग्रंथ आहेत. संस्कृत पांडित्य जवळ असतां त्या वेळीं यांनीं मराठींत काव्यरचना केली हें विशेष आहे.

एक 'गीतार्णव' च ग्रंथ घ्या. त्याच्या सव्वा लाख ओंव्या आहेत. त्यांतील सुमारें तेरा हजार छापून प्रसिद्ध झाल्या आहेत. ग्रंथांतील विवेचन सुबोध, भाषा रम्य व विषयविवेचन फारच चटकदार आहे. यांच्या विवेचनाची पद्धति स्वतंत्र पण सुबोध आहे. वाचक यांच्या लेखनाबरोबर तन्मय होतो. पहा--'आक्षेप शिष्यांचे । आणि परिहार गुरूंचे । शंख कृष्ण-अर्जुनांचे, ऐसे स्फुरले ॥ आगीवीण चिंता जाळी । सुखांशु अवघा गिळी । चिंते ऐसें भूमंडळीं । दुष्ट नाहीं ॥ पुरुषार्थे जिणें गोड । पुरुषार्थेचि मरण वाड । पुरुषार्थ नाहीं तै उघड । मुख न दावावें ॥ धर्म लक्ष्मीचे रक्षण । धर्महीनांचें धन । व्यर्थ होय ॥

याचा 'ग्रंथराज' नांवाचा दुसरा एक स्वतंत्र व सुंदर ग्रंथ उपलब्ध आहे. समर्थांचा 'दासबोध' ही त्याच ग्रंथाची सुधारून वाढविलेली आवृत्ति होय. शास्त्रप्रतीति वगैरे प्रकरणें दोहींत अगदीं सारखीं आहेत. ओवीछंदाप्रमाणें यांचीं विविध चालींचीं पदेंहि बहारीचीं व विपुल म्हणजे सव्वालाख आहेत. त्यांपैकीं सोळाशें प्रसिद्ध आहेत.

यांना महाराष्ट्र सारस्वताचे आचार्य म्हणणें उचित आहे. यांची अलोट विद्वत्ता, अपरंपार भक्ति, अगाध ज्ञान, संभावित विनोद, दृष्टांतादि अलंकाराचें नैपुण्य, चटकदार कथानक, वर्णनशैली व भाषाप्रभुत्व हे सर्व स्वतंत्र आणि अतुलनीय आहे.

**४ मुक्तेश्वर**—( जन्म सन १५९९–समाधि स. १६४९ )

मराठी भाषेंतील श्रेष्ठ कवि या नात्यानें हा रसिकांस चांगला परिचित आहे. भारत व रामायण हे आपले दोन राष्ट्रीय ग्रंथ ओवीरूप देऊन यानें मराठींत आणले. याची वाणी मोठी रसाळ असून भारदस्त आहे. यांची कल्पनाशक्ति भव्य आणि आकर्षक असते. तसेंच वर्णनें रेखीव पण

अतिशयोक्तिपूर्ण असतात. रूपक हा तर याचा आवडता अलंकार आहे. योग्य अशा संस्कृत शब्दांबरोबरच मराठी ढंगाचे शब्द वापरण्यांत याचा हातखंडा आहे. याची प्रतिभा सतत जागृत असून पदोपदीं चमत्कार दाखविल्याशिवाय रहात नाहीं.

हा एकनाथमहाराजांचा नातू आणि नाथांच्या गोदूबाई नांवाच्या कन्येचा हा पुत्र. गोदूबाईचें सासरचें नांव गंगाबाई. ही कुरुंदवाडाकडे राहणाऱ्या आग्निहोत्री ब्राह्मणाला दिली होती. त्याचें नांव चिन्तामणि ऊर्फ विश्वंभर-बाबा. गोदूबाईला नाथ कौतुकानें लीला म्हणत. आणि हाहि आपल्या मातापित्यांचा उल्लेख ‘ लीलाविश्वंभर ’ या नांवानें करी. याची समाधि तेरवाड येथें आहे. याचे ग्रंथः— महाभारत. ( याच्या भारताचीं सर्व पर्वें आतां उपलब्ध झालीं असून तीं औन्ध येथें श्रीराजेसाहेब यांच्या संग्रहांत आहेत ). २ नाटकरामायण ऊर्फ कौतूहल रामायण. ३ भागवत. ४ अग्निपुराणांतील हरिश्चन्द्राख्यान. शिंवाय फुटकळ प्रकरणें. हे दत्तभक्त होते.

महाभारत लिहितांना याच्या प्रतिभेचा चमत्कार जागोजाग आढळतो. जुनीं कथानकें त्यांतील मर्म समजून लिहिण्यांत कौशल्य लागतें. त्याचप्रमाणें जुनी कथा लिहितांना केवळ संदेशवाहकाचें काम कवि करीत आहे कां त्याचेंहि कांहीं वैशिष्ट्य आहे, हें पाहावें लागतें. त्या दृष्टीनें मुक्तेश्वर हा स्वतंत्र प्रतिभेचा जातिवंत कवि आहे असें म्हणणें भाग पडतें. महाभारत रंगवतांना यानें मूळ महाभारतांतलि नसलेलीं प्रकरणें दाखल केलीं आणि तसें स्पष्ट नमूद करून ठेवलें. असें स्वतंत्रत्व स्वीकारण्याचा आपणास कसा हक्क आहे हेंहि त्यानें सांगण्यास कमी केलें नाहीं. आपल्या बुद्धीवरील विश्वास आणि आपला ध्येयवाद त्यानें अशा गोष्टीनें स्पष्ट केला आहे.

द्रौपदी राजसूययज्ञांत ब्राह्मणांच्या पंक्तींत लाडूसारखें पक्वान्न वाढत असतां तिचे दोन्ही हात गुंतलेले होते. अशा स्थितींत चोळीचें बिरडें

सुटलें. तेव्हां भगवन्ताच्या अनुग्रहानें द्रौपदीला आणखी दोन हात उत्पन्न झाले आणि त्या हातांनीं चोळीचें बिरडें घातलें गेलें. अशा रीतीनें द्रौपदीची फजिती ईश्वरी कृपेनें टळली.

ही अगदीं नवी गोष्ट रचून यांनीं आपल्या मराठी महाभारतांत घातली. मूळ महाभारताला सोडून अशी गोष्ट घालण्याचा याला काय अधिकार ? पण यानें त्याला उत्तर दिलें आहे.— "जरी मूळांत ही गोष्ट नसली तरी ज्यामुळें श्रद्धाभक्ति वाढेल, धर्माचा प्रचार होईल अशी गोष्ट घालण्यास काय हरकत आहे ? तुम्हांला आवडत नसेल तर तुम्ही आपल्या हातानें खोडा.[1] मला ही कथा मूळांत नसली तरी लिहिण्यास हरकत वाटत नाहीं."

ही या ग्रंथकाराची सरळ आणि स्पष्ट वृत्ति ध्यानांत घेतल्यानन्तर हे केवळ भाषान्तर किंवा रूपान्तर करणारे कवि नव्हते; तर स्वतंत्र ध्येय असलेले लोक होते. त्यांना स्वस्थ बसणें अशक्य झालें तेव्हां त्यांनीं कालानुरूप साधनें घेऊन आपल्या तत्वज्ञानाचा प्रचार केला आहे असें दिसून येईल.

**५ रामदास**–( स. १६०८–८२ )

यांचें एकंदर प्रवृत्तिपर आणि व्यवहारकौशल्याची तरफदारी करणारें लिखाण वाचलें कीं, एक प्रकारची स्फूर्ति उत्पन्न होते आणि नेहमींच्या संतवाङ्मयापेक्षां निराळ्या वाङ्मयप्रान्तांत संचार करीत असल्याचा भास होतो. केवळ परमार्थांतल्या अधांतरीं वातावरणांत आपण संचार करीत नसून प्रत्यक्ष व्यवहाराचें स्मरण सारखें जागृत रहातें आणि अन्तर्मुख वृत्ति होऊन आपल्यांतील बऱ्यावाईट गुणदोषांची आलोचना करावीशी वाटते. अशा या व्यावहारिक भूमिकेवरून पारमार्थिक उपदेश करणाऱ्या समर्थांच्या दासबोधांत चवदा प्रकारचें ब्रह्म आणि पंचविध प्रळयांचें

१ जेणें वाढे उत्कट भक्ती । तो तो विशेष लिहिला ग्रंथीं ॥
नावडे तें स्वहस्तीं । खोडोनि दूर करावें ॥ सभा. ९. १६५

जुन्या कोणत्याहि ग्रंथांत न आढळणारें विवेचन आढळतें. जुन्या ग्रंथांत शुद्ध आणि शबल असे दोन प्रकार आढळतात. तसेंच प्रलयाचे चार प्रकार आढळतात पण पांच प्रकारचे प्रलय कोठेंहि आढळत नाहींत. तसेंच समर्थसांप्रदायाचा नित्यनेम, पोषाख व रहाणी हा सर्व प्रकार अगदीं नवा उत्पन्न करणाऱ्या माणसाच्या बुद्धींतील स्वतंत्रपणा लक्षांत घेण्यासारखा आहे.[1]

हे ध्येयवादी असल्यानें यांचें सर्व लिखाण हेतुपुरःसर लिहिलें आहे. निष्फळ कवित्व करण्याला त्यांना सवडच नव्हती. तथापि त्यांच्या श्रीगणपतिस्तवन व शारदास्तवन या प्रकरणांत उच्च कवित्वशक्तीचा आणि कवींच्या सामर्थ्याविषयींचा चांगला प्रत्यय येतो. मनाच्या श्लोकांत प्रचारकी थाटाची, तळमळीची पण साधी भाषा आहे. दासबोधांत मनुष्याचे दोष दाखवितांना त्यांच्या सूक्ष्म अवलोकनाचा चांगला प्रत्यय येतो. सूक्ष्म अवलोकन करून त्याचें शब्दचित्र काढण्याची शक्ति असणें हा कवित्वाचा मुख्य आधार होय. असे दोष दाखवीत असतां समर्थांच्या उमद्या स्वरूपाचें दर्शन घडतें. पण याच्या उलट रामरावण, हनुमानदैत्य, यांचा संबंध आला असतां त्यांचें सात्विक स्वरूप लुप्त होऊन ते एकाद्या कर्दनकाळासारखे भयंकर भासूं लागतात. असत्य आणि पाखंड यांच्या विरुद्ध बोलतांना रुद्रावताराप्रमाणें त्यांचें देहभान नाहींसें होतें आणि भाषाहि तशीच कणखर चीड उत्पन्न करणारी, तोंडाबाहेर पडते. हे असे आत्मविश्वासानें व त्यागानें समाजाच्या उद्धाराकरितां वाङ्मय तयार करण्यास निघाले म्हणून समाजावर त्याचा परिणाम झाला आणि खणखणीत पायावर स्वराज्याची इमारत उभी राहिली. भाषान्तरें, ध्येयहीन आणि आचारभ्रष्ट अशा लोकांनीं निर्माण केलेलें लिखाण हें वाङ्मयपदवीला अपात्र असतें आणि समाजावर त्याचा काडीचाहि परिणाम होत नाहीं.

१ दासबोध दशक सातवा पहा.

६ **महीपतिबोवा ताराबादकर**-( स. १७१५-१७९० )

हे एक दिवस गांवची जोशीकुलकर्णीपणाची वृत्ति सोडून ईश्वरभजनांत काळ घालवूं लागले. भजनादि कार्यक्रम करीत असतां ग्रंथलेखन करण्याचें यांचें मनांत आलें. पंढरीची वारी करण्याची पद्धत चालू होतीच. यांना-तुकोबांनीं येऊन स्वप्नांत सांगितलें कीं, 'नामदेवाची शतकोटी अभंग करण्याची प्रतिज्ञा होती, तीं मीं पुरी केली. आतां संतचरित्रें वर्णन करण्याचें काम त्वां करावें.' हाच तुकोबाचा गुरूपदेश मानून बुवा संतवर्णनाचे कार्यास लागले. या वेळीं बुवा पन्नाशीच्या घराला आले होते.

संतचरित्रें वर्णन करावयाचीं तीं आपल्या पूर्वीचे ग्रंथकार नामाची व उद्धवचिद्धन यांच्या ग्रंथाधारें वर्णन करावीं, असा संकल्प करून हे ग्रंथरचनेस लागले; असें भक्तविजयाच्या प्रारंभावरून दिसतें. प्रारंभींचीं चरित्रें यांनीं त्या ग्रंथावरून उठविलीं. पण ज्ञानेश्वर नामदेवांच्या चरित्रा-करितां प्रचलित असणारी माहिती यांनीं एकत्र केली. नामदेवाच्या तीर्था-वळीच्या अभंगांचा यांनीं भरपूर उपयोग केला. तसेंच दामाजी व भानुदास यांचीं चरित्रें लिहितांना यांनीं त्यांच्या वंशजांकडून माहिती मिळविली. हे वारकरी असल्यानें त्या घराण्यांतलि लोकांशीं यांच्या पंढरीस भेटीगांठी होत असत. तुकाराममहाराज यांचे गुरु; त्यांचें चरित्र वर्णीत असतांना यांची कवित्वशक्ति जागृत झाली आणि प्रतिभेला भर आला. याशिवाय कितीतरी नव्या साधुसंतांना यांनीं प्रसिद्धि दिली आहे. भक्तविजयानंतर संतलीलामृत हा ग्रंथ लिहिला. भक्तलीलामृतांत चांगदेवचरित्र यांनीं त्याचा वंशज शामजी याच्या ग्रंथाधारें लिहिलें. यांचा चवथा ग्रंथ अपुराच आहे. यांनीं ओवीवृत्ताप्रमाणें अभंगवृत्तांतहि संतचरित्रें वर्णिलीं आहेत. याशिवाय यांचे भक्ति वाढविणारे अनेक रसाळ ग्रंथ आहे.

हे त्या कालांतील इतिहाससंशोधक होते. आणि संशोधन रसाळ भाषेंत मांडून लोकप्रिय करण्याची शक्ति यांच्यांत होती. संशोधन योग्य

भार्षेत मांडून लोकांत रूढ करावें लागतें. यांनीं संशोधन करून चरित्रें लिहिलीं आणि ती इतकीं रसाळ व सोपीं लिहिलीं कीं, खेड्यांतील पाटलाच्या चावडीवर आणि हरिजनांच्या वस्तींतसुद्धां या ग्रंथाचीं नित्य पारायणें होत आहेत. यांनीं नाभाजीचें हिन्दीभाषेंतलि ग्रंथ आणि गुजराथीभाषेंतील शनिमाहात्म्य मराठींत आणलें. यावरून यांची महाराष्ट्राच्या बाहेर असलेली दृष्टि दिसून येते. अशी यांची व्यापक व लोकसंग्राहक दृष्टि असल्यामुळेंच यांचे ग्रंथ महाराष्ट्राचे राष्ट्रीय ग्रंथ झाले आहेत.

**७ देवनाथ—**

आपल्याला ठळक ठळक व्यक्तींच्या काव्याचा धावता परिचय घेतांना देवनाथाचें नांव वगळता येणार नाहीं. हा मारुतीचा उपासक असून आपली कविता लिहून ठेवण्याची यांना कधीं आवश्यकता वाटली नाहीं. कीर्तनाला उभे राहिल्यानंतर वाटेल त्या वृत्तांतील आणि त्रोटक तो रस उत्पन्न करणारी कविता यांच्या तोंडून सहज बाहेर पडे आणि यांच्या कीर्तनांत रंग भरे. हे पूर्ण विरक्त होते, हें सांगण्याची आवश्यकता नाहीं. पुढें यांना मिळालेल्या शिष्यांनीं यांची कीर्तनांत सहज बाहेर पडणारी कविता लिहून ठेवल्यानें यांची कविता आज आपणांस वाचावयास मिळते. ती अत्यन्त सरस आहे हें सांगणें नको. सवाई माधवराव पेशव्यांच्या मातोश्री गंगाबाई यांनीं यांचा अनुग्रह घेतला होता. ग्वाल्हेरीस हें कीर्तन करीत असतां मंडपास आग लागली. एक वात्रट श्रोता बोवांना म्हणाला, " नैनं दहति पावकः " तेव्हां हे म्हणाले, 'पाहूं या.' तेव्हां यांनीं ' तुज काय म्हणावें आम्हीं ! दयाळनाथ जगाचा स्वामी ' हें पद म्हणत तेथेंच देह ठेवला ( सन १७७४–१८२१ ). यांची सर्व कविता, कटाव, फटके व पदें या स्वरूपाचीं अत्यन्त रसाळ आहेत.

अगदीं आजच्या कालापर्यंत आमच्यांतलि स्वतंत्र प्रतिभेच्या निर्भय कवींची परंपरा अखंड चालू आहे. आणि त्यांनीं योग्य तेंच बोलून मार्ग-

दर्शन करण्याचें काम चालू ठेवलेलें आहे. या आवर्तीत नुकतेच दिवंगत झालेले वाङ्मयसेवक वामन मल्हार जोशी व के. ल. टेंभुर्णीकर यांचीं नांवें आपल्या डोळ्यापुढें आल्याशिवाय राहणार नाहींत.

संयम, लालित्य आणि संदेशकथन यांचा सुंदर मेळ यांच्या लेखनांत झालेला दिसतो.

---

## प्रकरण १५ वें,

# गोत्र, प्रवर, उपनांवें व वंशावळी

शुद्ध बीजापोटीं । फळें रसाळ गोमटीं ॥—तुकाराम.

**१ गोत्रकार कोण ?—**

ब्राह्मणाला गोत्र आणि एक ते पांच प्रवर असतात. विश्वामित्र, जमदग्नि, भरद्वाज, गौतम, अत्रि, वसिष्ठ, कश्यप हे सात ऋषि आणि आठवा अगस्त्य हे आणि यांचे पुत्रपौत्रादि, गोत्रसंज्ञक किंवा गोत्रप्रवर्तक आहेत.[1] मूळ गोत्रप्रवर्तक ऋषींची संख्या आठच असली तरी यांचे पुत्रपौत्रादि गोत्रप्रवर्तक मानले असल्यामुळें गोत्रप्रवर्तक ऋषींची संख्या अगणित मानलेली आहे. आणि त्याप्रमाणें सध्यां पुष्कळच गोत्रें उपलब्ध होतात.

गोत्रें पाळण्याची पद्धत ब्राह्मणाप्रमाणेंच क्षत्रिय व वैश्य यांच्यामध्येंहि आहे. ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य यांचा वर्णदृष्टीनें भेद असला तरी या

१ कश्यपोऽत्रिर्भरद्वाजः विश्वामित्रोऽथ गौतमः ।
जमदग्निर्वसिष्ठश्च सप्तैते ऋषयः स्मृताः ॥
सप्तानामृषीणामगस्त्याष्टमानां यदपत्यं तद्गोत्रम् ॥ बौ.

तिघांचे गोत्रप्रवर्तक ऋषि वरील आठच आहेत. म्हणजे सर्वांचे गोत्र-प्रवर्तक ऋषि एकच आहेत.

सध्यां शाळेंत घालतांना मुलाचें नांव, गांव व वय वगैरे माहिती पुरवावी लागते. त्याप्रमाणेंच उपनिषद्कालींहि पद्धत होती असें दिसते. सत्यकाम जाबालाची गोष्ट या दृष्टीनें छांदोग्यउपनिषदांत आली आहे.

तो गौतम हारिद्रुमताकडे जाऊन म्हणाला, " मला शिकवा. " तेव्हां गौतमानें त्याला प्रश्न केला ' किंगोत्रोऽसि ' (तुझें गोत्र काय ? ) तेव्हां तो आईकडे येऊन विचारूं लागला, ' आई, आपलें गोत्र काय ? ' तेव्हां आई म्हणाली, ' बाळ, तुझ्या बापाला मी आपलें गोत्र काय, हें कधीं विचारलें नाहीं. त्यामुळें आपलें गोत्र मला ठाऊक नाहीं. माझें नांव जबाला असून तुझें नांव सत्यकाम आहे, एवढेंच जाऊन तूं गुरूला सांग. सत्यकामानें गौतमाला बरोबर तसेंच सांगतांच गौतम म्हणाला, ' तूं ब्राह्मणच आहेस. ब्राह्मणाशिवाय इतकी सत्यनिष्ठा दुसरीकडे कोठेंच आढळणार नाहीं. ' यावरून गोत्र हें कुळ दर्शविणारें आहे हें स्पष्ट होतें.

गोत्रकारांचें एकंदर दहा संघ आहेत. त्यांची उत्पत्ति पुढीलप्रमाणें आहे. भृगु, अंगिरस्, मरीचि आणि अत्रि असे ब्रह्मदेवाला चार पुत्र झाले. आणि यांच्यापासूनच सर्व द्विज पुढें उत्पन्न झाले. भृगूच्या कुळांत [१]जमदग्नि, अंगिरसाच्या कुळांत [२]गौतम व [३]भरद्वाज, मरीचीपासून [४]कश्यप, [५]वसिष्ठ आणि [६]अगस्त्य, अत्रीच्या कुळांत [७]विश्वामित्र; यांना आणि यांच्या वंशांतील शेंकडों लोकांना गोत्रकार अशी श्रेष्ठ पदवी प्राप्त झाली. येथून पुढें यांनीं आपआपल्या कुळांत विवाह करूं नये असा नियम केला. यांच्या पूर्वींच्या कुलाला हा नियम लागू नाहीं. म्हणून गौतम व भरद्वाज किंवा अत्रि व विश्वामित्र हे एका कुळांतले असूनहि त्यांच्यांत परस्परांत विवाह होतात.

याशिवायहि अणखी कांहीं ब्राह्मणकुळें आढळतात. त्यापैकीं विश्वामित्रा-

सारख्यांनीं आपल्या तपःप्रभावानें ब्राह्मण्य मिळविलें आणि आपलें स्वतंत्र गोत्र सुरू न करितां ते भृगु किंवा अंगिरस् गोत्रांत सामील झाले. त्यांना केवलभृगु किंवा केवलअंगिरस् म्हणूं लागले, म्हणून त्यांचें प्रवरसाम्य असूनहि भृगु व अंगिरस् गोत्रीयांशीं विवाह होतात. मात्र केवलभृगु व केवलअंगिरस् वंशांत फक्त विवाह होत नाहींत. कारण प्रवर एक असले तरी वंश भिन्न होत. म्हणूनच इतर गोत्रांत एक प्रवर समान असल्यास विवाह वर्ज्य आहे. पण या दोन गोत्रांत तीनांत दोन व पांचांत तीन प्रवर समान असले तर विवाह वर्ज्य करावा असा नियम आहे.

केवलभृगु चार आहेतः— १ वीतहव्यः २ मित्रयुः ३ शुनकः ४ पार्थः. केवलअंगिरस् सहा आहेतः—१ रथीतरः, २ मुद्गलः, ३ विष्णुवृद्धः, ४ हरितः, ५ कण्वः, ६ संकृतिः एकुण ४+६+८=१८ गोत्रकार आहेत.

याप्रमाणें वंशदृष्ट्या एकंदर ब्राह्मणांचे दहा गोत्रकार संघ ठरतात.

१ जमदग्नि, २ गौतम, ३ भरद्वाज, ४ कश्यप, ५ वसिष्ठ, ६ अगस्त्य ७ विश्वामित्र, ८ अत्रि, ९ केवलभृगु ( १ वीतहव्य, २ मित्रयु, ३ शुनक× ४ पार्थ,× ) व १० केवलअंगिरस् ( १ रथीतर, २ मुद्गल, ३ विष्णुवृद्ध, ४ हरित, ५ कण्व, ६ संकृति× ). यापैकीं × अशी खूण केलेलीं गोत्रें अद्यापि उपलब्ध झालेलीं नाहींत.

यांच्या कुलांतील पुष्कळच व्यक्तींच्या नांवाचीं नवीन गोत्रें सुरू झालेलीं दिसतात. गोत्रकार कोणीं व्हावें यासंबंधीं पूर्वी कांहीं नियम असतील, पण सध्यां ते उपलब्ध नाहींत. प्रवर मात्र एकुणपन्नासच आहेत. त्यांचे गोत्राप्रमाणें दहा गट पडले तर ब्राह्मणांचीं मुख्य दहा कुलें ठरतात.

**२ गोत्र केव्हां उत्पन्न होतें ?—**

गोत्र हें वंशनिदर्शक आहे. गोत्रानें मनुष्य कोणाच्या वंशांतील आहे हें स्पष्ट केलें जातें. वंश ही ईश्वरी देणगी आहे. वंश शुद्ध राखण्याकरितां गोत्र आणि प्रवर यांचा उपयोग करण्यांत येतो. हें गोत्र वंशनिदर्शक

असल्यानें जन्माबरोबर उत्पन्न होतें असें मानलें पाहिजे. गोत्र जन्माबरोबर उत्पन्न होत असल्यामुळेंच लग्नांत मुलीचें गोत्र वाङ्‌निश्चयाच्या वेळीं उच्चारलें जातें. तसेंच लग्नाच्या वेळीं उभयपक्षीं गोत्रप्रवर पाहिले जातात. विवाहविधींतील सप्तपदी झाली कीं कन्येचें गोत्र बदलतें, तोंपर्यंत ती बापाच्या गोत्राची असते. मुलगी दत्तक दिल्यानें तिचें गोत्र बदलतें अशी कांहीं लोकांची समजूत आहे, पण ती बरोबर नाहीं. म्हणूनच दत्तकाला दोन्ही गोत्रें पाळावीं लागतात. मुलीचें दत्त-विधान करण्याची पद्धति जुनीच आहे. कन्यादानाचें पुण्य मिळविण्या-करितां मुलगी दत्तक घेऊन तिचें दान आजहि कांहीं लोक करतात. पण गोत्रान्तर करण्याकरितां असें कन्यादान करणें शास्त्रदृष्ट्या योग्य नाहीं.

पूर्वीच्या काळीं ब्राह्मणाचे क्षत्रिय, क्षत्रियाचे ब्राह्मण वगैरे झाल्याचीं उदाहरणें सांपडतात. गोत्रप्रवरांच्या उत्पादकांताहि तसा इतिहास अस-ल्याचें प्रसिद्ध आहे. त्यावरून गोत्रें हीं कुलदर्शक नाहींत, असें ठरण्या-सारखें नाहीं. पूर्वीच्याकाळीं असें जात्यन्तर होत असे. पण ती चाल भारतीयुद्धानंतर सूत्रकालीं बंद झाल्याचें स्पष्ट दिसतें. तेव्हांपासून आतां-पर्यंत हजारों वर्षांचा काळ गेलेला आहे. मूळ जात्यन्तर किंवा वर्णान्तर केलेल्या ऋषींचा काळ तर फार पुरातन आहे. गोत्रें पाहण्याची रीत जात्यन्तर होत असे तेव्हांहि असेल, कारण गोत्रसंस्थेचा उद्देश कुलसंरक्षण हाच आहे. निदान अलीकडे चार हजार वर्षांत गोत्रसंस्था ही रक्तबीज-शुद्धीच्या दृष्टीनें उपयोगांत आणली आहे. वंशशुद्धि आणि शास्त्र या दृष्टीनें गोत्रसंस्था टिकविणें आवश्यक आहे.

**३ दे. ऋ. ब्राह्मणांतील उपलब्ध गोत्रें व त्यांचे प्रवर—**

(१) अगस्त्य— १ अगस्त्य- दार्ढच्युत- सोमवाह. २ अगस्त्य-दार्ढच्युत-इध्मवाह.

(२) आंगिरस्-आंगिरस-बार्हस्पत्य-भारद्वाज.

(३) अत्रि–आत्रेय–आर्चनानस–श्यावाश्व.

( ४ ) उपमन्यु—वासिष्ठ-ऐन्द्रप्रमद-आभरद्वसु. ( ५ ) कण्व—काण्व-आंगिरस-आजमीढ.

( ६ ) कपि—आंगिरस-आमह्य-औराक्षित. (७) कपिल—आंगिरस–शैन्य-गार्ग्य.

( ८ )कामकायन—१ वैश्वामित्र-माधुछन्दस-आज. २ वैश्वामित्र–आश्मरथ्य-वाधूल.

( ९ ) काश्यप—१ काश्यप-आवत्सार-नैध्रुव. २ काश्यप-आवत्सार-आसित.

( १० ) कुत्स—आंगिरस-आम्बरीष-यौवनाश्व ( ११ ) कौण्डिन्य—१ कौण्डिन्य-मैत्रावरुण-वासिष्ठ. २ वासिष्ठ-मैत्रावरुण-कौण्डिन्य.

(१२) कौशिक—१ वैश्वामित्र-आघमर्षण-कौशिक. २ आघमर्षण-वैश्वामित्र कौशिक.

(१३) गार्ग्य—१ आंगिरस-शैन्य-गार्ग्य. २ आंगिरस-शैन्य-भारद्वाज. ३ आंगिरस-बार्हस्पत्य–भारद्वाज-शैन्य-गार्ग्य.

(१४) गालव—वैश्वामित्र-दैवरात-औदल.

(१५) गौतम— १ गौतम-आंगिरस-औतथ्य. २ आंगिरस-आयास्य. गौतम.

(१६) जामदग्नि—भार्गव-च्यावन-आप्नवान-और्व-जामदग्नि.

(१७) जामदग्न्य वत्स—भार्गव-च्यावन-आप्नवान-और्व-जामदग्न्य.

(१८) देवरात—वैश्वामित्र–कौशिक-औदल. (१९) धनंजय–वैश्वामित्र माधुछन्दस-धानंजय.

(२०) पराशर—वासिष्ठ-शाक्त्य-पाराशर्य. (२१) पूतिमाष–आंगिरस-गौरवीत-सांकृत्य.

(२२) बादरायण—आंगिरस-पौरुकुत्स-त्रासदस्यव. (२३) बाष्कल—

भार्गव-वैन्य-पार्थ.

(२४) भारद्वाज—आंगिरस-बार्हस्पत्य-भारद्वाज.

(२५) भार्गव—भार्गव-च्यावन-आप्नवान-और्व-जामदग्न्य.

(२६) भालंदन—काश्यप--आवत्सार-नैध्रुव. (२७) मधुछंदस्—वैश्वामित्र-माधुछन्दस-आज.

(२८) मित्रयु—भार्गव-वाध्र्यश्व-दैवोदास. ( २९ ) मुद्गल—मौद्गल-आंगिरस-भार्म्याश्व.

(३०) मौनभार्गव–भार्गव-वीतहव्य-सावेदस. (३१) मौनस्—भार्गव-वैतहव्य-सावेदस.

(३२) यस्क—भार्गव–वैतहव्य–सावेदस. (३३) रथीतर—आंगिरस-वैरूप-राथीतर.

(३४) लौहित—( १ ) वैश्वामित्र-आष्टक-लौहित. ( २ ) सांख्यायन-शालाक्ष-लौहिताक्ष.

(३५) वत्स—भार्गव-च्यावन-आप्नवान-और्व-जामदग्नि.

(३६) वसिष्ठ—१ उपमन्यु-कौण्डिन्य-पाराशर. २ वासिष्ठ-ऐन्द्र-प्रमद-आभरद्वसु ३ वासिष्ठ-मैत्रावरुण-कौंडिन्य. ४ वासिष्ठ.

(३७) वाधुल्य—भार्गव-वैतहव्य-सावेदस. (३८) वाध्र्यश्व–भार्गव-दैवोदास-वाध्र्यश्व.

(३९) विष्णुवर्धन—आंगिरस-पौरुकुत्स त्रासदस्यव.

(४०) विश्वामित्र—(१) वैश्वामित्र-आघमर्षण-कौशिक. (२) वैश्वामित्र-आवदल्य-दैवरात. (३) वैश्वामित्र-आघमर्षण-आवदल्य. (४) सौमवत-कामकायन–वैश्वामित्र.

(४१) वैन्य–वैन्य--भार्गव--पार्थिव. ( ४२ ) शङ्ख—आंगिरस-आम्बरीष-यौवनाश्व. (४३) शाकल्य–भार्गव-च्यावन-आप्नवान-और्व-जमदग्नि.

(४४) शाण्डिल्य—१ शाण्डिल-आसित-दैवल. २ काश्यप-आसित दैवल.

(४५) शालंकायन—शालंकायन-वैश्वामित्र-कौशिक.

(४६) शालाक्ष— १ वैश्वामित्र-शालंकायन-कौशिक. २ वैश्वामित्र दैवरात-आवदल्य.

(४७) शुनक—भार्गव-शौनहौत्र-गार्त्समद.

(४८) शैन्यगार्ग्य—आंगिरस-बार्हस्पत्य-भारद्वाज-शैन्यगार्ग्य.

(४९) श्यावाश्व—आत्रेय-आर्चनानस-श्यावाश्व.

(५०) श्रीवत्स—भार्गव—च्यावन—आप्नवान—और्व-जामदग्नि.

(५१) सांख्यायन—१ वासिष्ठ—मैत्रावरुण—कौण्डिन्य. २ आंगिरस—शैन्य—गार्ग्य.

(५२) हरितस्—आंगिरस—आंबरीष—यौवनाश्व.

सर्व प्रवर ऋषिसंबंध दर्शविण्याकरितां अपत्यप्रत्ययान्त उच्चारण्याची पद्धत आहे. त्याला फार थोडे अपवाद आहेत.

अत्रि आणि प्रथमअत्रि अशीं दोन गोत्रें आढळत नाहींत. कांहीं लोक अत्रि गोत्र सांगतात आणि कांहीं लोक प्रथम-अत्रि असें गोत्र सांगतात.

भार्गव आणि मुनि-भार्गव अशीं दोन वेगळालीं गोत्रें सांगणारे लोक आढळतात. भार्गवाचे प्रवर पांच असून मुनिभार्गवाचे तीन आहेत. मुनि-भार्गव हें गोत्र गोत्रप्रवरनिबन्धकदम्बांत सांपडत नाहीं. मुनिभार्गव असें गोत्र नसून मौन भार्गव हें गोत्र असावें.

जामदग्न्य—वत्स, श्रीवत्स आणि वत्स या तिघांचे प्रवर एकच आहेत. श्रीवत्स आणि वत्स हीं दोन गोत्रें जामदग्न्यवत्सापेक्षां वेगळीं समजण्याची पद्धत आहे. अजामदग्न्यवत्स गोत्रहि असलें पाहिजे.

हारितस् व मौनस् हीं दोन गोत्रें हारित व मौन अशीं न उच्चारतां हरि-

तस् व मौनस् अशीं कां उच्चारतात याचीं कारणें सांगतां येत नाहींत.

रथीतर आणि रतीत्र हे एकाच गोत्राचे भिन्न उच्चार दिसतात.

काश्यप व शांडिल्य हीं दोन गोत्रें एका गणांतील असून त्यांच्यांत प्रवरैक्य नाहीं. पण त्यांच्यांत विवाह होत नाहीं.

अगस्त्य (२), कौशिक (२), गार्ग्य (३), काश्यप (२), गौतम (२) लोहित (२), वसिष्ठ (४), विश्वामित्र (४), सांख्यायन (२) असे एका गोत्राचे कंसातील संख्येनुसार अनेक भिन्न प्रवर सांपडतात. पुण्याचे ढेरे हे तर वासिष्ठ हा एकच प्रवर म्हणतात.

सातारा जिल्ह्यांतील अथर्ववेदी ब्राह्मण घराणीं सोयीकरितां ऋग्वेदी झालीं. त्यांच्यांत उपमन्यु, कौशिक, भारद्वाज, भालंदन, श्यावाश्व अशीं पांच गोत्रें होतीं. वरील यादींत भालंदन व श्यावाश्व हीं गोत्रें त्यामुळें अधिक धरावीं लागलीं.

याच पद्धतीनें तेलंगण, कर्नाटक व गोकर्ण वगैरे भागांतील ब्राह्मण महाराष्ट्रांत येऊन देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणांत एकरूप होत असल्यामुळें एकादें या प्रांतांत नसणारें गोत्र वरील यादींत समाविष्ट होणें शक्य आहे.

चित्पावनांत[१] १४, कऱ्हाड्यांत[२] २४, देवरुख्यांत १४ इतकीं गोत्रें आहेत. देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणांची गोत्रावळि करण्याचा प्रयत्न श्री. ज. द. साने, श्री. के. ना. भवाळकर. श्री. श्री. ब. शाळिग्राम, श्री. आचार्य ( अकोला ), श्री. मेहरुणकर वकील ( जळगांव ) यांनीं केला. त्यापैकीं साने व त्यानंतर भवाळकर यांची गोत्रावळी प्रसिद्ध झाली. यानंतर सगळ्यांचे प्रयत्न एकत्र करून व नवीं घराणीं तपासून श्री. शाळिग्राम गोत्रावळी प्रसिद्ध करणार आहेत. हस्तलिखित त्यांच्याजवळ तयार आहे. ती गोत्रावळी एकंदर २००० घराणीं तपासून तयार केली आहे.

---

१ नित्युंदन, बाभ्रव्य हीं दोन निराळीं गोत्रें चित्पावनांत आहेत.

२ नैध्रुव, पार्थिव, लोहिताक्ष हीं गोत्रें कऱ्हाड्यांत निराळीं आहेत.

शुक्लयजुर्वेदी माध्यंदिन शाखेच्या लोकांची गोत्रावळी श्री. वि. त्र्यं. शेटे वकील पुणें यांनीं प्रसिद्ध केली आहे. त्यांत २००० इतकीं घराणीं व १३० गोत्रें आहेत. त्यापैकीं पुष्कळ गोत्रें गोत्रप्रवरनिबंधकदंबांत सांपडत नाहींत. एकंदर लोकसंख्येपैकीं एक तृतीयांश लोक भारद्वाज व काश्यप गोत्राचे आहेत. त्यांत वसिष्ठ, अत्रि व विश्वामित्र गोत्राचे लोक मिसळल्यास तीन चतुर्थांश लोकसंख्या होते. बाकीचे एक तृतीयांश लोक इतर गोत्रांत बसतात.

**४ प्रवरांत येणारे एकूण ऋषि—**

अगस्त्य, आंगिरस्, अज, अजमीढ, अतिथि, अत्कील, अत्रि, अनूप, अप्नवान, अभरद्वसु, अमहीयु, अम्बरीष, अयास्य, अर्चनानस, अष्ट्रादंष्ट्र, आत्मभू, ऋष्टिषेण, इध्मवाह, इन्द्र, इन्द्रप्रमद, इल, उचथ्य, उद्दल, उरुक्षय, उशनस्, उशिज, और्व, कक्षीवत्, कण्व, काति, कथक, कपोतरेतस्, करेणूपाल, कुण्डिन, कुत्स, कुमण्ड, क्रथ, गविष्ठिर, गाधि, गार्ग्य, गृत्समद, गौतम, गौरवीति, घोर, चाष, च्यवन, जमदग्नि, जातुकर्ण्य, ताव्य, तार्क्ष्य, दिवोदास, दीर्घतमस्, देवरात, देवल, देवश्रवस्, धनंजय, निध्रुव, नेमातिथ, पणिक, पराशर, पार्थ, पुत्रिक, पुरोधस, पूरण, पुरूरवस्, पूर्वातिथि, बृहदुक्थ, बृहस्पति, बिजव, बिद, भर्म्याश्व, भार्गव, मंत्रवर, मयोभुव, महेन्द्र, माठर, मातवचस्, मान्धातृ, मित्रावरुण, मुद्गल, मौद्गल, यज्ञवाह, युवनाश्व, रथीतर, रहुगण, राघव, रेभ, रेवण, रोत्थक, रोहिण, लोहित, वत्स, वत्सप्रि, वध्र्यश्व, वसिष्ठ, वामदेव, वाग्भूतक, वामरथ, विरूप, विश्वामित्र, वीतहव्य, वेणु, वेन, शक्ति, शक्र, शाण्डिल, शरद्वत, शाठर, शालङ्कायन, शुक, शिनि, शिशिर, शुङ्क, शुनक, शुन-होत्र, श्यावाश्व, संकृति, साति, साम्भवाह, सवदेस, साहुल, सुमंगल, सोमवाह, सौलद्वारि, हंस, हिमोदक, हिमवर्चस्, हिरण्यरेतस्, हेमवर्भि, हेमवर्च, एकूण १२९.

असे एकंदर एकुणतीस प्रवर आहेत. यांचे एक, दोन, तीन, पांच

अशा गटानें एकूणपन्नास प्रवर असतात. थोडे पाठभेदानें व मतभेदानें वाढतात. हे सर्व प्रवर गोत्रऋषीचे पूर्वज आहेत. ते पिता, पितामह व प्रपितामह अशा क्रमानें न देतां गोत्राच्यापुढें प्रपितामह, पितामह व पिता अशा उलट क्रमानें असतात. हे सर्व प्रवर ऋग्वेदादि ग्रंथांतील मंत्रद्रष्टे असावे लागतात. प्रत्यक्ष पिता, पितामह वगैरेपैकीं कोणी मंत्रकार नसल्यास त्याच्या पूर्वीचा मंत्रकार असेल तो घ्यावयाचा असतो. त्यामुळें गोत्रकाराचे पिता, पितामह व प्रपितामह हे प्रवर असतात हें विधान सामान्यतः बरोबर आहे. तसेंच एका वंशांत गोत्रकार होण्याचा मान अनेकांना मिळाला आहे, पण प्रवर मात्र तेच आहेत. त्यामुळें प्रथमच्या कांहीं गोत्रकारांचे पित्रादि तीन दाखविता आले तरी वंशांतील पुढील गोत्रकारांचे प्रवरऋषि पूर्वज होत. यापेक्षां अधिक जवळचें नातें त्यांना लावतां येणार नाहीं.

शिवाय कांहीं घराणीं एका गोत्रांतून दुसऱ्या गोत्रांत गेलेलीं असतात. त्याप्रमाणें दत्तकासारखेंहि गोत्रान्तराचें कारण असतें. अशा प्रसंगीं दोन्ही गोत्रांचे प्रवर कसे जोडावेत यासंबंधींहि नियम दिलेले आढळतात.[1].

**५ गोत्र व प्रवर यांचा क्रम व उलगडा—**

गोत्रांची संख्या निश्चित नाहीं. पण प्रवर मात्र एकूणपन्नास आहेत. गोत्रकार किती आहेत, हें जरी निश्चित नसलें तरी त्यांचे मूलपुरुष मात्र सप्तर्षि व आठवा अगस्त्य हे निश्चित आहेत. त्यामुळें गोत्र कोणत्या कुळांतील आहे, हें समजण्यास प्रवरांचा उपयोग होतो. क्वचित् ठिकाणीं प्रवर भिन्न असूनहि एका कुलांतील दोन गोत्रें असतात. उदाहरणार्थ, शांडिल्य आणि काश्यप, यांत प्रवरसाम्य नसूनहि ते एका कुळांतील आहेत. प्रवर हे गोत्र ऋषींचे पणजोबा, आजोबा व जनक असे मोजावयाचे असतात. उदाहरणार्थ–अंगिरस गोत्राचे, आंगिरस, बार्हस्पत्य व

१ पूर्वः प्रवरः उत्पादयितुः उत्तरः प्रतिग्रहीतु ॥ प्रवरमंजरी पा. ७३.

भारद्वाज, असे प्रवर आहेत. यांत अंगिरसाचा बाप भरद्वाज, आजा बृह-स्पति, आणि पणजोबा अंगिरस् होय. पणजोबा आंगिरस, आजा बार्हस्पत्य बाप भारद्वाज असे अपत्यप्रत्ययांत जे प्रयोग केले आहेत, ते गोत्र ऋषींशीं संबंध दाखविण्याकरतां केलेले आहेत. वास्तविक हीं नांवें अंगिरस् बृहस्पति, आणि भरद्वाज अशीं असावयास पाहिजेत. पण वंशसंबंध दर्शविण्याकरतां अपत्यप्रत्ययाचा प्रयोग केला आहे. पूतिभाष गोत्राचे आंगिरस, गौरवीत, सांकृत्य असे प्रवर आहेत. अंगिरस-गौरवीति-संकृति व पूतिभाष असा हा वंश आहे असा याचा अर्थ आहे.

हरित गोत्राचे प्रवर आंगिरस–आम्बरीष–यौवनाश्व असे आहेत. त्यांत अंगिरस् हा नव्या कुलांतील व दुसरे दोघे जुन्या घराण्यांतील आहेत. वास्तविक हरित हा कश्यप कुलांतील आहे. त्यानें अंगिरस् कुलाचा स्वीकार केलेला आहे. त्यामुळें असे प्रवर आले आहेत. हा कश्यपकुलांतील असून ब्राह्मणत्व सम्पादल्यावर विश्वामित्राप्रमाणें स्वतंत्र कुल सुरू न करितां अंगिरसांत सामील झाला.

विष्णुवृद्ध किंवा विष्णुवर्धन गोत्राचे आंगिरस–पौरुकुत्स–त्रासदस्यव असे प्रवर आहेत. वंशवेल अंगिरस्–पुरुकुत्स–त्रसद्दस्यु–विष्णुवृद्ध असा होतो. यांत विष्णुवृद्धाचा पिता संभूति हा मंत्रकार नसल्यानें गाळला आहे. आणि आजा, पणजा व ज्याच्या कुलाचा स्वीकार केला त्या अंगि-रसाचा स्वीकार केला आहे.

**६ उपनांवें—**

आपण व्यवहारांत स्वतःचें नांव, बापाचें नांव आणि उपनांव लिहितों. पूर्वी ब्राह्मण वेद, शाखा व गोत्र स्वतःच्या नांवाबरोबर लिहीत असत. वैदिक वाङ्मयांत गोत्रप्रवराचे निर्देश आहेत.[1] तथापि पित्याचें नांव व-

१ त्वं वरुण इति वसिष्ठराजन्यानां परिधानीया आजुहोत इतीतरेषां गोत्राणाम्. (तै. ब्रा. ३.५.२.)

उपनांव वापरलेलें क्वचित् आढळतें.[२] तें खुणेकरितां किंवा सहज ओळख पटावी म्हणून वापरलेलें दिसतें. नांवाबरोबर जोडलेलें दुसरें नांव हें कांहीं ठिकाणीं गुरूचें,[३] कांहीं ठिकाणीं पित्याचें[४] व कांहीं ठिकाणीं उपनांवासारखें[५] खुणेकरितां असतें. मातेचें नांवसुद्धां वापरलेलें[६] आढळतें.

ओळख पटणें, ध्यानांत येणें हें नांवांचें वैशिष्ट्य होय. यांतूनच आडनांव, उपनाम किंवा कुलनाम यांची उत्पत्ति झालेली दिसते.

पौराणिक वाङ्मयांत ऐक्ष्वाक, यादव यासारखीं व्यक्तीवरून पडलेलीं कुलनामें आढळतात. तसेंच पांचाल, वैदेह वगैरेसारखीं उपनांवें देशावरून पडलेलीं दिसतात. बादरायण, द्वैपायन इत्यादि उपनामें स्थलावरून आढळतात. कल्माषपाद, अनपान, सहस्राक्ष वगैरेसारखीं नांवें व्यक्तिगत स्वरूपावरून प्राप्त झालेलीं आहेत. उपरिचर वसु हें नांव तो राजा नेहमीं विमानांत बसून आकाशांत फिरत असे म्हणून प्राप्त झालेलें आहे. कौरव व पांडव हीं नांवें एकाच कुलांतील लोकांना युद्धांतील प्रमुख म्हणून प्रचारांत आलीं. अशीच बार्हद्रथ हें नांव जरासंधाच्या घराण्याला आणि शिशुनाग, कण्व, नंद वगैरे नांवें घराण्यांतील मुख्य पुरुषामुळें पुढें उपनांवासारखीं वापरण्यांत येऊं लागलीं. ऐल, ऐतरेय, जाबाल व मौर्य वगैरे उपनामें मातेच्या नांवावरून प्राप्त झालेलीं आहेत.

मौर्य, गुप्त, गुहिलोत, सोलंकी, चावडा, भोसले, घोरपडे, शिर्के,

---

द्वितीयः प्रयाजः वसिष्ठशुनकानां तनूनपादितरेषां गोत्राणाम्
( तै. ब्रा. १.१.४. )

२ दृति ऐन्द्रोत शौनक; श्वेतकेतु औद्दालकि आरुणेय; इन्द्रोत दैवाप शौनक; बुलिल आश्वतर आश्वि

३ देवामित्र शाकल्य, पुलुष प्राचीनयोग्य, वश अश्व्य.

४ उपकोसल कामलायन, अष्टक वैश्वामित्र.

५ कृष्ण द्वैपायन, उपमन्यु वासिष्ठ. ६ ऐतरेय, जाबाल.

चौहान वगैरे उपनांवें अनेक निमित्तानें अनेक कुलांना प्राप्त झालेलीं दिसतात.

महाराष्ट्रांतील ब्राह्मणलोकांत उपनांवें लावण्याची प्रथा पुष्कळच पुरातन दिसते. ताम्रपटांत[1] व भवभूतीनें आपल्या नाटकांत[2] आपल्या उपनांवाचा निर्देश केला आहे. कऱ्हाड येथें सांपडलेल्या ताम्रपटांत छपन्न ब्राह्मणांचीं नांवें आहेत. त्यापैकीं बावन्न ब्राह्मण देशस्थ ऋग्वेदी आहेत. व सर्वांना उपनांवें लावलेलीं आहेत. हा कऱ्हाडचा ताम्रपट स. १२४९ ( श. ११७१ ) मधील आहे.

पुष्कळ जुने ग्रंथकार ग्रंथांत आपल्या केवळ नांवाचा सुद्धां उच्चार करीत नसतात. मग संपूर्ण नांव लिहिणें दूरच राहिलें. त्याचें कारण विनय किंवा आपल्या ग्रंथाला विद्वानांची मान्यता मिळेल किंवा नाहीं हा संशय असावा.

**७ वंशावळी—**

आमच्या पाहण्यांत आलेल्या वंशावळींत सरदेसाई ( ३५ ), पुणतांबेकर ( २८ ), गिजरे ( २२ ), देशपांडे ( २० ), वगैरे मोठाल्या वंशावळी आज उपलब्ध होतात. त्यापेक्षां अलीकडच्या पुण्याचे शाळिग्राम ( १८ ), मावळांतील म्हसवडे जोशी ( १८ ) वगैरेंच्या वंशावळी मिळ-

---

१ शके ५३४ ( स. ६१२ ) मधील ताम्रपट—वासिष्ठगोत्राय तैत्तिरीयाय तगराधिवासिने चतुर्वेदाय उंबरखेडकुलनामधेयाय ज्येष्ठशर्मणे० । ( इंडि. अँटि. मार्च १९१२ पा. ७२ )

२ महाकवि भवभूतिकृत ' महावीरचरितं ' नाटकांत—अस्ति दाक्षिणापथे पद्मपुरं नाम नगरम्। तत्र केचित् तैत्तिरीया उदुम्बरनामानः प्रतिवसन्ति । भट्टगोपालस्य पौत्रः नीलकण्ठस्यात्मसंभवः श्रीकण्ठपदलांछनः भवभूतिः कविरिति । ( इ. स. ७०० ).

३ भा. इ. सं. मं. इतिवृत्त श. १८३८ ( पान १४२ ).

तात. त्यापेक्षां कमी १४–१५ पिढ्यांच्या बऱ्याच १०–१२ पिढ्यांच्या तर खूप मिळतात. यापैकीं सरदेसाई हे कऱ्हाडे ब्राह्मण असून बाकीचे सर्व देशस्थ ऋग्वेदी आहेत. कागदाचें आयुष्य तीनशें वर्षांपेक्षां जास्त असणें शक्य नसल्यानें जुन्या वंशावळी नक्कल केलेल्या असतात व त्यांचें आरंभींचें साल बहुधा वतनसम्पादनाचें असतें. वंशावळी वतनाकरितां बहुधा संभाळलेल्या असतात. त्यामुळें बायकांची माहिती व नातेसंबंध कळत नाहींत. पिढीचा हिशेब काढतां सरासरीनें पंचवीस वर्षांची पिढी पडते. पार्गिटर वगैरेंनीं काढल्याप्रमाणें १०–१२ वर्षांची पिढी पडत नाहीं.

---

## प्रकरण १६ वें.

# शरीररचना व स्वभाव

### १ शरीररचनाशास्त्र—

हिंदुस्थानांत ब्रिटिशसत्ता दृढमूल झाल्यानंतर येथील लोकवस्तीचा सर्व दृष्टीनें अभ्यास करण्यास शासनकर्त्यांनीं प्रारंभ केला. भारतवर्षांतील लोकसंख्या किती, उद्योगधंदे कोणते, सामाजिक चालीरिती कोणत्या, धार्मिक समजुती, जाती पोटजाती इ. माहिती राज्यकर्त्यांना आवश्यक असल्यामुळें भरतखण्डाच्या प्रादेशिक व भौगोलिक पहाणीनंतर ब्रिटिशांनीं हिंन्दी प्रजेची शिरगणती करून प्रत्येक पोटजातीची सूक्ष्म माहिती मिळवून ग्रंथरूपानें संकलित करून ठेवली आहे. समाजाचा शास्त्रीय अभ्यास करण्यास लागणाऱ्या साधनांची निर्मिति, या गॅझेटियरांचे द्वारें अशा रितीनें प्रथम राज्यकर्त्यांनीं करून दिली आहे.

हिन्दुस्थानांत दर दहा वर्षांनीं करण्यांत येणाऱ्या शिरगणतीचें कार्य तज्ज्ञ व नाणावलेल्या शास्त्रज्ञ अधिकाऱ्यांकडे सोपवण्यांत येत असून त्याचे

वृत्तांत ग्रंथरूपानें अनेक वेळां प्रसिद्ध झाले आहेत. या माहितीचे आधारें आपणांस ब्राह्मणसमाजाची एकंदर संख्या, त्यांची सामाजिक, धार्मिक, आर्थिक परिस्थिति इ. बाबींसंबंधीं बरीचशी उद्बोधक हकीकत कळते.

विशेषतः सन १९०१ मध्यें हिंदुस्थान सरकारनें कांहीं प्रमुख प्रांतांची शरीरमापनशास्त्रदृष्ट्या पहाणी करावी असें ठरवून तें काम निरनिराळ्या अधिकाऱ्यांवर सोपविलें व पहाणीस ४–५ वर्षांचा अवधि नेमून देऊन खर्चाची पण तरतूद केली. मुंबई इलाख्यांतील जाती जमाती पोटजाती यांची माहिती एकत्र करून ती पहाणीप्रमुख मे. एन्थोवेन यांनीं Tribes and Castes of Bombay या ग्रंथाच्या ३ भागांत १९२० ते २३ मध्यें प्रसिद्ध केली आहे. ग्रंथाच्या प्रस्तावनेंत म्हटल्याप्रमाणें ज्या जातींची लोकसंख्या १ लक्षाचेवर आहे, त्यांचा विस्तारानें विचार केला आहे. हें करितांना प्रथम जात, वंश, जमाव (गण) या परिभाषा समजून सांगितल्या आहेत. समान-भाषा, रहाणी आणि धंदे, असणाऱ्या समूहास जाति असें ते संबोधतात; तर एकाच कुलांत निर्माण झालेल्या मानवसंघास ते जमात अगर टोळी (Tribe) म्हणतात. पहिला विभाग सामाजिकदृष्ट्या एका रचनेचा, तर दुसरा उत्पत्तिदृष्ट्या. खेरीज धर्मपंथ (Sect) म्हणून तिसरा वर्गहि मानण्यांत आला आहे.

हिंदुस्थानांत जातीपोटजातींचा उद्गम होऊन त्यांची वाढ कशी झाली या इतिहासाबाबत मतवैचित्र्य असल्यामुळें त्याची चर्चा न करतां आप-सांत विवाह न करणारे गट ह्याच ' जाति ' असें धरून पुढें विवेचन केलें आहे. मात्र जातिभेदाच्या उगमाचीं कारणें देतांना हिंदुस्थानवर भिन्न-भिन्न वंशांचीं आक्रमणें झाल्यामुळें तत्कालीन मूळच्या रहिवाशांनीं आपलें पावित्र्य राखण्याकरितां जातिसंस्थेचा आश्रय केल्याचें म्हटलें आहे. तसेंच विशिष्ट गटांनीं विशिष्ट उद्योगधंदे आत्मसात् केल्यानें धंद्याचें पण जाति निर्माण करण्यांत साहाय्य झालेलें दिसतें. याखेरीज धार्मिक पंथभेद, रहा-

णीच्या भौगोलिक मर्यादा व भाषैक्य हीं कारणें जातिसंस्था वाढवण्याला साहाय्यभूत झाल्याचें मान्य केलें आहे. एवंच स्वत्व राखण्याचा प्रयत्न जितका अधिक काटेकोरपणें करण्यांत आला, तितकी जातिसंस्था अधिक पक्की होण्याचें कार्य झालें असें दिसून येईल.

या पोटजातींचें वर्गीकरण करून त्यांचे गट ठरविण्यास शरीरमापनशास्त्र उपयुक्त होईल असें वाटल्यावरून कांहीं विशिष्ट जमातीच्या व्यक्तींचीं शारीरिक मोजमापेंहि घेण्यांत आलीं. शरीरमापनशास्त्रज्ञांनीं जगांतील मानवांचे शरीरमापनदृष्ट्या ठळक असे आठदहा वर्ग पाडले असून प्रत्येक वर्गाची शरीररचना, रंग, ठेवण व अवयवांचीं मोजमापें व त्यांचीं प्रमाणें ( Indices ) यावरून कुठल्याहि व्यक्तीचा वर्ग निश्चित करणें या मापनशास्त्रामुळें सुलभ झालें आहे. हीं प्रमाणें लावून भारतीय पोटजातींचा अभ्यास व संशोधन केल्यास बरींच निगमनें निघण्याचा संभव ध्यानांत घेतला गेला आहे. परन्तु या कामीं गणितागत पद्धतीनें निगमनें काढण्यास पुरावा विपुल हवा असतो. तितकें कार्य अद्याप झालेलें नाहीं, हें मान्य केलें पाहिजे. खुद्द एन्थोवेन यांनीं सर हर्बर्ट रिस्ले यांनीं घेतलेल्या कांहीं मोजमापांचाच हवाला देऊन त्यांतून निघणारे सिद्धांत कसे एकांगी होतील हें दाखवून दिलें आहे.

अवयवांच्या आकारावरून ठरवण्यांत आलेलीं प्रमाणें दोन प्रकारचीं— १ कपालास्थिप्रमाण, ( Cephalic Index ) २ नासिकाकोण प्रमाण, Nasal Index.

या प्रमाणांवरून मानवजातीचा गट (type) इतर गटापासून वेगळा असा ओळखतां येतो. अर्थात् प्रमुख जागतिक मानवांचे बाबतींत मानवशास्त्रज्ञांनीं व समाजशास्त्रज्ञांनीं हीं प्रमाणें लावून गट ठरविले हें ठीकच झालें; परन्तु पोटजातींचे बाबत या प्रमाणांचा उपयोग करून निगमनें काढण्यांत अनेक धोके आहेत. एकतर हिंदूंच्या पोटजातींत वांशिक भेदा-

सारखे ठळक भेद असणें अशक्यच; व विविधवंशसंकर इतका बेमालूम होऊन गेल्यास मोठा कालहि लोटला आहे. तरी पण बहुतेक समाजशास्त्रज्ञांनीं या पुराव्याचा अवलंब केला आहे, हें तितकेंच खरें. उदा. डॉ. घुर्ये यांनीं स्वतंत्रपणें १०० व्यक्ति ( प्रत्येक पोटजातींतून ) निवडून त्यांचीं मापें घेऊन कोष्टक तयार केलें आहे, तसेंच डॉ. गुह, सौ. डॉ. इरावती कर्वे इ. संशोधकांनीं पण याच पद्धतीनें पुरावे जमा केले आहेत. त्यांच्या संशोधनाच्या निर्णयाची सर्वजण वाटच पहात आहेत.

## २ आपलें शरीर—डॉ. घुर्ये.

डॉ. घुर्ये यांनीं दिलेलें दे. ऋ. ब्राह्मणांचें मोजमापाचें कोष्टक असें—

| कपालास्थि प्रमाण | नासिकाकोण प्रमाण | कापालिक लांबी | का. रुंदी | नासिका लां. | ना. रुं. |
|---|---|---|---|---|---|
| ७७·०९ | ७९·७३ | १८५·५ | १४२·९ | ४८·९ | ३८·८ |

आतां या प्रमाणांनीं गट कसा ठरतो तें पहा. आर्यांचें पहिलें निवासस्थान पंजाब. तेथील जातींचीं मोजमापें आर्य व शक वंशांशीं अधिक जुळतीं असणार. नंतर जसजसें खालीं यावें तसतसा फरक वाढत जाऊन शेवटीं द्रवीड वंशाचीं मोजमापेंच अधिक आढळण्यांत येणार. परंतु रिस्ले यांना वाटतें त्याप्रमाणें सांस्कृतिक दृष्ट्या पोटजातीचा जो क्रम लागतो, तोच क्रम या मोजमापांनीं येतो असें नाहीं. महाराष्ट्रांतच पहा, वर दिलेलीं दे. ऋ. ब्राह्मणांचीं मोजमापें चित्पावन व सोनकोळी या पोटजातींच्या अगदीं जवळ येतात. इतकेंच नव्हे तर फक्त कपालास्थिप्रमाणावर भिस्त ठेवल्यास चित्पावन, देशस्थ व महार एकाच पंक्तींत बसतात. या सहवासांत तो हरिजनसुद्धां चुळबुळ करील ! सारांश, मुंबई इलाख्यांत सामाजिक दर्जा व शारिरीक प्रमाणें यांची सांगड बसूं शकत नाहीं असें दिसून येतें. तसेंच आपला गट शरीरमापनदृष्ट्या हीन गटाजवळ येतो

हें पाहून अधिक जातिबंधनें तीव्र झालीं असावीं हें स्पष्ट होतें.

### ३ आपलें शरीर—रिस्ले

रिस्ले कीन वगैरे विद्वानांचा सिद्धांत असा आहे कीं, नासिकाकोण हें प्रमाण घेऊंन विचार करूं लागल्यास व जातींचा क्रम त्यावरून लावल्यास या जातींचा हल्लींचा सामाजिक उच्चनीच दर्जा ज्या क्रमांत दिसतो; तोच क्रम नासिकाप्रमाणानें सिद्ध करतां येतो. परंतु हा सिद्धांत बरोबर नसल्याचें डॉ. धुर्ये यांनीं दाखवून दिलें असून त्यांचे मतें प्रत्येक भाषिक विभागांत ब्राह्मण हा तेथील इतर रहिवाशांशीं मोजमापाचे बाबत साम्य प्रकट करतो. उदा. रिस्ले यांच्या सिद्धान्तानें पंजाबी अथवा बिहारी ब्राह्मण काय व महाराष्ट्र आणि तामीळ ब्राह्मण काय यांचीं मोजमापें एकच यावयास हवीं. पण तशीं तीं येत नाहींत. तर पंजाबी ब्राह्मण हा इतर पंजाबी जातींशीं जुळता दिसतो व महाराष्ट्रांतील ब्राह्मण हा कुणबी कोळी यांचेजवळ येतो, तेव्हां बेटीव्यवहार आपल्या गटापुरता मर्यादित करून ब्राह्मणवर्गानें तो धडा सर्वांस घालून दिला असें यावरून निघतें. रिस्ले यांचे मतें हिंदुस्थानांत सात शारीर ( मिश्र ) गट आहेत.

| गट | भौगोलिक स्थान | वैशिष्ट्य |
|---|---|---|
| १ तुर्की-इराणी | सीमाप्रान्त, बलुचिस्थान | |
| २ आर्य भारतीय | काश्मीर,पंजाब,राजपुताना, | सरळ नाक व दीर्घ |
| ३ मंगोलीयम | हिमालय, नेपाळ, आसाम, ब्रह्मदेश | कपाळ. |
| ४ द्राविड | लंका, मद्रास, हैद्राबाद मध्यप्रान्त, छोटानागपूर. | रुंद नाक, दीर्घ कपाळ. |
| ५ आर्यद्राविड | युक्तप्रांत, बिहार, राजपुताना | लांबट व मध्यम क. र. |
| ६ मंगोल–द्राविड | दक्षिण बंगाल ओरिसा | रुंद मस्तक, नाक रुं. म. |
| ७ शक– द्राविड | पश्चिम भारत | रुं. क.स्थिव म. लांबनाक |

यापैकीं शेवटच्या गटाला जें नांव देण्यांत आलें आहे त्याचें कारण रिस्ले यांना महाराष्ट्रांतील मराठा जातीचा उगम त्यांच्या रुंद कपालास्थीवरून शकवंशापासून वाटला हें होय. परंतु शक दाक्षिणेमध्यें महाराष्ट्रापर्यंत आले होते, याचा पुरावा उपलब्ध नसल्यामुळें ह्या गटाला केवळ पश्चिमगट म्हणणेंच सयुक्तिक होईल असें घुर्ये म्हणतात. डॉ. हॅडन व चंदा यांचे मतें एक आल्पसवासी वंश चिनी तुर्कस्थानद्वारा भारतांत आला. त्याचें साम्य मराठी व पश्चिम बंगाली जातींत सांपडतें. या सातव्या गटांत कपालास्थि रुंद व विस्तीर्ण आढळतें व नासिकाकोण ७८ चे खालींच असतो.

**४ तुलनात्मक मापें—**

देशस्थ ब्राह्मणांचीं इतर महाराष्ट्रीय पोटजातींशीं तुलनात्मक प्रमाणें—

| | नांव | फरकाचें प्रमाण |
|---|---|---|
| (१) | दे. ब्रा. व सोनकोळी | ·९५ |
| (२) | ,, ,, चित्पावन | १·०२ |
| (३) | ,, ,, महार | १·६१ |
| (४) | ,, ,, कुणबी | १·७३ |
| (५) | ,, ,, शेणवी | २·१० |
| (६) | ,, ,, नागरब्राह्मण | २·५९ |
| (७) | ,, ,, उच्च मराठा | २·६४ |
| (८) | दे. ब्राह्मण व युक्तप्रान्त ब्राह्मण | ३·९४ |
| (९) | ,, ,, बंगाली ब्राह्मण | २·९६ |

**५ वसाहतीचा क्रम—**

दे. ऋ. ब्रा. समाजाविषयीं माहिती देतांना एन्थोवेन म्हणतात—दे. ऋ. ब्राह्मण हे विन्ध्यपर्वताचे दक्षिणेस येऊन देशावर वसाहत करणारे मूळचे लोक होत. ऋग्वेदी ब्राह्मणांत स्मार्त किंवा शैव व मध्व किंवा

वैष्णव असे दोन प्रमुख भेद आहेत. सनातनी स्मार्त व वैष्णवांत विवाह होत नाहींत. परंतु कर्नाटकांत अशी सरमेसळ झालेली पुष्कळच आढळते. मध्वांचे १८ पोट प्रकार असून त्यांतील तीन (सत्यबोध, राजेंद्रतीर्थ, राघवेंद्र ) आपसांत बेटीव्यवहार करतात. मामेबहीण–आतेभाऊ व मामा–भाची असे विवाह या समाजांत होतात. श्राद्धप्रसंगीं ते चित्पावनास जेवावयास घेत नाहींत. उपाध्येपण, लेखनिक, सावकारी, व्यापार, शेतकी हे त्यांचे धंदे होत. कुलकर्णीवतन बहुतेक यांचेकडेच असे. याचकवृत्ति करणारेहि कांहीं लोक आहेत.

### ६ भारतवर्षावर वांशिक आक्रमणें—

भारतवर्षांत मानवी वस्ती केव्हां व कोणाची झाली, नंतर तेथें कोणकोण कसकसे आले हा प्रश्न मनोरंजक पण अवघड असा आहे. याबाबत डॉ. हॅटन यांचें मत सयुक्तिक दिसतें. हिंदुस्थानचे आदिवासी नेग्रिटों होत. त्यांचे मागून पूर्व–आस्ट्रलॉइड वंश हिंदुस्थानांत आला. हल्लींच्या रानटी टोळ्या या वंशाच्या होत. तदनंतर आस्ट्रो–एशियाटिक मानववंशानें भारतांत पदार्पण केलें. हल्लींच्या खेरवारी भाषा बोलणारे समूह यांचे वंशज होत.

नंतर आर्य हिंदुस्थानांत आले. तसेंच द्राविडवंशी पण आर्यांप्रमाणेंच बाहेरून येथें आले. शेवटच्या दोघां वंशांच्या संस्कृति उच्च असून कालौघांत टिकून राहिल्या. पहिले चार मानववंश नाममात्र येथें उरले आहेत. ( दि. मो. हातवळणे )

### ७ स्थूल अवलोकन—

सर्वसामान्य अवलोकनांत देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणांचा विशेष म्हणजे त्यांचा रंग होय. इतरांपेक्षां कातडीच्या विशेष गव्हासारख्या रंगामुळें तो निराळा पडतो. कोकणांत वसाहत करून चारपांचशें वर्षें झालीं. तथापि तेथील देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण कोकणांतील मूळच्या स्थानिक ब्राह्मणांपासून अलग

राहिले व त्यांचा रंगहि अद्यापि निराळा आहे. तसेंच महाराष्ट्राबाहेर वसाहत केलेल्या दे. ऋ. ब्रा. ची रंगाबाबत स्थिति आहे. खुद्द महाराष्ट्रांत प्रत्येक जिल्ह्यांतील काळेपणांत थोडाथोडा फरक आहे. दक्षिण महाराष्ट्रांतील काळेपणा सतेज असून सोलापूर नगरकडील दे. ऋ. ब्राह्मणांचा काळेपणा रुक्ष आणि राख्या असतो. मधूनमधून गोरीं माणसें आढळलीं तरी तो गोरेपणा चित्पावन व कऱ्हाडे यांच्यापेक्षां पिवळसर गोरा असतो. 'सुवर्णकेतकीसम' हें अण्णासाहेब किर्लोस्करांनीं केलेलें वर्णन दे. ऋ. ब्रा. त आढळणाऱ्या गौरपणाला बरोबर लागू पडतें.

चेहेऱ्याचा आकार कर्नाटकाच्या बाजूस उभट आणि तेलंगणाच्या बाजूस वर्तुळ आहे. बाकीच्या भागांत मध्यम प्रतीचा असतो. कर्नाटकाच्या बाजूस गालाचें हाड जरा उंचट आढळतें.

हनुवटी लांबट असण्याचें प्रमाण बरेंच अधिक असतें. डोळे लंबवतुळ, काळे आणि सतेज असतात. केस काळे आणि प्रायः दाट असतात.

शरीररचना एकंदरींत सुदृढ असते. इतर ब्राह्मणांत, शरीराच्या सुदृढपणानें आणि रंगानें दे. ऋ. ब्रा. आपला निराळेपणा स्पष्टपणें व्यक्त करतो.

स्त्रियांच्याहि शरीररचनेच्या बाबतींत वरीलप्रमाणें प्रायः इतरांच्यापेक्षां स्वतंत्रपणा आहे.

८ स्वभाव—

बुद्धिमत्तेच्या बाबतींत हा समाज सर्वश्रेष्ठ असल्याचा त्याला विश्वास वाटतो. उलट बुद्धिमत्तेच्या तेजस्वीपणाबरोबरच सात्विकपणाबद्दल त्याला एक तऱ्हेचा अभिमान आहे.

अत्यंत महत्वाकांक्षीपणामुळें व स्वाभिमानीपणामुळें व्यवहाराकडे पुष्कळ वेळां या समाजांतील लोकांचें दुर्लक्ष असतें.

देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणांना आपल्या श्रेष्ठ संस्कृतीचा अभिमान आहे. रहाणी, बोलणें, व्यवहार या सर्व बाबतींत तो आपणास अत्यंत अभि-

जात समजतो. आतिथ्य, सभ्यता आणि स्वाभिमान याविषयींच्या त्यांच्या कल्पना आदर्श असाव्यात अशी त्यांची अपेक्षा आहे. या बाबतींत त्यांच्यावर आरोप असेल तर तो तारतम्य ठेवीत नाहींत हा आहे. शक्तीप्रमाणें आतिथ्य करण्यास तो केव्हांहि मागें घेणार नाहीं. उलट लौकिकाच्या आशेनें तो अधिकच खर्चवेच करील किंवा त्यागाच्या मर्यादा ओलांडील, अशी त्याच्या मनाची ठेवण आहे. त्याच्या सभ्यतेच्या कल्पनाहि विशेष प्रकारच्या ठरलेल्या आहे. लोकांचा पाणउतारा होईल किंवा वरचढपणा दिसेल असें कोणतेंहि कृत्य करणें हें त्याला सभ्यपणाचें वाटत नाहीं. सर्व समाजांतील लोक जेथें एकत्र जमले आहेत अशा ठिकाणीं आपल्या समाजाचा किंवा वर्गाचा निर्देश शक्य तोंपर्यंत तो टाळील. कोणी असे निर्देश करीत असेल तर शक्य तोंवर त्या व्यक्तीशीं बोलण्याचें टाळील आणि त्या समाजांत भाग घेणेंहि तो कमीपणाचें मानील ! घराच्या बाहेर पडल्यानंतर आपण सर्व एक असून एकमेकांचा निर्देश करतांना थोडाहि उपहासाचा, अवहेलनेचा किंवा चढाईचा सूर निघूं नये अशी त्याची सभ्यतेची कल्पना आहे. असें वर्तन न झाल्यास त्यांचा स्वाभिमान जागृत होतो. हा समाज स्वाभिमानाच्या बाबतींत इतर कोणत्याहि समाजापेक्षां कांकणभर जास्त जागरूक असतो. आपला वंश, आपली संस्कृति, आपली परंपरा आणि आपले आचार हे त्याला अत्यन्त श्रेष्ठ दर्जाचे आणि विचारपूर्वक ठरविलेले आहेत असें वाटतें. रक्तबीजशुद्धतेविषयीं त्याला अत्यन्त काळजी वाटते. वंशशुद्धीकरितां कोणताहि त्याग करण्याची त्याची तयारी आहे. काळाला अनुसरून घडणाऱ्या गोष्टीचें एकदम समर्थन करावयास लावणें आणि पूर्वजांना मूर्ख ठरविणें ही आत्मघातक भूमिका त्याला मान्य नाहीं. कालाच्या ओघांत सर्वांनाच वाहत जावें लागतें हें जरी मान्य करावें लागलें तरी ' गंगा गये गंगादास, जमना गये जमनादास ' ही भूमिका त्याला पसंत नाहीं. विकासात्मक पद्धतीनें स्वत्व न सोडतां जेवढा समन्वय

करतां येईल तेवढा करण्याची त्याची तयारी असते.

प्रामाणिकपणा हा दे. ऋ. ब्रा. हा आपला विशेष गुण मानतात. तो सोडण्याचा प्रसंग येण्यापेक्षां मृत्यूला कवटाळणें त्याला आनन्दाचें वाटतें. तशीं उदाहरणें इतिहासकालापासून आतांच्या कालापर्यंत किती तरी दाखवितां येतात. हा दे. ऋ. ब्राह्मणांचा गुण अनेक प्रसंगीं कसाला लागला आहे. मराठेशाहींत उत्पन्न झालेल्या अनेक आणीबाणीच्या प्रसंगीं विश्वासानें सर्वाधिकार या समाजांतील व्यक्तींकडेच सोपविण्यांत आला होता. त्या व्यक्तींनींहि त्या त्या प्रसंगांतून राज्याचा गाडा यशस्वीपणें राखला आणि अजरामर कीर्ति संपादन केली.

शिवाजीमहाराज आग्ऱ्याला गेले तेव्हांचा आणीबाणीचा प्रसंग घ्या किंवा शिवाजीमहाराजांच्या अखेरच्या दिवसांत औरंगजेबाच्या बादशाही सैन्याशीं सतत तीन पिढ्या आणि तीस वर्षें चाललेल्या आणीबाणीच्या युद्धाचा प्रसंग ध्यानांत आणा. या दोन्ही प्रसंगीं सर्वाधिकारी म्हणून पिंगळे, रामचन्द्र नीळकंठ, यांनींच राज्याचें तारू सुरक्षितपणें पैलतीराला पोंचविलें. पण पेशवाईंतसुद्धां आणीबाणीच्या प्रसंगीं चार वेळां सखाराम-बापू बोकिलांना सर्वाधिकार देऊन राज्यकारभार सांगण्याशिवाय गत्यंतर राहिलें नाहीं आणि प्रत्येक वेळीं या पुरुषानें यशस्वीपणें राज्याचें संरक्षण करून सर्वत्रांकडून वाहवा मिळविली आहे. या प्रसंगीं व्यक्त झालेलें कर्तृत्व, कुशलता आणि प्रामाणिकपणावरील विरोधी माणसांचाहि विश्वास या सर्व गोष्टी त्या व्यक्तीप्रमाणेंच आपल्या समाजालाहि कायमच्या भूषणभूत आहेत. असें सर्वांच्या विश्वासास व आदरास पात्र होण्यासारखें आचरण आपल्या हातून घडावें, मग त्याकरितां कितीहि कष्ट सहन करावे लागले तरी चालतील अशी त्याला स्वभावाच्या बाबतींत शिकवण आहे.

---

## प्रकरण १७ वें,

# आमची भावी दिशा



ब्राह्मणस्य तु देहोऽयं क्षुद्रकामाय नेष्यते ।
कृच्छ्राय तपसे चेह प्रेत्यानन्तसुखाय च ॥

### १ आमची अपेक्षा—

आमची अपेक्षा ब्राह्मण म्हणून जगण्याची आहे आणि ईश्वरानें आमची तेवढी इच्छा पूर्ण करावी अशी अन्तःकरणापासून आमची प्रार्थना असते.

ब्राह्मण शब्द कानावर पडल्याबरोबर हजारों वर्षांचा इतिहास आपल्या-समोर उभा राहतो. विद्येकरितां सर्वस्वावर तुळशीपत्र ठेवणारा आणि त्यागानें जगाला दिपवणारा ब्राह्मणाशिवाय जगांत दुसरा कोण आहे ? आपल्या निर्मळ आचरणानें आणि शुद्ध विचारानें जगाचें लक्ष हजारों वर्षांपासून ब्राह्मणांनीं आपल्याकडे कायमचें वेधून घेतलें आहे. ब्राह्मणांच्या तपश्चर्येला आणि ज्ञानाला जगांत तोड नाहीं. 'अनादि कालापासून निष्कांचन असणारा साधा ब्राह्मण जगांतील सम्राटांना आपल्या पायावर लोटांगण घालावयास लावीत आला आहे. आणि केवळ त्यांच्या आशीर्वादानें सर्व लहानथोर सत्ताधारी आपणांस कृतकृत्य समजत आले आहेत. अशा जगद्वंद्य जातींत आपला जन्म केवळ आपल्या पूर्वपुण्याईमुळेंच झाला आहे, याबद्दल कोणाहि ब्राह्मणाला धन्यताच वाटली पाहिजे, अशी स्थिति आहे.

केवळ या जातींत जन्म झाल्यानें केवढा लाभ आपणांस झाला आहे हें थोड्या विचारान्तीं कोणाच्याहि ध्यानांत आल्याशिवाय राहणार नाहीं.

हजारों वर्षांच्या उज्वल परंपरेचा भरभक्कम तट आपल्या पाठीशीं उभा आहे आणि तो आपणांस आत्मविश्वास आणि ध्येयवाद यांची प्रेरणा देण्याचें काम अखण्ड करीत आहे.

जन्मापासून उदात्त विचार आणि उत्कृष्ट संस्कार ब्राह्मणांच्या पुढें हात जोडून उभे आहेत आणि लोकांना ब्राह्मणांच्यापुढें 'हात जोडा' म्हणून जणूं काय इषारा करीत आहेत.

वेद आणि उपनिषदें किंवा स्मृति आणि पुराणें हे ब्राह्मणाची बंदि-जनाप्रमाणें सतत प्रशंसा करीत आहेत आणि 'उत्कट भव्य तेंचि करावें, मळमळीत अवघेंचि टाकावें' असा संदेश देऊन अन्तःकरणांत उत्साह निर्माण करीत आहेत.

एखाद्या घराण्यांत हजारों वर्षें संपत्ति केवळ जमतच जावी आणि खाजिन्यांत अमाप संपत्ति एकत्र व्हावी तसें खरोखर ब्राह्मणांचें वैभव-शाली दैव आहे. या आणि अशा किती तरी गोष्टींमुळें ब्राह्मणांच्या भाग्यशाली इतिहासाला जगांत तोड नाहीं अशी एकंदर स्थिति आहे.

अशी ही उज्वल परंपरा मागें असल्यामुळेंच सध्यांच्या ब्राह्मणांवरची जबाबदारी वाढलेली आहे आणि सध्यांच्या ब्राह्मणांच्या अन्तःकरणाला जर कोणचें दुःख असेल तर हेंच आहे कीं, माझ्या पूर्वपरंपरेला साजेल अशा पद्धतीनें मी कसा जगूं शकेन ! जेवढी परंपरा मोठी तेवढी ती संभाळण्याची काळजी जास्त. केवळ जगण्यामरण्याचा प्रश्न नाहीं, तर परंपरेला शोभेल अशा पद्धतीनें आचार, विचार आणि सन्मान या तीनहि बाबतींत जगतां आल्यास तें जीवन ब्राह्मणास पाहिजे आहे. नाहींतर तो 'असुनि जिवंतहि मेला' असाच समजावयास पाहिजे. परंपरेला न शोभेल अशा जगण्याचा ब्राह्मण मनापासून तिटकारा करतो. ब्राह्मणाला धन नको आहे—मान पाहिजे आहे ! ब्राह्मणाला गाद्यागिरद्या नको आहेत—विद्या पाहिजे आहे ! ! ब्राह्मणाला सद्दी नको बुद्धि पाहिजे आहे !

या पद्धतीनें कसें जगतां येईल हीच ब्राह्मणांची चिंता आहे-विवंचना आहे.

ब्राह्मणाला ब्राह्मण म्हणून जो अतिशय मोठा सन्मान प्राप्त झालेला आहे त्याचीं कारणें-त्याचा सदाचार, वंशशुद्धि आणि लोकसेवा करण्याची उत्कट इच्छा यांमध्यें सांपडतील.

**२ सदाचार—**

आचार, व्रतें, नेम यांना नांवें ठेवण्याची प्रवृत्ति सध्यां वाढती आहे. आणि कोणतेंहि बंधन न पाळतां बेछूटपणें वागणाराचें कौतुक करण्याची रीत पडत आहे. पण ही प्रवृत्ति अत्यंत घातक आहे. ब्राह्मणांना आजहि मान देण्याची प्रवृत्ति कमी झालेली नाहीं याचें कारण ब्राह्मण हा हिंदु-समाजांतील कोणाहि जातीपेक्षां अजूनहि अधिक कर्मठ, अधिक नेमिष्ठ आणि अंगिकारलेल्या कर्तव्यांत सर्वांपेक्षां अधिक तन्मयतेनें एकनिष्ठ राहणारा आहे हें होय. ब्राह्मणांना आपला मोठेपणा टिकवावयाचा असेल तर येथून पुढें त्यांनीं आपलें सदाचाराचें, त्यागाचें आणि सेवेचें व्रत संभाळण्याची दक्षता घेतली पाहिजे. तरच त्यांचा मोठेपणा टिकूं शकेल, व समाजाला त्यांना मान दिल्याशिवाय गत्यंतर राहणार नाहीं. त्याग, सेवा आणि तपश्चर्या यांच्या पुढें नम्र झाली नाहीं अशी एक तरी शक्ति जगांत आहे काय ? बंधनाच्या पलीकडे जाऊन बेछूटपणें वागणारे आणि तसें वागण्यास तरुणांस उत्तेजन देणारें लोक राष्ट्राचे शत्रु आहेत असें म्हटल्याशिवाय राहवत नाहीं. अशा लोकांनीं जगाचें कल्याण केल्याचा इतिहासांत दाखला नाहीं.

अहिंसा, सत्य, अस्तेय, अन्तर्बाह्य स्वच्छता, संयम, बुद्धि, धैर्य, विद्या, शान्तता वगैरे सदाचारानें मिळवतां येणारे गुण आपल्या समाजांतील स्त्रीपुरुषांत मोठ्या प्रमाणांत आढळतात. आनुवंशिक संस्कारानें हे गुण आपल्या समाजानें कमावलेले आहेत. ते गमावले जाऊं नयेत,

अशी तरतूद करणें आवश्यक आहे. जगांत मोठालीं कार्यें ज्यांच्या हातून घडलीं त्यांच्या अंगांत वरील गुणांचें आधिक्य आढळून आलेलें आहे. या गुणांशिवाय मोठीं कार्यें आरंभण्याला किंवा पार पाडण्याला आवश्यक असणारा आत्मविश्वास व नैतिक बळ पैदा होणें शक्य नसतें. बाह्य संपत्ति, ऐश्वर्य, मोठेपणा, किंवा सत्ता यांपेक्षांहि आम्ही या गुणांना अत्यंत महत्व देत आलेले आहोंत. केवळ या गुणांच्या जोरावर सर्व सत्ता आपल्या पायांवर लोटांगणें घेत आमच्याकडे येतील याबद्दल आम्हांस संशय वाटत नाहीं. म्हणून आम्हांस प्रथम हे गुण असणारा ब्राह्मण राहावयाचें आहे. आणि ब्राह्मणांचें जें परमोच्च ध्येय तें संपादण्याचा प्रयत्न करावयाचा आहे.

आचाराचे दोन भाग आहेत. धर्मग्रंथानें सांगितलेले संस्कार, नित्यकर्म व कांहीं विशेष प्रकारचे नियम वगैरे आचार हे बाह्य स्वरूपाचे असतात त्यांचें महत्व मनावर संस्कार करणें, शरीराला विशेष प्रकारचें वळण लावणें, आणि परंपरेनें आलेल्या धर्माची ओळख पटवणें हें असतें. पण या सर्वांपेक्षां मानसिक संस्कारांची थोरवी अत्यंत मोठी मानली जाते. हे मानसिक संस्कार किती झाले आहेत हें अजमावण्याचें साधनहि आम्हांला सांगून ठेवलेलें आहे. प्रत्यक्ष प्रसंग आला असतां मनुष्य कसा वागतो हें तें साधन होय. प्रत्यक्ष वर्तन, हा मनुष्याच्या अंतःकरणाची किती प्रगति झाली आहे, हें दर्शविणारा आरसा होय. मनांत चडफडणें, दुसऱ्याचें वाईट चिंतणें, अपशब्द बोलणें, किंवा एखाद्यावर सहज हात टाकणें हें अहिंसातत्त्व मनांत न भिनल्याचें स्पष्ट चिन्ह आहे. याचप्रमाणें सत्याबद्दल काटेकोरपणा नसणें, दुसऱ्याची लहानमोठी वस्तू न विचारतां घेण्याबद्दल किंवा परत देण्याबद्दल चालढकल असणें, जिव्हा, नेत्र, कान, वगैरेंनीं होणाऱ्या सुखाबद्दल संयम नसणें वगैरे वर्तन मानसिक हीनतेचें स्पष्ट चिन्ह होय. अशा दोन्ही प्रकारच्या आचारांबाबत ब्राह्मणानें अत्यंत

दक्ष रहावयास पाहिजे, आणि आपला श्रेष्ठपणा समाजाच्या मनावर असा बिंबवून टाकला पाहिजे कीं, सर्व लोकांचा त्यावर पूर्ण विश्वास असावा-! म० गांधी खोटें बोलणार नाहींत, हें त्यांचा शत्रुसुद्धां कबूल करतो. तसा ब्राह्मण म्हटला कीं, प्रामाणिकपणा, सत्यनिष्ठा, अहिंसा, सदाचार, विश्वास यांचा पुतळा लोकांच्यापुढें उभा राहिला पाहिजे ! यालाच आचार, किंवा सदाचार म्हणावयाचें. या किंवा अशाच लहान-मोठ्या प्रसंगांत प्रगट होणाऱ्या मानसिक प्रेरणेवरून मनुष्य किती योग्यतेचा आहे हें चटकन स्पष्ट होतें. म्हणूनच ब्राह्मणांचें ब्राह्मणत्व हें बाह्य वर्तनापेक्षां आंतरिक प्रेरणेवरून पारखावयाचें असतें. बाह्य आचार, नेम, व्रत वगैरेंचें अत्यंत कटाक्षानें पालन करावयाचें असतें, याचा हेतुसुद्धां अन्तःकरणांत शमदमादि बाणावेत हाच असतो.

**२ वंशशुद्धि—**

वंशशुद्धि राखावी असा आपला कटाक्ष आहे. आपल्या समाजांतील जाति या वंशशुद्धीच्या तत्त्वावर उभारलेल्या आहेत. हिंदुसमाज हा जातिघटित आहे हें म्हणणें अगदीं यथार्थ आहे. प्रत्येक जात ही स्वतंत्र असून ती विवाहदृष्ट्या अगदीं स्वतंत्र असते. ब्राह्मण हा हिंदुधर्मांतील बहुतेक जातींत विवाह लावण्याकरितां आवश्यक म्हणून सन्मानानें बोलावला जातो. पण विवाहविषयक अन्तर्गत घडामोडींत जातींतील लोकांशिवाय इतरांना ढवळाढवळ करण्याचा अधिकार नाहीं. अशी जात ही हिंदुधर्मांतील संस्था, वंशशुद्धीच्या तत्त्वावर उभारलेली आहे. प्रत्येक मनुष्याला आपल्या जातीचा अभिमान असतो आणि शक्य तोंवर आपली जात शुद्ध राखण्याचा अत्यंत कटाक्षानें प्रयत्न केला जातो.

पोटजाती निर्माण करण्याचीं जीं अनेक कारणें आहेत, त्यांत वंशशुद्धि राखण्याची तीव्र इच्छा हें एक अत्यंत महत्त्वाचें कारण आहे. पोटजात किंवा जात यांचा अर्थच आपसांत विवाह करणारांचा गट असा आहे.

विवाह आणि मैत्री, समान पातळींत राहणाऱ्या लोकांमध्येंच होऊं शकते आणि ही समानता केवळ बाह्य राहणीवरून ठरविण्यापेक्षां वांशिक पद्धतीवर ठरविणें शेवटीं आवश्यक असतें. कारण विवाह हा उत्तम प्रजा निर्माण करण्याकरितां असतो.

इतर प्राण्यांच्याप्रमाणें मानव प्राण्यांतसुद्धां अनेक जाती आहेत. त्या जातींच्या बाह्य रंगरूपाप्रमाणेंच आन्तरिक शरीररचनेंतसुद्धां फरक असतो. कातडीचा रंग जसा वरून भिन्न आढळतो, तशी कातडीची रचनासुद्धां निरनिराळी असते असें सूक्ष्मदर्शक यंत्रानें सध्यां पाहतां येतें केसांच्या अंतर्गत रचनेचा भाग निराळा आढळतो. नाक, डोकें, जबडा यांच्या हाडांत स्पष्टपणें फरक दिसून येतो. आणि गुणांच्या दृष्टीनें सुद्धां जातींत फरक आढळून येतो.

प्राणिसृष्टींत सुद्धां हाच प्रकार आहे. एक कुत्रा घेतला, तर त्याच्या शेकडों जाती आपणांस आढळतात व त्यांच्या रचनेंतील व गुणांतील फरक आपणांस स्पष्टपणें पाहतां येतात. अगदीं तशीच स्थिति मासे, कोंबडे, घोडे, ससे, हरिण वगैरे प्राण्यांची आहे.

या प्राण्यांच्या वंशांत संकर केल्यास दोघांचेहि गुण नाहींसे होतात आणि अल्पायुषी, निर्गुण, निर्बुद्ध व संतति निर्माण करण्यास असमर्थ अशी त्यांची प्रजा होते असा एकंदर प्राणिशास्त्रज्ञांचा सिद्धांत आहे. युरोपांतील आरंभीं वसाहतीकारितां बाहेर पडलेल्या लोकांनीं ज्या देशांत वसाहती केल्या तेथें त्यांनीं स्थानिक लोकांच्या स्त्रियांशीं विवाह केले. त्याचा परिणाम अत्यन्त अनिष्ट झालेला आहे. युरोपमधील पोर्तुगीज, स्पॅनिश वगैरे लोकांचे रंग, रूप व गुण नाहींसे झालेच, पण ज्या स्थानिक लोकांच्या स्त्रियांशीं संबंध केले त्यांचेहि मूळचे गुण अजिबात नष्ट झाले आणि अत्यन्त हिणकस अशी प्रजा निर्माण झाली.

भिन्न जातींत विवाह करूं नये, सजातीयांत विवाह व्हावेत असे नियम

करण्यांतील आमच्या धर्मशास्त्रज्ञांचा हेतु काय असावा हें वरील विवेचनावरून स्पष्ट होईल.

धर्मशास्त्र व रूढि यांनीं ब्राह्मणांनीं क्षत्रियादिकांशीं विवाह करणें किंवा क्षत्रियादिकांनीं ब्राह्मणादिकांशीं विवाह करणें ( अनुलोम किंवा प्रतिलोम दोन्ही विवाह ) त्याज्य ठरविलें व शेवटीं सजातीय स्त्रीशीं विवाह करावा असा आदेश दिला. सजातीय याचा अर्थ परंपरेनें ज्याच्याशीं आपला विवाह होतो अशा जातीशीं विवाह करावा असा केला. अशा पद्धतीनें वंशशुद्धीकरितां विवाहाचें क्षेत्र संकुचित करण्यांत आलें. आणि त्याप्रमाणें वंशशुद्धीबद्दल ब्राह्मणांतील प्रत्येक पोटजातीस व विशेषतः आपणांस अभिमान वाटेल अशी आजपर्यंतची आपली परंपरा आहे.

आतां मात्र वधूवरांची वयोमर्यादा कायद्यानें वाढविल्यामुळें विवाहसंस्था प्रौढांच्या हातून विकारसुलभ अशा तरुणांच्या हातांत जात चालली आहे. त्यांचें लक्ष वंशशुद्धीसारख्या प्रश्नापर्यंत पोंचत नसल्यानें भिन्न जातीय विवाह होण्याचा सुद्धां धोका उत्पन्न होऊं लागला आहे. कायद्याचाहि त्यांना पाठिंबा मिळत असल्यानें खरोखर सर्वच हिंदुसमाज व विशेषतः आपला ब्राह्मणसमाज या संकटानें अत्यन्त हादरलेला आहे. दिंडी खिडकी उघडण्याची खटपट चालू असतां तटालाच खिंडार पडलें अशी स्थिति झाली आहे—!

हजारों वर्षे प्राणापलीकडे आपण वंशशुद्धीची जोपासना केली आहे. केवळ वंशशुद्धीकरितां अत्यंत प्रिय असणाऱ्या स्त्रीपुरुषांचा नाश आपण उघड्या डोळ्यानें पाहून सहन केला आहे आणि वंशशुद्धि राखली आहे. येथून पुढेंहि वंशशुद्धि रक्षण करण्याचें सामर्थ्य ईश्वर आम्हांला देईल याबद्दल आमचा विश्वास आहे. इतर गोष्टी नष्ट झाल्या तर पुनः संपादन करतां येतात पण वंशशुद्धि ही एकच बाब अशी आहे कीं, ती एकदां नष्ट झाली कीं पुनः मिळविणें शक्य नाहीं.

### ४ लोकसेवा—

ब्राह्मणांचें वैशिष्ट्य सांगतांना सदाचाराचा आग्रह, वंशशुद्धीवर कटाक्ष या दोन गोष्टींच्या महत्वाबरोबरच लोकसेवेचाहि प्राधान्यानें उल्लेख करावयास पाहिजे! नीति, धर्म, संस्कृति व विविध विषयांतील ज्ञानाबरोबरच त्यागपूर्वक निष्ठेनें लोकसेवा करीत राहणें, ब्राह्मण आपलें कर्तव्य समजतो. तशीच शिकवण त्याला जन्मापासून मिळत असते. त्यामुळें ब्राह्मणांचें लोकसेवा हें आनुवंशिक व्रत होऊन बसलें आहे. आपल्या मिळकतींत गाय, देव, राष्ट्र यांचा हिस्सा आहे, ही गोष्ट प्रत्येक ब्राह्मण आपल्या रोजच्या वर्तनानें सिद्ध करीत असतो.

मधुकरी मागणारा ब्राह्मणसुद्धां आपल्या रोजच्या भिक्षेंतून गोग्रास काढण्यास विसरणार नाहीं. अशी एकंदर आपल्याला शिकवण आहे. त्या जोरावरच ब्राह्मणांनीं अजातशत्रुत्व संपादन केलेलें आहे. या कृतीनें संपादन केलेल्या लौकिकाच्या जोरावर पूर्वीच्या काळीं ब्राह्मण कोठेंहि गिरिकंदरीं निर्भयपणें एकान्तांत एकटा झोपडी बांधून ध्यानधारणा करीत राहूं शके व आपल्या निर्मल चारित्र्यानें आणि निर्लोभ लोकसेवेनें राजेमहाराजांनाहि धाकदरारा उत्पन्न करूं शके.

एका चित्रकारानें आश्रमाचें चित्र मोठ्या मार्मिकपणानें पण स्पष्ट काढलेलें आपण पाहतों. त्यांत उघड्या जागेवर प्रवचन चालू असतां साध्या भस्मकमंडलुधारी बटूंपासून तों राजेमहाराजांपर्यंत सर्व दर्जाचे लोक आपला लहानमोठेपणा विसरून साध्या आसनावर विनीत वेषानें प्रवचन ऐकत असतात! केवळ माणसें तेथें स्वभाव विसरून एकाग्रतेनें प्रवचन ऐकण्यांत-तन्मय होतात असें नव्हे, तर पशुपक्ष्यांची सुद्धां तशीच स्थिति झालेली असते. गाईशेजारीं वाघ, मोराशेजारीं सर्प तेथें तन्मयतेनें बसलेले आढळतात! हें मार्मिक काव्यमय चित्र ब्राह्मणांनीं लोकसेवेनें काय संपादन केलें होतें व लोकसेवा ही काय संपादन करूं शकते याचें

उत्तम दिग्दर्शन करणारें आहे ! पूर्वींच्या थोर ब्राह्मणांनीं केलेल्या त्यागाचा आणि लोकसेवेचा मोबदला सन्मानाच्या रूपानें आज आपणांस मिळतो आहे. अशी लोकसेवा मधल्या काळांतहि आपल्या समाजानें बजावलेली आहे.

धर्मावर संकट उत्पन्न झालें असतां साधुसन्तांच्या रूपानें कोण पुढें आले ? आपल्या काव्यमय वाणीचा राष्ट्राला प्रेरणा देण्याकरतां उपयोग करणारे कोण होते ? प्रसंगीं तलवार धारण करूनहि धारातीर्थी देह कोणीं ठेवले ? एवढेंच नव्हे तर आतांच्या कालांत स्वातंत्र्याकरितां फासावर लटकण्याचे चमत्कार दाखविणारे सेनापति तात्या टोपे यांच्यानन्तर राजगुरु, पिंगळे यांचीं नांवें आपल्या कानांवर आलीं नाहींत काय ? जो मार्ग स्वतःच्या बुद्धीला पटेल त्याप्रमाणें प्रत्यक्ष वागण्यास मागें पाहाणारा आपला समाज नाहीं. मग तो मार्ग कितीहि खडतर असो. अशी एकंदर लोकसेवेच्या बाबतींतील वृत्ति ती आपण पुढें चालविण्याचें कर्तव्य बजावलें पाहिजे !

**५ उपजीविका—**

समाजांतील आपलें स्थैर्य आपल्या उपजीविकेच्या साधनावर अवलंबून असतें. उपजीविकेची स्थिर व्यवस्था असल्याशिवाय आपण आपलें काम निश्चिन्तपणें करूं शकत नाहीं. आणि निश्चिन्तपणा असल्याशिवाय, असावें तितकें परिणामकारक तेज आपल्या व्यवहारांत निर्माण होत नाहीं. आणि तेजस्वीपणा नसल्यास कोणतेंहि कार्य परिणामकारक होत नाहीं. एवढ्याकरितां आपल्या उपजीविकेचा प्रश्न सामान्यपणें सुटलेला असला पाहिजे.

शेतकी, नोकरी आणि ( लोक ) या तिघांच्या साहाय्यानें आपली उपजीविका चालत असते. अन्न, धन, ज्ञान आणि मान असें चार प्रकारचें अन्न आपल्या प्रकृतीला आवश्यक ठरलेलें आहे. केवळ पार्थिव अन्नावर आमची उपासमार होते.

केवळ शेतकी भरपूर असल्याशिवाय उपजीविकेला सतत पुरेशी होत नाहीं. भरपूर शेतकी फारच थोड्यांना लाभते. ती लाभली तरी लोक व सरकार यांच्या साहाय्यानेंच ती यशस्वी होते. शेती करणारा जवळजवळ सहा महिने बेकार असतो. त्याला दुसऱ्या धंद्याची जोड असली तरच बरकत येते. शेती स्वतः कसण्यास फार मेहनत लागते व अशी स्वतः शेती करणारा इतर बौद्धिक कामें करण्यास अपात्र होत जातो. म्हणून ब्राह्मणांनीं शेती ठेवावयाची पण स्वतः कसावयाची नाहीं, असेंच धोरण ठेवावें लागतें. पण गांवाशीं संबंध राहण्याकरितां, आरोग्याकरितां, उपजीविकेचें एक साधन म्हणून आवश्यक असलेली शेती अपूर्ण म्हणून अजिबात नाहींशी करणें बरें नव्हे !

शेतीबरोबर सत्तेशीं संबंध उत्पन्न करणारी लहानमोठी नोकरी ही सन्मानानें जगण्यास अत्यन्त आवश्यक असते. नोकरी ही केव्हांही सर्वांना मिळणें शक्य नसतें. तथापि नोकरी ही टाळून भागत नाहीं. सत्ताकेंद्रें, द्रव्यकेंद्रें आणि जगांतील ज्ञानाचे नवे प्रवाह ज्या ठिकाणीं रोज येऊन पोंचतात तीं ज्ञानकेंद्रें यांच्याशीं आपला कोणत्या तरी मार्गानें अखंड संबंध पाहिजे. त्याशिवाय आपण जगाच्या चालू पातळीवर राहूं शकत नाहीं. चालू पातळीवर आपण असल्याशिवाय आपण समाजांत सन्मान्यतेनें राहूं शकत नाहीं. म्हणून आपला संबंध व्यक्तिशः किंवा परंपरेनें नोकरीच्या द्वारा सत्तेशीं असलाच पाहिजे.

मनुष्याची उपजीविका केवळ अन्नावर होत नाहीं तर त्याला मानाची जोड असावी लागते. आणि अन्न आणि मान हे मिळण्यास धनहि लागतें. या तिहींचा समन्वय आपणांस साधला तरच आपण उपजीविका योग्य प्रकारें करूं शकतों असें ठरेल. यापैकीं एकहि कमी झाल्यास आपली उपजीविका नीट चाललेली नसून आपण कसें तरी आयुष्य कंठतों आहोंत असा त्याचा अर्थ होईल.

मधल्या काळांत शेतकीच्या द्वारा मुबलक अन्न, जोशी कुळकर्णी वगैरे वतनांच्या द्वारा गांवांतील सामान्य माणसापासून ते सरकारी अधिकाऱ्यांशीं असणाऱ्या संबंधामुळें धन, गांवांत घरीं उतरावयास येणाऱ्या लहानमोठ्या अधिकाऱ्यापासून ते कीर्तनप्रवचनकारांच्या सहवासामुळें बहुश्रुतता व ज्ञान आणि या सर्वांमुळें लोकांत साहजिकच मिळणारा मान यामुळें समाजांत ब्राह्मणाची उपजीविका मोठ्या सन्मानानें होई.

सध्यांच्या काळांत गांवांतल्या ब्राह्मणाला उठविण्याचा कायदेशीर प्रयत्न होत आहे. सरकारी नोकरींतूनहि त्याचें पद्धतशीर उच्चाटन चालू आहे. तथापि लोकशाहींतील नवीन सत्ताकेन्द्रें निर्माण होत आहेत. तसेंच लोकसेवेचीं आधुनिक साधनें हाताळण्याच्या बाबतींत आमची आनुवंशिकता आम्हांस साहाय्य केल्याशिवाय राहणार नाहीं, ज्ञानकेन्द्रांतहि अग्रेसर राहण्याकरितां आम्हांला सर्वांच्या बौद्धिक शर्यतींत सामील झालें पाहिजे. सर्वच आघाड्यांवर आम्ही चमकत राहिल्यास मानहि आमच्यामागें आपोआपच येईल. अशा रीतीनें आमच्या प्रकृतीला आवश्यक असणारें अन्न, धन, ज्ञान आणि मान असें चतुर्विध अन्न प्राप्त झाल्याशिवाय रहाणार नाहीं. आणि ब्राह्मण म्हणून आम्ही चिरकाल जगांत नांदूं शकूं.

श्रीसमर्थांच्या पुढील शब्दांनीं आम्ही वाचकांचा निरोप घेतों—

ऐका सदैवपणाचें लक्षण । रिकामा जाऊं नेदी क्षण ॥
प्रपंचवेवसायाचें ज्ञान । बरें पाहे ॥
कांहीं मिळवी मग जेवी । गुंतल्या लोकांस उगवी ॥
शरीर कारणीं लावी । कांहीं तरी ॥
ऐसा जो सर्व सावध । त्यास कैसा असेल खेद ॥
विवेकें तुटला संबंध । देहबुद्धीचा ॥
आहे तितुकें देवाचें । ऐसें वर्तणें निश्चयाचें ॥

मूळ तुटे उद्वेगाचें। येणे रीती ॥
प्रपंचीं पाहिजे सुवर्ण। परमार्थीं पंचीकरण॥
महावाक्याचें विवरण। करितां तुटे ॥
कर्म उपासना ज्ञान। येणें राहे समाधान॥
परमार्थाचें जें साधन। तेंचि ऐकत जावें ॥ ( दास. ११-३ )

---

## परिशिष्ट पहिलें–आमच्या संस्था.

### १ पुण्याची संस्था—

आपला समाज प्रायः जोशी कुलकर्णी, शेतकरी आणि सावकारी करणारा आहे. मराठेशाहीच्या अखेरीस त्याला मुख्य राज्यसत्तेच्या केंद्रापासून दूर राहणें सोयीचें वाटत असावें. तसेंच परक्या राजसत्तेशीं एकरूप होण्यालाहि ते तत्पर नव्हते, त्यामुळें प्रारंभीं इंग्रजी शिक्षण घेणारांना मिळणारे फायदे त्यांना मिळाले नाहींत. ते फायदे पारशी, सारस्वत ब्राह्मण, प्रभु, चित्पावन ब्राह्मण व मुंबईच्या जवळ राहणाऱ्या कांही जातींना विशेष मिळाले. खेड्यांतील लोकांचे लक्ष या फायद्याकडे वळण्याच्या सुमारास इंग्रजी शिक्षितांत बेकारी सुरू झाली होती. आणि आधींच असलेल्या जात्यभिमानानें तीव्रता धारण करण्यास सुरुवात केली होती. तसेंच ब्राह्मणांतील पोटप्रवाह व्यक्त होऊं लागले होते. याच वेळीं जोशकुलकर्णी वतनें सरकारनें कायद्यानें प्रायः नष्ट केलीं आणि शेतकरी कायद्यानें सावकारांना खेड्यांतून उठवलें. या वेळीं खेड्यांतून पसरलेला ब्राह्मणवर्ग अगदीं पोरका झाला आणि त्याला खेड्यांत राहणें अशक्य झालें. शहराकडे या लोकांचा प्रवाह वळला, पण तेथें तो जातिविषयक स्पर्धेत सांपडून अवहेलनेनें होरपळूं लागला. सार्वजनिक प्रसंगीं जाति किंवा उपजाति निर्देश न करण्याचा शिष्टाचारहि धाब्यावर बसविण्यांत येऊं लागला. तेव्हां

देशस्थ ऋग्वेदी काय किंवा यजुर्वेदी काय यांचा आपोआपच गट बनण्यास सुरवात झाली.

शु. यजुर्वेदी मंडळींना थोडेंतरी व्यापारधंद्याचें बाळकडू होतें, पण दे. ऋ. ब्रा. समाज तर बेकार स्थितीला पोंचला. तेव्हां समाजप्रमुखांच्या ध्यानांत आलें कीं, शिक्षणाकडे लोकांचें अधिक लक्ष वेधविलें पाहिजे. शिक्षण हें जरी सर्व प्रश्न सोडवूं शकत नसलें तरी समाजाचा आत्मविश्वास टिकविण्यास स्पर्धेच्या बौद्धिक क्षेत्रांत समाजांतील व्यक्तींनीं उडी घेतली पाहिजे. दैवयोगानें शहरांत राहून इंग्रजी शिक्षण घेण्याची संधि प्रथम मिळाली म्हणून बुद्धीची कुवत वाढते अशांतला प्रकार नाहीं. शहरांतले लोक बुद्धिमान व खेड्यांतील अबुद्धिमान् असें अनुमानहि चुकीचें आहे. पण अशा चुकीच्या तर्काला उत्तर देण्याचा उपाय म्हणजे संघटनेनें शक्ति निर्माण करणें आणि तिचा उपयोग आवश्यक कार्याला करून समाजाचा आत्मविश्वास वाढविणें हा होय. पण जातिसंस्था काढणारांवर इतर जातीच्या द्वेषाचा आरोप सहज करतां येतो हें एक आणि दुसरें म्हणजे बाहेर जातिसंस्थेच्या विरुद्ध बोलून घरीं जातीय दृष्टीनें सर्व गोष्टी करावयाच्या अशी वृत्ति चहूंकडे होती. त्यांतून आत्मविश्वासानें पुढें येण्याचें धाडस करण्यास कोणी तयार नव्हतें. पण चित्राव, अनगळ, खासनीस, वगैरे सभासद असलेल्या समर्थमंडळांत अनेक वेळां चर्चा होऊन तें धाडस कै. न. बा. चंद्रचूड व श्रीमंत बाळासाहेब पुरंदरे यांच्या नेतृत्वाखालीं करण्याचें निश्चित करण्यात आलें. आणि श्री. वि. के. खासनीस यांच्या कार्यवाहत्वाखालीं पुणें येथें दे. ऋ. ब्रा. शिक्षणोत्तेजक संस्थेचा जन्म झाला. प्रारंभीं कांहीं दिवस तो एक सर्वत्र चर्चेचा विषय होता. आणि त्याला व्यवस्थित उत्तर देण्याचें काम सुप्रसिद्ध जज्ज रा. ब. ह. व्यं. चिन्मुळगुंद यांनीं अत्यंत तडफेनें केलें. हळूहळू सर्व दर्जाचे आणि सर्व वर्गाचे सभासद संस्थेला मिळून सभासदांची संख्या श्री. बाळासाहेब

शाळिग्राम व श्री. के. पां. जोशी वगैरेंच्या प्रयत्नानें पुष्कळच वाढली. संस्थेच्या कार्याला त्रैमासिक समाचाराची जोड देण्यांत आली आणि त्याचें रूपान्तर मासिकांत होऊन त्यानें पुढें 'समर्थ' हें नांव धारण केलें.

**२ मध्यवर्ति मंडळ मुंबई व इतर संस्था—**

पुण्याच्या संस्थेनें प्रथम वाडा खरेदी करून संस्थेला स्थैर्य आणलें. त्या वाड्याची व्यवस्था श्री. ह. के. टिल्लू हे आस्थेवाईकपणानें आजपर्यंत पहात आहेत. वाड्यामुळें संस्थेच्या आर्थिक स्थितींतहि सुधारणा झाली आहे.

प्रारंभीं पुण्याच्या संस्थेच्या नांवांतील 'शिक्षणोत्तेजक' हा शब्द तिला कवचासारखा उपयोगीं पडला. पण तिकडे विशेष लक्ष न देतां त्या संस्थेचें अनुकरण करून बाहेर ठिकठिकाणीं संस्था निघण्यास सुरवात झाली आणि त्या संस्थांना दे. ऋ. ब्रा. चें संघटन असें रूप प्राप्त झालें.

पुणें संस्थेच्यानंतर परिषद आणि परिषदेनंतर मुंबईचें मध्यवर्तिमंडळ व त्याची इमारत हीं एकापेक्षां एक चांगलीं व व्यापक तत्वावर उभारलेलीं कामें झालेलीं आहेत. मुंबईचें मध्यवर्तिमंडळ श्री. ना. बा. काळे, श्री. ग. भि. अफझुलपूरकर व डॉ. रा. गो. धायगुडे यांच्या पुढारीपणाखालीं चालूं लागलें आणि श्री. ना. बा. काळे यांनीं लक्ष्मीनारायणबाग नांवाची आपल्या मालकीच्या जागेच्यापैकीं पांचहजार रुपये किंमतीची जागा मध्यवर्ति मंडळास विनामूल्य बक्षिस देऊन मुंबईस मध्यवर्तिमंडळास स्थैर्य आणलें व त्यावर ऐन युद्धाच्या धांदलींत इमारत उभारण्याच्या कामीं दि. ब. व्यं. गो. शेटे यांच्या प्रेरणेनें यश मिळविलें. महाराष्ट्रांतून कर्ज-रोखे व देणग्या यांच्या स्वरूपांत उल्लेखनीय मदत झाली आहे. आतांपर्यंत यश आलें त्याप्रमाणें पुढेंहि संस्थेला स्थैर्य आणण्यांत पुढारी मंडळी व त्यांचे साहाय्यक यांना यश लाभेल यांत संशय नाहीं. विलेपार्ले येथेंहि श्री. भालेराव यांनीं दिलेल्या जागेवर दे. ऋ. ब्रा. संस्थेची इमारत उभी आहे. त्याबाबत श्री. भी. खं. कोरान्ने व वि. स. घोटीकर वगैरे मंडळींचे श्रम

उल्लेखनीय आहेत. कोल्हापूर, सोलापूर, अहमदनगर, सातारा, बेळगांव, बार्शी, पंढरपूर, संगमनेर, कऱ्हाड, नाशिक, जळगांव, नागपूर, इंदूर, वगैरे ठिकाणीं संस्था स्थापन झाल्या, व त्यांचें कामहि चालू आहे.

या संस्था निर्माण करण्याच्या कामांत श्री. शं. ग. वाघ टेलिग्राफ डिपार्टमेंट मुंबई यांच्या प्रयत्नाचा प्रथम उल्लेख करावयास पाहिजे. यांनीं मुंबई, दादर, सोलापूर व बेळगांव या संस्था स्थापन करण्यांत फार मेहनत घेतली. डॉक्टर मुळेबंधू व श्री. द. भा. दीक्षित सोलापूर यांचें त्या संस्थेच्या इतिहासांत विशेष महत्व आहे.

श्री. कृ. अ. पोतनीस, श्री. य. न. देशपांडे व श्री. स. ब. दुधगांवकर, वैद्य कोल्हापूर, श्री. जी. डी. देशपांडे बार्शी; श्री. ल. ग. गरुड वकील कऱ्हाड, श्री. पुनाळकर सांगली, डॉ. बी. जी. खानापूरकर भुसावळ, श्री. चा. रं. अत्रे वकील, व श्री. रा. ब. मेहरुणकर वकील जळगांव, श्री. ना. गो. भालेराव हायकोर्ट वकील इंदोर, श्री. नानासाहेब बालाजीबाले; श्री. यार्दी वकील व समाजरत्न गोपाळराव कानडे नाशिक, श्री. माधव कृष्ण देशपांडे वकील वांद्रा, सरदार बाबासाहेब पंडितराव, श्री. वामन कचेश्वर देशपांडे व श्री. एकनाथपंत कुलकर्णी सातारा, श्री. वामनराव देशमुख, श्री. गो. शं. कंठी, श्री. वा. गो. तांबवेकर संपादक ' समर्थ ' व श्री. वि. ग. माणके, मुंबई या सर्वांचा उल्लेख करावयास पाहिजे. याशिवाय किती तरी प्रमुख व्यक्तींनीं या कामांत हातभार लावला पण सर्वांचा उल्लेख करणें अशक्य आहे.

**३ परिषदा—**

क्रमानें झालेल्या परिषदेच्या अधिवेशनाची ठोकळ माहिती—

१ पुणें—( १९३१ ) अध्यक्ष—न्या. केशवराव कोरटकर हैद्राबाद (द.) स्वागताध्यक्ष—श्रीमंत सर राघवेंद्रराव सदाशिवराव पुरंदरे, बी. ए.

कार्यवाह—वि. के. खासनीस बी. एजी.

२ सोलापूर—( १९३३ ) अध्यक्ष–रा. ब. न. बा. देशमुख नगर. स्वागताध्यक्ष—डॉ. भालचंद्र विष्णु मुळे. एम. एस. मुख्य सर्जन. राजा-धनराजगिरजी हास्पिटल.

कार्यवाह—१ शं. ग. वाघ, २ द. भा. दीक्षित.

३ सातारा—( १९३५ ) अध्यक्ष–श्रीमंत राजे सर रघुनाथराव शंकर-राव ऊर्फ बाबासाहेब पंतसचीव, भोर.

स्वागताध्यक्ष—श्रीमंत सरदार रा. ब. रामचंद्रराव रघुनाथराव ऊर्फ बाबासाहेब पंडितराव.

४ मुंबई—( १९३७ ) अध्यक्ष–न्या. नारायणराव स्वामीराव लोकूर स्वागताध्यक्ष—श्रीमंत नारायणराव बाबाचार्य काळे

५ नाशिक—( १९३९ ) अध्यक्ष-श्री. दि. ब. ब्रह्म उमरावती. स्वागताध्यक्ष–श्रीमंत नानासाहेब बालाजीवाले,कार्यवाह–श्री. गोसावी वकील.

६ जळगांव—( १९४१ ) अध्यक्ष–श्री. न. बा. चन्द्रचूड, स्वागताध्यक्ष–श्रीमंत सरदार राजे रामचन्द्रराव रघुनाथराव देशमुख, रावेर कार्यवाह—श्री. वा. रं. अत्रे, २ रा. वि. मेहरुणकर वकिल.

७ पुणें—( १९४४ ) अध्यक्ष–श्री. द. व्यं. बेळवी. बेळगांव

स्वागताध्यक्ष–रा. ब. गो. म. वैद्य एम. बी. ई.

कार्यवाह–१ वि. के. खासनीस, २ रावसाहेब य. द. खोले, ३ गो. चिं. अनगळ, ४ सि. ना. कुलकर्णी, ५ श्री. अनसुयाबाई वाघ.

आपल्या संस्थेनें हें काम इतक्या उच्च भूमिकेवरून नमुनेदार चालविलें आहे कीं, वादविवादच काय पण इतर पोटजातींचा निर्देशहि न करतां आपल्या जातींच्या हिताचें काम कारिता येतें असें तिनें सगळ्यांच्या निद-र्शनास आणून दिलें व त्याप्रमाणें इतर पोटजातींनीं या संस्थेचें अनुकरण करून आपल्या उघडपणें स्वतंत्र संस्था काढल्या.

---

# परिशिष्ट दुसरें, समाजभूषणें.

( यांचीं चरित्रें आम्ही छापणार आहोंत.)

## १ कारखानदार

१ श्री. श्री. वि. सुपनेकर, सदर्न निटिंग वर्क्स पुणें. २ श्री. रा. वि. सबनिस, भारत निटिंग वर्क्स पुणें. ३ श्री. वा. के. सावळे, इन्व्हलप्स कारखानदार पुणें. ४ श्री. पारखे, पेपर ऍन्ड पल्प कन्व्हर्शन्स, ६ श्री. नाईक श्रीराम सिल्क मिल्स्, ७ श्रीं. विंचुरकर. ८ रा. सा. का. अग्निहोत्री न्यू शारक मिल्स, नडियाद.

## २ व्यापारी

१ श्री. बा. साळवेकर, भुसार मालाचे व्यापारी पुणें. २ श्री. द. ना. हेजीब, किराणा व भुसार मालाचे व्यापारी, पुणें. ३ श्री. कवठेकर, ४ श्री म. व्यं. शिंगरे, कोलचे व्यापारी पुणें.

## वर्तमान पत्रें व मासिकें

१ श्री. प्र. के अत्रे, नवयुग व समीक्षक, २ श्री. वा. गो. तांबवेकर, बी. ए. एल. एलबी. समर्थ, ३ श्री. वि. गः तिखे, ब्राह्मण. ४ कै. ल. रा. पांगारकर, मुमुक्षु. ५ कै. बापुजी मार्तंड आंबेकर, ज्ञानप्रकाश.

## ४ लेखक

१ श्री. प्र. के. अत्रे, बी. ए. बी. टी टी. डी. २ श्री. वा. म. जोशी, एम. ए. ३ श्री. वि. वि. बोकील, ४ श्री. ना. वि. कुलकर्णी, ५ श्री. द. र. कवठेकर, ६ बन्याबापू कमतनूरकर, सांगली, ७ विष्णु बापूजी आंबेकर बी. ए. ८ कुसुमाग्रज, ९ विद्यानिधि सि. वि. चित्रावशास्त्री. १० श्री. बा. भा. जोशी.

## ५ संशोधक

१ श्री. कृ. पां. कुलकर्णी, २ श्री. कृ. वा. पुरंदरे, ३ कै. श्री. द. ब.

पारसनीस, ४ श्री. श्री. ना. ताडपत्रीकर, ५ श्री. पावशे, ६ श्री. कालगांवकर, आचार्य ७ श्री. य. खु. देशपांडे, ८ श्री. आ. म. देशपांडे, ग्रहभ्रमणयंत्रकर्ते पुणें. ९ कै. शं. पु. जोशी, धुळे.

### ६ धर्मशास्त्री

१ प्रो. वि. वि. देशपांडे, एल. एल. एम. २ श्री. विष्णुपंत पाळेकर, ( अप्रबुद्ध ) ३ कै. वामनाचार्य झळकीकर, ४ कै. जनार्दनाचार्य वळे.

### ७ आय. सी. एस.

१ सर गु. व्यं. त्रेवूर, २ श्री. द. श्री. जोशी, ३ श्री. पा. ज. चिन्मुलगुंद.

### ८ हायकोर्ट जज्जेस

१ न्या. ना. स्वा. लोकूर, मुंबई. २ श्री. स. अ. सुधाळकर, बडोदें. ३ श्री. पंडितराव, कोल्हापूर, ४ कै. न्या. केशवराव कोरटकर, हैद्राबाद, ५ रा. सा. वि. आ. चंद्रचूड, सावंतवाडी,

### ९ डॉक्टर

१ श्री. र. आ. चंद्रचूड, स्टेटसर्जन बडोदें. २ डॉ. ठकार, सांगली स्टेट ३ कै. रा. ब. शिखरे, ४ श्री. रा. गो. धायगुडे मुंबई, ५ कै. रा. ब. चि. वि. मुळे, सोलापूर. ६ श्री भा. वि. मुळे सोलापूर, ७ श्री. आ. वि. जालनापूरकर, ८ श्री. म. स. त्रेके, ९ श्री. राईकर.

### १० डि. जज्जेस

१ श्री. को. म. कुमठेकर, बी. ए. एल एल. बी. २ कै. नाशिककर, बी. ए. एल. एल. बी.

### ११ सॉलिसिटर्स

१ श्री. के. बी. जोशी, मुंबई,

### १२ जगन्नाथ शंकरशेट स्कॉलर्स

१ श्री. दि. वि. अत्रे, एल. एल. बी. २ प्रो. न. गो. सुरू, एम. ए.

३ प्रो. ना. ह. पुरंदरे, एम. ए. ४ श्री. दा. पं. शिखरे, एल. एल. बी. ५ कु. वत्सला पाटील, धारवाड, ६ श्री. शं. अ. गोपुसकर.

## १३ एल. एल. एम.

१ प्रो. वि. वि. देशपांडे, २ श्री. वि. दा. जेस्ते, ३ श्री. ग. के. पुराणिक, ४ रा. सा. वि. बा. चंद्रचूड.

## १४ एलएल. बी. (एफ. सी)

१ श्री. बा. खं. खाडे, २ श्री. दा. पं. शिखरे, ३ श्री. चंद्रचूड, ४ श्री. चौधरी.

## १५ इंजीनिअर्स

१ दि. ब. व्यं. गो. शेटे, २ रा. ब. गं. बा. काळे, ३ रा. ब. एन्. आर. जोशी, ४ श्री. स. के. नेऊरगांवकर, ५ श्री. शं. भा. पुरंदरे, ६ रा. सा. रा. भि. कुंचुर, ७ श्री. य. कृ. भेडसगांवकर, ८ श्री. वाडेकर, ९ रा. ब. ग. दिक्षीत, १० श्री. शं. वि. पट्टीहाळ, ११ ना. रं. टोणगांवकर. ( १२ ) प्रो. बाबासाहेब दाणी, ( १३ ) कै. दाजीसाहेब दाणी.

## १६ प्रोफेसर्स

१ प्रो. वि. धों. सत्तेगिरी. २ प्रो. पुणतांबेकर ( बनारस ), ३ प्रो. एन्. सी. गुपचूप इंजि., ४ प्रो. वि. वि. देशपांडे ( बनारस ), ५ प्रो. न. गो. मुरू ( वाडिया कॉलेज, पुणें ), ६ डॉ. ढेकणे, ( धारवाड कॉलेज ) ७ प्रो. म. रा. ढेकणे, ( फर्ग्युसन कॉलेज, पुणें ), ८ प्रो. अ. स. आळतेकर ( बनारस ), ९ प्रो. धबडगांव ( स. प. कॉलेज, पुणें ) १० प्रो. बी. पी. देशपांडे, ११ प्रो. वि. ना. कुंभारे, ( फर्ग्युसन कॉ. ) १२ श्री. व्ही. के. कोठुरकर ( एलफिन्स्टन कॉ. मुंबई ), १३ श्री. अ. बा. गजेंद्रगडकर ( एलफिन्स्टन कॉ. मुंबई ), १४ श्री. श्री. रा. पारसनीस ( फर्ग्यु. कॉ. ), १५ कै. प्रो. जिन्सीवाले एम. ए. १६ कै. प्रो. वि. गो. विजापूरकर, एम. ए. ( १७ ) प्रो. आर. आर. देशपांडे.

### १७ महामहोपाध्याय

१ कै. रघुपतिशास्त्री वाजपेयी ( ग्वालेर ), २ प्रो. ताम्हण, ३ श्री. सितारामशास्त्री शेंडे (कलकत्ता), ४ प्रो. वा. वि. मिराशी, एम. ए. नागपूर.

### १८ सी. आय. ई.

१ सरदार गं. ना. ( आबासाहेब ) मुजुमदार

### १९ एम. बी. ई.

१ रा. ब. गो. म. वैद्य, २ डॉ. वाघोलीकर.

### २० जे पी.

१ रा. ब. गं. शा. काळे

### २१ दिवाणबहादूर

१ श्री. व्यं. गो. शेटे, २ श्री. ब्रह्म, ३ श्री. ल. पां. कुलकर्णी

### २२ रावबहादूर

१ रा. ब. न. वा. देशमुख, २ रा. ब. एस. एस. देशपांडे, ३ रा. ब. भा. ग. आकूत, ४ रा. ब. ह. व्यं. चिन्मलगुन्द, ५ रा. ब. ज. ह. चिन्मलगुंद, ६ रा. ब. सरदार रा. र. पंडितराव रा. ब. ग. न. अत्रे.

### २३ रावसाहेब

१ रा. सा. ग. के. देशपांडे ( आबासाहेब ), २ रा. सा. पां. शा. कुलकर्णी, ३ रा. सा. य. द. खोले, ४ रा. सा. द. शा. उदास, ५ रा. व्ही. डी. कवठाळकर.

### २४ आमदार

१ रा. सा. पां. शा. कुलकर्णी, २ कै. न. बा. चंद्रचूड, ३ श्री. पी. जी. जोशी, ४ श्री. द. व्यं. आराध्ये, ५ श्री. रा. बा. वाडेकर, ६ श्री. ह. वा. पाटसकर, ७ डॉ. कृ. भि. अंत्रोळीकर, ८ श्री. रा. अं. खेडगीकर.

### २५ खासदार

४ सरदार आबासाहेब मुजुमदार, पुणें

## २६ सरदार पहिला वर्ग

१ सरदार ल. गं. स्वामी चाफळकर, २ सरदार स. भा. (आबासाहेब) पुरंदरे, ३ सरदार ना. ग. विंचूरकर, ४ सरदार गं. ना. ( आबासाहेब ) मुजुमदार पुणें, ५ सरदार खं. रा. विंचुरकर, ६ सरदार भ. गो. राजेबहादूर, ७ सरदार राजे रामचन्द्रराव रघुनाथराव देशमूख, रावेरकर.

### दुसरा वर्ग

१ सरदार कृ. दा. हिंगणे, २ सरदार रा. र. पंडितराव, ३ सरदार चि. म. पुरंदरे, ४ सरदार ल. न. हेबळीकर.

### तिसरा वर्ग

१ सरदार वि. न. बापूसाहेब देशपांडे, २ सरदार त्रिं. ना. राजेबहादूर, ३ सरदार माधवराव गजानन देशपांडे, जुन्नर, ४ सरदार विश्वासराव दामोदर पानसे.

## २७ वकील

१ रा. ब. न. बा. देशमुख नगर, २ श्री. द. व्यं. बेळवी, बेळगांव, ३ श्री. म. ग. होनप, पुणें, ४ श्री. ना. के. राजगुरु, पुणें, ५ श्री. आर. ए. जहागिरदार, मुंबई, ६ श्री. पी. बी. गजेंद्रगडकर, मुंबई.

## २८ बँकर्स

१ श्री. रा. वा. साळवेकर, एलएल. बी. २ श्री. नि. ना. क्षीरसागर, ३ श्री. डि. एन् गांडेकर, एलएल. बी. ४ रा. जी. डी. देशपांडे.

## २९ प्रसिद्ध कार्यकर्ते

१ श्री. वा. वा अतीतकर पुणें, २ श्री. ह. मो. जोशी पुणें, ३ श्री. तात्यासाहेब देशपांडे, पुणें, ४ श्री. काकासाहेब चिंचोरकर, नगर, ५ श्री शंकरराव ठकार, नंदुरबार, ६ श्री. बा. बा. राघवदास गोरखपूर. ७ श्री. रमाबाई देशपांडे यावल, ८ श्री. कृ. ह. कब्बूर, मुंबई.

३० याशिवाय आणखी पुष्कळ चरित्रें येणार आहेत.

# कांहीं प्रमुख ऐतिहासिक घराणीं



## प्रथम खंड

## सुविख्यात पंतसचिव घराण्याचा त्रोटक इतिहास

प्रसिद्ध पंतसचिव घराण्याच्या इतिहासाकडे वळण्यापूर्वी ज्या महाराष्ट्रांतील भूभागावर पंतसचिवांचें राज्य पसरलें आहे त्याची स्थूलमानानें माहिती असणें जरूर आहे. भोर संस्थानच्या ठोकळमानानें सीमा म्हटल्या तर उत्तरेस, पश्चिमेस आणि वायव्येस कुलाबा जिल्हा; ईशान्येस सह्याद्रि, पूर्वेस व दक्षिणेस पुणें व सातारा या दोन जिल्ह्यांच्या हद्दी. संस्थानाचें क्षेत्रफळ ९१० चौरस मैल. १९४१ च्या खानेसुमारीप्रमाणें लोकसंख्या १,५५,९६१. संस्थानांत लहानमोठीं ५०२ गांवें आहेत. संस्थानच्या प्रदेशांपैकीं $\frac{1}{4}$ भाग सपाट असून बाकी $\frac{3}{4}$ भाग डोंगराळ आहे. $\frac{1}{4}$ जमीन तांबडी असून बाकीची जमीन काळी व कांहीं तांबूस—काळी आहे. बागाईत भाग फारच थोडा आहे.

या संस्थानांतून मुठा, नीरा, अंबा, वेळवंडी, गुंजवणी, शिवगंगा, कांदी, मुळा या नद्या वाहतात. डोंगराळ भागांत पाऊस फार, तर सपाट भागांत पाऊसमान अल्प. कोंकण व मावळ भागांत पाऊस जास्त असल्यानें, भात, नागली, वरी वगैरे पिकें होतात. देशभागांत ज्वारी, बाजरी, गहू, हरभरा पिकतात. संस्थानांतून बाहेर जाणारे मुख्य धान्य म्हणजे तांदूळ. जंगलाचें उत्पन्न मुख्यत्वें साग व हिरडा यांचें आहे.

या संस्थानांत अनेक नैसर्गिक प्रेक्षणीय स्थळें आहेत. त्यांपैकीं भोर हें राजधानीचें गांव असून वीज, पाण्याचे नळ, उत्तम रस्ते, हायस्कूल,

दवाखाना वगैरे सुखसोयींनीं सज्ज आहे. पुण्यापासून ३४ मैल व लोणंद-पासून २५ मैल भोर आहे.

भोरजवळ लॉइडडॅम (भाटघर धरण) आहे. या धरणासाठीं संस्थानचा सुपीक भाग गेला असून या धरणाच्या पाण्याचा फायदा मात्र संस्थानच्या प्रजेस बिलकुल मिळत नाहीं. अंबवडें हें भोरपासून ९ मैलावर आहे. या ठिकाणीं संस्थानचें मूळ संपादक ब्रह्मीभूत श्रीशंकराजी नारायण यांची समाधि आहे. हल्लींचे संस्थानाधिपति श्रीमंत बाबासाहेब यांनीं जीर्ण झालेल्या समाधीचें संगमरवरी दगडाचें नवीन बांधकाम करून पुढें प्रशस्त सभामंडप बांधिला आहे. जवळून वाहणाऱ्या ओढ्यावर आपल्या पुण्यशील मातोश्रींच्या नांवानें ' झुलता पूल ' बांधून त्याला " जिजीसाहेब झुलता पूल " असें नांव दिलें आहे. भोरपासून १४ मैलांवर रायरेश्वर हे इतिहासप्रसिद्ध देवालय रायरी डोंगर-सपाटीवर आहे. रोहिडा किल्ला भोरापासून ६ मैल आहे. अंबाडखिंड हें उत्तम हवापाण्याचें ठिकाण भोरच्या दक्षिणेस आठ मैलांवर आहे. पांडवदरा येथें बुद्धकालीन लेणीं आहेत. तसेंच सुधागड तालुक्यांत ठाणाळा व नेणावली येथेंही लेणीं आहेत. वनेश्वर हें प्रेक्षणीय स्थान आहे. याखेरीज इतिहास-प्रसिद्ध राजगड, तोरणा, तुंगतिकोना, भोरप व सरसगड वगैरे किल्लेही पाहण्यासारखे आहेत.

राज्यकारभाराच्या सोयीसाठीं संस्थानचे पांच तालुके केले आहेत. विचित्रगड, राजगड, प्रचंडगड, पौनमावळ व सुधागड. प्रत्येक तालु-क्याला जाणारी उत्तम सडक असल्यानें दळणवळणाला त्रास नाहीं. दवाखानें, शाळा वगैरेंची योजना तालुक्याचे मुख्य ठिकाणीं केलेली आहे. आधुनिक ब्रिटिश हद्दींतील राज्यकारभाराच्या यंत्राप्रमाणेंच येथील योजना आहे. आधुनिक सुखसोयी शक्य तों आपल्या प्रजेला कशा मिळतील ह्याकडे श्रीमंत राजेसाहेब यांचें सतत लक्ष असल्यानें शिरवळा-

सारख्या तालुक्याच्या गांवीं विजेचा उपयोग दिव्याकडे व पिठाच्या गिरण्यांकडे होत आहे. लौकरच नसरापूर येथेंही अशीच सोय होणार आहे.

## १ शंकराजी नारायण गांडेकर

भोर संस्थानचे मूळ संस्थापक शंकराजी नारायण हे निजामहद्दींतील गांडापूर गांवचे रहिवासी. शंकराजी यांचे आजे मुकुंदपंत विठ्ठल हे व्यवसायानिमित्त मावळ प्रांतांत पुण्याच्या नैऋत्येकडे आठ कोसावर असलेल्या मांगदरी गांवीं येऊन थोडक्याच दिवसांत तेथें स्थायिक झाले. गांडेकर हे ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण. शंकराजीचे वडील नारो मुकुंद यांनीं १६४३ मध्यें छत्रपती शिवाजी महाराज यांचे सैन्यांत कारकुनीचें काम पत्करलें. ते नेहमीं सैन्याबरोबर असल्यानें महाराजांनीं भोर किल्ला घेत-ल्यावर किल्ल्याची सबनिशी नारोपंताकडे दिली. सन १६७७मध्यें महारा-जांचा मुक्काम प्रतापगडावर असतांना हिशेबाचे कागद घेऊन नारोपंत आपल्या लहान शंकराजीला घेऊन तेथें गेले व त्यावेळीं मोरोपंत पिंगळे पेशवे तेथें असल्यानें त्यांचेजवळ गोष्ट काढून त्यांचेकडे कामास लाविलें. आपल्या अंगच्या अक्कलहुषारीनें शंकराजीनें पेशवे यांची मर्जी संपादन करून लिहिण्याचें काम करण्यास सुरवात केली. तो धकाधकीचा काळ असल्यानें शिवाजी महाराज दिवंगत होतांच पूर्वीचें प्रधानमंडळ गड-गडून नवीन माणसें अधिकारारूढ झाली. मात्र या संकटांतून रामचंद्र निळकंठ अमात्य शिरसलामत बाहेर पडले व त्यांचेकडे शंकराजी काम करूं लागले.

शंकराजीच्या आयुष्यांत १६८६ साल अत्यंत महत्त्वाचें. कारण त्या सालीं शंकराजींचा कारकुनीचा पेशा बदलून ते फौजेंत दाखल झाले. त्यांच्या अंगच्या गुणांना अशा तऱ्हेनें वाव मिळाला व त्यांचा सतत गणितश्रेढीनें उत्कर्ष होत गेला. गनिमीकाव्याची लढाई लढावी तर

ती शंकराजीनेंच असें दिसून आलें. मोंगलांचे किल्ले शंकराजीनें आपल्या अतुल शौर्यानें एकामागून एक घेऊन मराठ्यांचें नांव उज्ज्वल केलें.

संभाजी महाराजांचे निधनानंतर मोंगलांचा वरचष्मा झाला व राजाराम महाराज यांना कर्नाटकांत जिंजी येथें जावें लागलें. परंतु जिंजीस जाण्यापूर्वी राजाराम महाराजांनीं शंकराजीला "राजाज्ञा" ही पदवी अर्पण केली. फक्त रामचंद्रपंत अमात्य मागें राहिले व त्यांनीं शंकराजीला हाताशीं धरून विस्कटलेली घडी सावरण्याचें कठीण काम चालू ठेविलें. शंकराजीनें मोंगलांपासून मोठमोठे किल्ले घेतल्यानें रामचंद्रपंत यांनीं राजाराम महाराजांकडे शंकराजीबद्दल शिफारस केली व त्यांनीं शंकराजीला मदारुल महाम म्हणजे "राज्याचे आधारस्तंभ" हा वंशपरंपरेचा किताब व त्याचीं वस्त्रें चंदीहून पाठविलीं. यथाकाल मोंगलांचें पारिपत्य करून राजाराम महाराज परत महाराष्ट्रांत आले व त्यांनीं १६९८ मध्यें शंकराजींना सचिवपद देऊन त्यांना अष्टप्रधानांपैकीं एक महत्त्वाची जागा दिली.

सचिवांचें काम म्हणजे राज्यांत होणारा जो पत्रव्यवहार त्या सर्वांची बारनिशी व नोंद ठेवणें, कागदपत्रांची नीट व्यवस्था लावून ठेवणें. सनदापत्रांची नोंद ठेवणें, थोडक्यांत म्हणावयाचें तर सचिव हे राज्यांतील एकंदर कागदपत्रांचे खजिनदारच होते. सचिव प्रधान यांचा मान अग्निकोनास छत्र घेऊन उभे राहण्याचा होता. दरबारांत बसण्याचें स्थान छत्रपतींच्या उजव्या बाजूस अमात्यांच्या खालीं तिसऱ्या दर्जाचे होते. सचिव प्रधान यांस कंठी मोत्याची, चौकडा मोत्याचा, तुरा, शिरपेच, शिक्केकट्यार, ढाल, तरवार हत्ती, चौघडा, घोडा वगैरे मानाचे जिन्नस प्राप्त होत असत.

शंकराजी नारायण यांनीं सचिवाचें काम १६९८ ते १७०७ पर्यंत उत्तम प्रकारें केलें. छत्रपती शिवाजी महाराजांनीं ज्या प्रदेशांत स्वरा-

ज्याची स्थापना केली, तो प्रदेश भोर संस्थानांत असल्यामुळें, अद्यापही तेथील प्रजा स्वराज्याचा अनुभव घेत आहे व ही गोष्ट महाराष्ट्रीयांना अभिमानास्पद वांटल्यावाचून कशी राहील ? शंकराजी नारायण यांचे-पुढें राजाराम महाराजांच्या अकालीं मृत्यूमुळें कठीण प्रश्न येऊन उभा राहिला. औरंगजेब बादशहा निवर्तल्यानंतर संभाजीचा मुलगा शाहू याची दिल्लीहून सुटका होऊन तो परत मायभूमीस येण्यास निघाला. हें कृत्य राजारामाची महत्त्वाकांक्षी पत्नी ताराबाई हिला न रुचून, तिनें सर्व प्रमुख अधिकाऱ्यांना बोलावून “ आम्ही ताराबाईचा पक्ष कधीं सोडणार नाहीं; येणारा शाहू कोणीतरी तोतया आहे. ” अशाबद्दल आणाशपथा दिल्या. शंकराजी नारायण यांनीं शब्दाला जागून आपल्या ताब्यांतील मुलूख शाहू महाराजांना जाऊं दिला नाहीं; इतकेंच नव्हे तर शाहू महा-राजांनीं शंकराजीस भेटीस बोलाविलें तरी तो एकनिष्ठ स्वामिभक्त वच-नाला जागून भेटीस गेला नाहीं. इकडे आड तिकडे विहीर अशी स्थिति शंकराजीची झाली व ह्या अडचणींतून मार्ग काढण्यासाठीं त्या करारी वीरानें संन्यास धारण करून आंबवडें येथें देह ठेविला व अशा तऱ्हेनें अखेरपर्यंत दिलेल्या शब्दाचा मान राखिला.

शंकराजीच्या अंगीं साहस अतुल होतें. शौर्य व बुद्धिमत्ता अपूर्व होती. ते अत्यंत पापभीरु, इमानी व धर्म व राष्ट्र यांचे कट्टे अभिमानी होते, स्वामिभक्तीचा तर ते मूर्तिमंत पुतळाच होत.

शंकराजी नारायणास सचिवपदाची प्राप्ती झाल्यावर त्यांच्या नांवाचा “ श्रीशंकराजी नारायण ” हा शिक्का व पत्र वगैरे पुरें झाल्यावर “ पत्रा-वधिरयंभाति ” हें मोर्तब सुरू झालें. कोणत्याही सरकारी कागदावर व सनदेवर सचिवांची “ रुजू सुरनवीस, ” “ सुरु सुदबार ” अशीं अक्षरें असल्याखेरीज कोणताही कागद पुरा होत नसे. स्वतः महाराज शंकराजीस पत्र लिहितांना “ राजश्री शंकराजी पंडित ” असें लिहीत असत.

शंकराजीस नारोपंत नांवाचा एकच औरस पुत्र व तोही दोन वर्षांचा होता. त्यालाच शाहूमहाराजांनीं शंकराजीची कामगिरी व स्वामिनिष्ठा लक्षांत घेऊन, सचिवपदाचीं वस्त्रें मोठ्या गौरवानें अर्पण करून एका थोर महात्म्याच्या स्वर्गस्थ आत्म्यास चिरशांति दिली.

## २ नारो शंकराजी सचिव—१७०७–१७३७

शंकराजी नारायण यांचे एकुलते एक चिरंजीव नारोपंत यांना सचिव-पदाचीं वस्त्रें देऊन छत्रपती शाहूमहाराज यांनीं राज्यकारभाराची जबाब-दारी त्यांच्या मातोश्री व मुतालिक यांचेवर सोपविली. शाहू महाराजांनीं ज्या अनेक मुत्सद्दीपणाच्या गोष्टी केल्या त्यांतील महत्त्वाची गोष्ट ही होती. कारण त्यामुळें सचिव घराणें कोल्हापूरकडे न जातां साताऱ्च्या गादीशींच राजनिष्ठ राहिलें. दमाजी थोरात नांवाच्या पुंडानें बंड केलें, त्याचें पारिपत्य करण्यासाठीं येसूबाई—नारोपंताची आई-यांनीं मुतालिकांना पाठविलें. पण दुर्दैवानें मुतालिक यांचा पराभव होऊन ते व बाल नारो दमाजीचे कैदेंत पडले. शाहू महाराजांनीं पेशव्यास पाठवून दमाजीचा मोड करून बालसचिवाची सुटका करून येसूबाईकडून पुरंदर किल्ला व इतर कांहीं आसपासचा मुलूख मिळविला.

नारोशंकर फार धार्मिक होते. त्यांचे कारकीर्दींत एक चिरस्मरणीय गोष्ट घडून आली. पुरंदर किल्ल्याजवळ बेलसर नांवाच्या खेड्यांत एका रामोपासक कुळकर्ण्याजवळ श्रीरामाच्या मूर्ति होत्या. त्या ब्राह्मणाला दृष्टांत झाला कीं, “ तूं रामाच्या मूर्ति सचिवांना नेऊन दे. ” त्याच रात्रीं “ कोणी रामाच्या मूर्ति आणून दिल्याच तर त्या तूं घे ” असा नारो-शंकर यांना दृष्टांत झाला. पुढें तो कुळकर्णी चैत्र शु. ८ चे दिवशीं त्या रामाच्या मूर्ति घेऊन भोरानजीकच्या ओढ्याजवळ आला. नारोशंकरही लव्याजम्यासह तेथें आले व त्या मूर्ति घेऊन नारोशंकर रोहिड्यावर गेले व तेव्हांपासून चैत्र शु. ८ पासून उत्सव करूं लागले. तोच अव्याहत भोर

येथें दरसाल उत्तम तऱ्हेनें साजरा होत आहे. महाराष्ट्रांत भोरच्या रामनवमीची फारच कीर्ति आहे. नारोशंकर १७३७ मध्यें वारले. त्यांना औरस संतति नसल्यानें शंकराजी नारायणाचे एक दत्तकपुत्र होते त्यांस चिमणाजी नांवाचा एक मुलगा होता. त्यास नारोशंकराचें मांडीवर दत्तक दिलें.

## ३ चिमणाजी नारायण १७३७–१७५७

चिमणाजी नारायण यांनीं भोर येथें राजधानी १७४० मध्यें केली. यांचेच कारकीर्दीत १७५० मध्यें पेशव्यांनीं सिंहगड किल्ला घेऊन त्याचे बदला तुंग व तिकोन हे दोन किल्ले व शिरवळ येथील खालसा अंमल हे दिले. त्यांना तीन मुलगे. सदाशिवराव, आनंदराव व रघुनाथराव. चिमणाजी १७५७ सालीं भोर येथें परलोकवासी झाले.

## ४ सदाशिव चिमणाजी १७५७–१७८७

सदाशिवरावांचे कारकिर्दीत १७६३ सालीं मोंगलांनीं फार लुटालूट करून भोर संस्थानचें फार नुकसान केलें. हें नुकसान भरून काढण्यास पुढें बरींच वर्षें लागलीं. हे १७८७ मध्यें निपुत्रिक वारल्यानें त्यांचे धाकटे बंधूस सचिवपद प्राप्त झालें.

## ५ रघुनाथ चिमणाजी १७८७–१७९१

रघुनाथरावांनीं फक्त चार वर्षें सचिवपदाचा उपभोग घेतला व ते १७९१ मध्यें वारले. त्यांना एक औरसपुत्र होता. त्याचें नांव शंकरराव उर्फ बाबासाहेब.

## ६ शंकरराव रघुनाथ १७९१–१७९८

शंकरराव ऊर्फ बाबासाहेब हे जात्या थोडेसे भोळसट असल्यानें व त्यावेळीं दरबारांत आपसांत वैमनस्य असल्यानें गादीचा कारभार नीट होईना. पेशव्यांनीं नाना फडणिसांच्या सल्ल्यानें वाजी मोरेश्वर नांवाच्या इसमास भोर दरबारीं विसकटलेली घडी नीट बसविण्यासाठीं पाठविलें.

पण त्या स्वार्थी मनुष्यानें बाबासाहेब वेडे आहेत असें ठरवून घेण्याचा घाट घातला. बाबासाहेब हे बाजी मोरेश्वराच्या छळाला त्रासून जेजुरीला येऊन राहिले. त्यांची पत्नी सखारामबापू बोकील यांची कन्या होती. तिनें प्रसंगावधानानें आपल्या नवऱ्याचा मारेकऱ्यांपासून मोठ्या शिताफीनें बचाव केला. सुदैवानें त्यावेळीं महादजी शिंदे पुण्यास होते. त्यांच्या कानीं ही गोष्ट जातांच त्यांनीं बाबासाहेबांना मोठ्या मानानें पुण्यास आणून त्यांचा यथोचित सन्मान केला. पाटील घराण्याचा हा उपक्रम न विसरण्याजोगा झाला. बाबासाहेबांनीं तीन लग्नें केलीं पण संतति झाली नाहीं; म्हणून त्यांनीं दत्तक पुत्र घेऊन त्याचें नांव चिमणाजी उर्फ नानासाहेब हे ठेविलें. बाबासाहेब १७९८ सालीं निवर्तले. त्यांचें तिसरें कुटुंब ताईसाहेब त्यांच्या मागें राहिल्या.

## ७ चिमणाजी शंकर उर्फ नानासाहेब १७९८–१८२७

नानासाहेब यांचे व सापत्न माता ताईसाहेब यांचें पटत नव्हतें; त्यामुळें त्यांना बराच त्रास भोगावा लागला. सचिवांना बाठारच्या निंबाळकरांनीं आपल्या कर्जाऊ दिलेल्या रकमेच्या जोरावर त्यांच्याच भोरच्या वाड्यांत अटकेंत ठेवलें; पण पेशव्यांनीं सरदार बापू गोखले यांस पाठवून निंबाळकरांचें पारिपत्य केलें. पण १८१८ मध्यें पेशव्यांचें राज्य खालसा झाल्यानें १८२० सालीं नानासाहेबांनीं इंग्रजांशीं तह केला. नानासाहेबांना औरस संतति नसल्यानें त्यांनीं दत्तकपुत्र घेऊन त्यास गादीचा वारस केलें. १८२७ सालीं ते कालवश झाले.

## ८ रघुनाथ चिमणाजी उर्फ रावसाहेब १८२७-१८३६

रघुनाथराव हे अल्पवयी असल्यानें राज्यकारभार त्यांच्या सापत्न मातोश्री भवानीबाईसाहेब पाहात होत्या; पण मायलेकांत सलोखा नसल्यानें भवानीबाईंना दरसाल रु. १४००० ची नेमणूक झाली. यांच्या कारकीर्दींत इंग्रजी हद्दींत उमाजी नायकानें बंड केलें. तें मोडण्याचे कामीं

ह्यांचा फार उपयोग झाला. यांचे कारकीर्दीत सुधागड तालुक्यांतील कांहीं गांवांचा मोबदला झाला व त्यांत नागोठणें बंदर इंग्रजांकडे गेलें. १८३६ सालीं हे दिवंगत झाले. त्यांना औरस संतति नव्हती.

## ९ चिमणाजी रघुनाथ उर्फ नानासाहेब १८३६–१८७१

रघुनाथरावांचे दत्तकपुत्र चिमणाजी हे गादीवर आले. त्यावेळीं तीन वर्षांचे होते. त्यांच्या मातोश्री गंगाबाईसाहेब १८४१ सालीं निवर्तल्या. तोंपर्यंत तीन कारभाऱ्यांच्या मदतीनें त्या राज्यकारभार उत्तम तऱ्हेनें बघत होत्या. १८५१ सालीं चिमणाजी वयांत आल्यानें संस्थानचीं राज्यसूत्रें त्यांचें हातीं आलीं. यावेळीं संस्थानची सांपत्तिक स्थिति फारच वाईट होती. पण सर बार्टले फ्रिअर यांच्या मदतीनें कर्जाची तडजोड होऊन नानासाहेबांची काळजी बरीच कमी झाली.

१८५४ सालीं नानासाहेबांना पुत्ररत्नप्राप्ति झाली. १८५८ सालीं भोरची पेठ आगीनें भस्मसात् झाली. त्यावेळीं लोकांना तगाई व मदत देऊन नवीन पेठ बांधविली. १८६२ सालीं दत्तक घेण्याच्या परवानगीची राणीसरकारची सनद सचिवांना आली. नानासाहेब यांनीं भोरला पाणी पुरवठ्याची एक लाख रुपये खर्चून कायमची सोय केली. ब्रिटिश पद्धती-प्रमाणें मामलेदार, मॅजिस्ट्रेट, मुन्सफ कचेऱ्या स्थापन केल्या. १८६९ सालीं अग्निप्रलयानें भोरचा राजवाडा खाक झाला. पण धैर्य खचूं न देतां एक वर्षांत पुन्हां त्यांनीं टोलेजंग वाडा बांधला. त्यांना बागबगिच्याचा फार शोक होता. नीरा नदीस घाट बांधून शहराला शोभा त्यांनीं आणिली. १८७१ सालीं ते प्रजेचे धन्यवाद घेऊन परलोकास गेले.

## १० शंकरराव उर्फ रावसाहेब १८७१–१९२२

शंकरराव गादीवर आले त्यावेळीं त्यांचे वय अवघें १७ वर्षांचें होतें. ते वयांत येईपर्यंत संस्थानचा कारभार त्यांच्या मातोश्री माईसाहेब या इंग्रजसरकारतर्फें नेमलेला अधिकारी व आणखी एक अधिकारी यांच्या

मदतीनें करीत होत्या. ६ जुलै १८७४ सालीं रावसाहेब यांच्या हातीं राज्यकारभाराचीं सूत्रें आलीं. स्पृहणीय धारणशक्ति, चलाख बुद्धि व काटकसरी स्वभाव ह्या व इतर गुणांमुळें यांची कारकीर्द स्मरणीय झाली. त्यांनीं हळूहळू सर्व खात्यांत त्या त्या वेळच्या गरजाप्रमाणें जरूर त्या सुधारणा केल्या. पब्लिक वर्क्स, फॉरेस्ट, शिक्षण वगैरे स्वतंत्र खातीं निर्माण केलीं. भोर व शिरवळ येथें मोफत दवाखाने काढले. भोरला हायस्कूल झालें. प्रत्येक तालुक्याच्या गांवीं सरकारी खात्यासाठीं इमारती बांधिल्या. दळणवळणाच्या सोयीसाठीं सडका केल्या.

१९०३ सालीं त्यांना इंग्रजसरकारकडून ९ तोफांच्या सलामीचा वैयक्तिक ( Personal ) मान बहाल करण्यांत आला. पुढें १९११ सालीं दिल्ली दरबारच्या प्रसंगीं आणखी दोन तोफांची वाढ होऊन " हिजहायनेस " ही पदवी प्राप्त झाली व हाही मान वैयक्तिक होता. १९२१ मध्यें फांशी देण्याचा अधिकार मिळाल्यानें संस्थानचा दर्जा पहिल्या प्रतीचा झाला.

आपलें कुलदैवत श्रीराम यांचा उत्सव निर्वेधपणें साजरा व्हावा म्हणून रु. १२००० वसुलाचीं गांवें स्वतंत्र इनाम म्हणून तोडून देण्यांत आलीं. तसेंच श्री. शंकराजी नारायण ह्यांच्या समाधीची व्यवस्था नीट राहावी म्हणून रु. १८०० उत्पन्नाचीं गांवें इनाम दिलीं.

त्यांच्या पत्नी जीजीसाहेब या विंचूरकर घराण्यांतील. जीजीसाहेबांची धर्मावर अत्यंत श्रद्धा, प्रेमळ अंतःकरण व जुन्या आर्यस्त्रीप्रमाणें राहाणी यांमुळें त्या सर्वांच्या आदरास पात्र झाल्या. रावसाहेबांची कारकीर्द १८७४ ते १९२२ जुलैपर्यंत ४८ वर्षे झाली, व अशी प्रदीर्घ कारकीर्द सचिव घराण्याला तोंपर्यंत लाभली नव्हती. त्यांनीं आपल्या अंगच्या नियमितपणा, कामाची तडफ, दक्षता इत्यादि गुणांनीं ब्रिटिश अधिकाऱ्यांवर उत्तम वजन राखलें होतें. संस्थानची सर्वांगीण प्रगति करून

रावसाहेबांनीं पुणें वाड्यांत देह ठेविला. त्यांचे मागून त्यांचे एकुलते एक चिरंजीव म्हणजे हल्लींचे राजेसाहेब हे गादीवर आले.

### ११ राजा श्रीमंत सर रघुनाथराव शंकरराव ऊर्फ बाबासाहेब, के. सी. आय. ई.

भोर संस्थानचे हल्लींचे सुविद्य व सुविख्यात अधिपति हे नवयुग-प्रवर्तक होत. श्रीमंत हे "बाबासाहेब" या नांवानें सर्वांना माहीत आहेत. त्यांचा जन्म भोरच्या राजवाड्यांत भाद्रपद व. ८ शके १८०० म्हणजे २० सप्टेंबर १८७८ मध्यें झाला. श्रीरामकृपेनें सचिवघराण्याला औरस संततीचा लाभ झाला व त्यामुळें त्यांच्या मातापितरांना तसेंच सर्व प्रजाजनांना अत्यंत आनंद झाला.

श्रीमंत बाबासाहेबांना पांचवे वर्ष लागतांच त्यांच्या प्राथमिक शिक्षणास सुरवात झाली. श्रीमंतांना त्यांच्या मातोश्रीकडून गोष्टीरूपानें धार्मिक शिक्षणाचा चांगलाच लाभ झाला व त्याचे सुपरिणाम कायमचे झाले. त्यांचें मौजीबंधन स. १८८७ सालीं चैत्र शु. ११ शके १८०८ मध्यें मोठ्या थाटानें पार पडलें.

रावसाहेबांच्या बरोबर श्रीमंत बाबासाहेब पुण्यास असतांना दरबार व समारंभ यांस उपस्थित होत असत. १८८८ च्या जानेवारींत ड्यूक ऑफ कॅनॉट यांच्या निमंत्रणावरून बाबासाहेब आपल्या वडिलांबरोबर समारंभास गेले होते. त्यावेळीं बाबासाहेबांचा सभाधीटपणा व तरतरीतपणा पाहून ड्यूक ऑफ कॅनॉट यांना फार आनंद झाला.

१८९० सालीं बाबासाहेबांच्या इंग्रजी शिक्षणास सुरवात होऊन, त्याकामीं लिमये मास्तरांची योजना झाली. दोन इयत्ता झाल्यावर बाबासाहेबांना पुणें हायस्कूलमध्यें घालण्यांत आलें. ह्या दुय्यम शिक्षणाचे कालांतच त्यांचा प्रथम विवाह सरदार विंचूरकर यांचे कन्येबरोबर १ जून

१८९३ रोजीं भोरास मोठ्या थाटानें झाला. ते १८९९ मध्यें मॅट्रिक पास झाले व त्याच सालीं त्यांना कन्यारत्न झालें.

सन १९०० सालापासून श्रीमंत बाबासाहेब सुप्रसिद्ध डेक्कन कॉलेजांत जाऊं लागले व ते १९०१ मध्यें कॉलेजची पहिली परीक्षा उत्तीर्ण झाले व इंटरमध्यें गेले; पण त्यांची प्रकृति लहानपणापासून अशक्त असल्यानें व पुढें डोळे बिघडल्यानें त्यांना नाइलाजास्तव कॉलेज सोडणें भाग पडलें. पण स्वस्थ न बसतां त्यांनीं प्रसिद्ध कायदेपंडितांबरोबर कायद्याचा अभ्यास करण्यास सुरवात केली व त्यांत बरेंच प्रावीण्य मिळविले व त्याचा उपयोग साहजिकच पुढें ऑ. मॅजिस्ट्रेटचें काम करितांना त्यांना आला. त्यांना लहानपणापासूनच नित्य दिनचर्या लिहिण्याची संवय आहे. क्रमिक पुस्तकांबरोबरच त्यांनीं निरनिराळ्या विषयांवरील इंग्रजी व मराठींत लिहिलेलीं पुस्तकें वाचिलीं व त्यांची वाचनाची आवड अद्यापही तशीच आहे. कोणतेंही उत्तम पुस्तक निघो कीं तें यांनीं घेतलें नाहीं असें क्वचित् घडतें. सरस्वतीचे ते दृढ उपासक आहेत. तत्त्वज्ञान, धर्म वगैरे गहन विषयांची त्यांना फारच गोडी असल्यानें, अद्यापही त्यांचे टेबलावर अशाच विषयावरचीं चार दोन पुस्तकें तरी सहज दिसून आलींच पाहिजेत. विशेष गाजावाजा न करितां शुद्ध धार्मिक आचरण करण्याची त्यांना फारच आवड.

१८ जुलै १९२२ रोजीं श्रीमंतांना राज्याधिकार मिळाले व त्या वेळेपासून आजतागायत आपल्या संस्थानची व आपल्या प्रजेची सर्वांगीण उन्नति कशी होईल याकडेच त्यांचें सारखें लक्ष लागलें आहे. कांहींही व कोठेंही एखादी उत्तम कल्पना अगर वस्तु दिसो ती कल्पना अगर वस्तु श्रीमंतांनीं आणिली नाहीं असें होत नाहीं. स्वतः सुविद्य व बहुश्रुत असल्यानें राज्यकारभाराचे निरनिराळे घटकही तसेंच चांगले असावेत अशी

त्यांची अहर्निश इच्छा असते. प्रजेला न्याय कसा मिळेल व प्रजा संतुष्ट कशी राहील, याकडे त्यांचें सतत चित्त असतें.

नरेंद्र-मंडळामध्यें त्यांचा प्रवेश १९२३ मध्यें दक्षिणेंतील कांहीं संस्थानच्या गटाचे प्रतिनिधि म्हणून झाला व १९२४ मध्यें व १९२७ मध्यें पुन्हा तेच या गटातर्फे निवडून आले. यावरून इतर संस्थानिकांचा यांच्यावरचा विश्वास सहज दिसून येतो. त्यांच्या या सातवर्षांच्या अवधींत आपल्या परीनें त्यांनीं नरेंद्र मंडळांत उत्तम कामगिरी केली. पुढें १९४० सालीं भोर संस्थानला स्वतंत्र स्थान नरेंद्रमंडळांत मिळालें.

१९२७ सालीं ९ तोफांच्या सलामीचा वंशपरंपरा मान ब्रिटिश सरकारकडून भोरच्या अधिपतींना बहाल करण्यांत आला. १९३५ सालीं "राजा" ही वंशपरंपरा पदवी प्राप्त झाली. १९४१ सालीं कें. सी. आय. ई. या बहुमाननिदर्शक पदवीचा लाभ श्रीमंतांना झाला.

श्रीमंतांनीं फावल्या वेळेंत देशपर्यटनही पुष्कळ करून बहुविध ज्ञानाची प्राप्ति करून घेतली. सन १९३० व १९३७ सालीं विलायतच्या दोन सफरी करून पौर्वात्य व पाश्चिमात्य Culture चें यथार्थ ज्ञान मिळविलें.

श्रीमंतांनीं बदलत्या काळाबरोबर राज्यकारभारांत जरूर त्य सुधारणा केल्या. १९२८ सालीं कायदेमंडळ स्थापन करून प्रजेला आपलीं गाऱ्हाणीं मांडण्यास वाव करून दिली. हें कायदेमंडळ २१ सभासदांचें होतें. त्यांत १० सरकारी व १० बिनसरकारी सभासद व संस्थानचे दिवाण हे अध्यक्ष होते. १९४२ सालीं लोकनियुक्तांचें कायदेकौन्सिल अमलांत आणलें. त्यांतील २३ सभासदांपैकीं ५ सरकारी अधिकारी व ५ सरकारनियुक्त बिनसरकारी इसम व उरलेले १३ लोकनियुक्त अशा तऱ्हेनें लोकनियुक्तांचें बहुमत असलेलें कौन्सिल देऊन एक वर्षही लोटलें नाहीं तों १ डिसेंबर १९४३ पासून लोकनियुक्तांपैकीं एक मंत्री नमून त्याकडे सोंपीवखात्यांचा कारभार दिला आहे. यावरून श्रीमंतांची

प्रजेच्या न्याय्य आकांक्षा पुऱ्या करण्याची किती तत्परता असते तें सहज दिसून येतें.

स्थानिक स्वराज्य संस्थांची वाढ चालू असून भोरच्या म्युनिसिपालिटींत लोकांचेंच बहुमत आहे. शिरवळ व पाली गांवासाठीं नोटिफाईड एरिया कमेट्या स्थापन केल्या आहेत. कौन्सिलमध्यें व लोकलबोर्डांत हरिजनांना स्वतंत्र स्थान दिलें आहे. कौन्सिलमध्यें व स्त्रियांच्यासाठीं एका सुविद्य विदुषीची नेमणूक केली आहे. हरिजनांना जरूर त्या सर्व सवलती दिल्या असून, त्यांच्या शिक्षणाकडें विशेष लक्ष दिलें जातें.

प्रजेच्या जंगलासंबंधींच्या तक्रारी मांडण्यासाठीं एक जंगलकमेटी नेमली असून तिचें काम चालू आहे. युद्धपरिस्थितीमुळें धान्य व इतर पदार्थांची टंचाई भासतांच श्रीमंतांनीं पुढें होऊन व जरूर ती रक्कम देऊन धान्याची उत्तम सोय केली. खाजगी खर्चासाठीं अगदीं जरूरीपुरती रक्कम रु. १०००० घेऊन रुपये पंचवीस हजार आपण होऊन प्रजेच्या हितासाठीं कमी घेण्याचें ठरविलें व गतसालापासून त्याचा विनियोग लोकहितासाठीं केला जात आहे. तसेंच वरील नव्वद हजारांचे रकमेंत दिल्लीच्या नरेंद्रमंडळाच्या बैठकांच्या प्रवासासाठीं होणारा खर्च व दरबारउपयोगी खातीं या वरील खर्चाचा समावेश होतो. संस्थानचें सन १९४२-४३ सालचें उत्पन्न रु. ७०३३५६।३।४व खर्च रु. ६३२६८९ ।६।८ असा आहे.

श्रीमंतांना पहिल्या कुटुंबापासून पुत्रप्राप्ति झाली व तेच सदाशिवराव ऊर्फ भाऊसाहेब. तेच युवराज असून सुविद्य व धर्मशील आहेत. ते मुंबई विश्वविद्यालयाचे ग्रॅज्युएट आहेत. आपल्या वडिलाबरोबर युरोपचा प्रवास त्यांनीं केला आहे. त्यांना आबाराजे नांवाचे पुत्र असून त्यांचा व्रतबंध १९४३ सालीं मोठ्या थाटानें भोरला झाला. दुसऱ्या कुटुंबाचे दोन मुलगे बापूसाहेब व रावसाहेब. बापूसाहेब हे इंटरआर्टस् पास असून

रावसाहेब हे सेकंड एलएल. बी. ला यंदा बसले आहेत. एकुलती एक कन्या श्रीमंत बेबीराजे ह्या मॅट्रिक असून त्या बनारस हिंदु विश्वविद्यालयाच्या इंटरचा अभ्यास करीत आहेत. त्यांचा विवाह कुरुंदवाड थोरली पातीचे अधिपति श्रीमंत बाळासाहेब पटवर्धन यांचेबरोबर जून १९४१ मध्यें झाला. त्यांचे नांव श्रीमंत सौ. विजयादेवी असें ठेवण्यांत आलेलें आहे. त्यांना उषाराजे नांवाची कन्या आहे.

श्रीमंत राज्यावर आल्यावर त्यांनीं आपल्या प्रजेचें शिक्षण सुकर व्हावें या दृष्टीनें मोफत प्राथमिक शिक्षणाची सोय केली. तसेंच तालुक्याच्या मुख्य गांवीं दवाखाने काढले. भोरला आधुनिक शक्य त्या सुखसोयी असाव्या या दृष्टीनें विजेच्या दिव्यांची भाटघरहून वीज आणून सोय केली.

श्रीमंतांचे मनांत आपल्या संस्थानांत उद्योगधंदे असावेत ही कल्पना प्रथमपासून होती. पण त्याला मूर्त स्वरूप अलिकडे येऊन भोरजवळ लक्ष्मी टेक्स्टाइल्स मिल्स, राजा रघुनाथराव मिल, पेपरमिल व तंबू कारखाना ह्यांचीं कामें सुरू झालेलीं आहेत. यांच्या वाढीला लागणारें जरूर तें सर्व साहाय्य श्रीमंतांनीं दिलेलें आहे. व अशा प्रकारचें साहाय्य नवीन येणाऱ्या कोणाही धंद्याला देण्यांत येईल असें श्रीमंतांनीं वेळोवेळीं जाहीर केलें आहे.

आपल्या संस्थानांत एक तरी साखरेचा कारखाना निघावा ही श्रीमंतांची फार दिवसांची इच्छा व त्यासाठीं जरूर ते सर्व प्रयत्न चालू आहेत. पण उसाला जरूर असणारें पाणी मिळत नसल्यानें अडचण आली आहे. तीही दूर करण्याबद्दल ब्रिटिश सरकारशीं वाटाघाट चालू आहे.

श्रीमंत बाबासाहेब यांची आजवरची २२ वर्षांची यशस्वी कारकीर्द अशीच वृद्धिंगत होत जाणार यांत शंका नाहीं. श्रीमंतांच्या आगचें

सौजन्य, न्यायप्रियता, निरलस काम करण्याची तयारी, भूतदया व दातृत्व व इतर अनेक गुणसमुच्चयामुळें सर्वांचीं मनें त्यांचेकडे सहज आकर्षिलीं जातात. श्री व सरस्वती यांचा हा विलोभनीय संगम क्वचित् दृष्टोत्पत्तीस येतो पण श्रीप्रभु रामचंद्राच्या कृपेमुळें सचिव घराण्यांत तो उत्कट रीतीनें पहावयास मिळतो.

---

# आठघरे वैद्य घराणें.

एके काळीं आपल्या या आसेतुहिमाचल अशा विस्तृत सबंद भारतवर्षाच्या राजकारणाचीं सर्व सूत्रें हालविण्याचा मान मिळविणाऱ्या या इतिहासप्रसिद्ध पुणें शहराचा उगम "पुणें वाडी" नांवाच्या अगदीं लहानशा वस्तीपासून झालेला आहे. या वाडीला पुढें स्वराज्याच्या काळांत कसबें पुणें म्हणूं लागले. अर्थात् सर्वसाधारणतः हल्लीं कसबा पेठ या नांवानें प्रसिद्ध असणाऱ्या पुणें नगरपालिकेच्या विभागास ही संज्ञा होती व हीच पुणें शहरची सर्वांत जुनी वस्ती होय. या पुणें वाडींत हल्लींची व त्याही काळची जागृत ग्रामदेवता म्हणजेच स्वयंभू श्रीकसबा गणपती ही होय. या ग्रामदेवतेच्या आसमंतातच त्यावेळीं देशस्थ ऋ. ब्राह्मणांचीं ढेरे, ढेकणें, वैद्य, वगैरे आठच घराणीं नांदत होतीं व या गोष्टीचें निदर्शक म्हणून या सर्व घराण्यांस आठघरे असें संबोधूं लागलें. पैकीं फक्त वैद्यांचेंच घराणें अद्याप हें उपपद आपलें आडनांवापुढें कागदोपत्रीं लावीत असतें. या घराण्याचा इतिहास थोडक्यांत असा आहेः—

श्रीकसबा गणपतीचें देवालयानजीकच प्रसिद्ध मुत्सद्दी दादोजी कोंडदेव हे महाराज शहाजी राजे यांचे लालमहाल* नांवाचे वाड्यांत रहात होते.

---

* श्रीशिवाजी महाराजांनीं शाहिस्तेखानास येथेंच फजित केलें. हल्लीं या वाड्याच्या जागेवर नगरपालिकेचा जिजामाता बाग आहे.

तेथेंच शहाजी राजे यांनीं राजमाता जिजाबाईसह क्षत्रिय कुलावतंस गोब्राह्मणप्रतिपालक, स्वराज्यसंस्थापक शिवाजी महाराज यांस शिक्षणासाठीं ठेविलें होतें. आपल्या पुत्राच्या सत्कार्यास ईश्वरी प्रसादानें यश यावें व त्यास ईश्वरानें सुबुद्धि द्यावी वगैरे हेतू मनांत धरून "यतो धर्मस्ततो जयः" याला अनुसरून सदरचे आठघरे देशस्थ ऋग्वेदी ब्राम्हणांस मातुश्री जिजाबाईंनीं अनुष्ठानें सांगितलीं. पुढें स्वराज्यस्थापना झाल्यानंतर ब्राम्हणांच्या या तपश्चर्येबद्दल व सत्पात्र म्हणून कुटुंबपोषणार्थ इनामें करून देण्यांत आलीं. तीं सर्व इनामें खुद्द पंतप्रधान पंडित बाळाजी बाजीराव यांनीं सातान्यास जाऊन स्वत: विनंती करून श्रीछत्रपती शाहू महाराज यांजकडून सनदापत्रें करून देवविलीं. तीं मौजे नेरें, दापोडी हीं गांवें व खडकीस जमिनी व कांहीं नक्त नेमणुकीच्या रूपानें अद्याप वैद्यांच्या घराण्यांत चालू आहेत, व हें घराणें हल्लीं आठघरे वैद्य इनामदार म्हणून प्रसिद्ध आहे. यांचें गोत्र काश्यप; आश्वलायन सूत्र; शाकल शाखा; कुल-देवता कोल्हापूरची जगदंबा श्रीमहालक्ष्मी; जोतीबा व जेजुरीचे खंडेराय; यांजकडे चैत्र, श्रावण, आश्विन व माघ महिन्याचे पौर्णिमेस कुळधर्म असतात व नैमित्तिक असा स्वाम्यांचा ऊर्फ साडेसात माणसांचा कुळधर्म असतो. या घराण्याची सूर्यनमस्कार, अग्निहोत्र, सप्तशतीचे पाठ वगैरे-बद्दल ख्याती आहे. या घराण्यांत धन्वंतरीसारखे नामांकित वैद्यक्रिया करणारे कै. भाऊसो आठघरे वैद्य होऊन गेले. मूळ पुरुषापासून हल्लीं सातवी पिढी औरस पुरुषसंतती चालू आहे. पैकीं पांचव्या पिढींतील पुरुष हे रा. ब. गोविंद महादेव वैद्य आठघरे एम्.बी.ई. हे अधिवेशनाचे स्वागताध्यक्ष होते. यांचा जन्म ता. १६-२-१८७७ चा असून ते पेन्शन घेऊन डेक्कन जिमखान्यावर नवीन बांधलेल्या बंगल्यांत रहात आहेत. निव्वळ मॅट्रिकपर्यंतच शिक्षण झालें असून केवळ आंगच्या कर्तबगारीवर

मिलिटरी अकाऊंट्स खात्यांत विनपगारी उमेदवारांपासून तों सर्वांत वरिष्ठ अशा कंट्रोलरच्या स्वतंत्र अधिकाराचे जागेपर्यंत (पगार रु.१९५०) चढले. पेन्शन घेतल्यापासुन पर्वती, आळंदी, डेक्कन ए. सोसायटी, डेक्कन जिमखाना, दे. ऋ. ब्राम्हण संस्था, पुणें व मध्यवर्तिमंडळ वगैरे अनेक संस्थांतून विश्वस्त, पंच वगैरे अनेक नात्यानें सार्वजनिक कामें करीत आलेले आहेत. सातव्या पिढीतील चि. जयवंतराव लढाईत आघाडीवर आहेत. चि. बंडोपंत एल्‌एल्. बी. पर्यंत शिक्षण घेऊन हल्लीं सरकारी नोकरींत आहेत. बाकीची मंडळी आपली इनामदारी संभाळून आपल्या मूळच्या कसबा पेठेंतील वाड्यांतच असतात.

---

## तांबवेकर घराण्याचा इतिहास

हें घराणें मूळचे सातारा जिल्ह्यांत कऱ्हाड तालुक्यांत "तांबवे" म्हणून गांव आहे तेथील जोशी व कुलकर्णी वृत्तीवर, क्वचित् सावकारी वृत्तीवर राहात असत. यांच्या मूळ पुरुषाचें नांव जरी उपलब्ध नाहीं तरी सोबत जोडलेल्या वंशवृक्षावरून बरींच वर्षें मागें जातां येतें. त्यानंतरची खात्रीची माहिती जरीं उपलब्ध नसली, तरी हें घराणें त्याच्या सावकारी वृत्तीमुळें मोंगलाचें धामधुमीमध्यें तांबवे सोडून पुण्यास पेशव्यांचे आश्रयास येऊन राहिले. पुणें मुक्कामीं ते आपली उपजीविका सावकारीवरच असलेले करीत दिसून येतें. कारण त्यांनीं श्रीमंत माधवराव पेशवे यांचे वेळीं सरकार दरबारीं म्हणजे खुद्द पेशवे सरकारास कर्ज दिल्याचा दाखला सांपडतो व त्यामुळें पेशव्यांच्या दरबारी त्यांना 'नाईक' असे म्हणत. यावरून त्यांचें बस्तान चांगलें बसून त्यांनीं पुण्यास व आजुबाजूस घरें व जमिनी बऱ्याच मिळविल्या. त्यांपैकीं कांहीं अद्यापि त्यांचे घराण्यांत चालू आहेत. पेशव्यांचे दरबारप्रसंगीं त्यांना मानाचें बोलावणें येत असे.

हिंदुधर्म-शास्त्राप्रमाणें यात्रेस गेले वेळीं त्यांनीं पंढरपूर, तुळजापूर, काशी वगैरे ठिकाणीं बऱ्याच मिळकती संपादन केल्याचें कागद-पत्रांवरून दिसून येतें. परंतु मध्यंतरीचे काळांत त्यांच्या पुत्रहीनपणामुळें आणि त्या वेळच्या समजुतीप्रमाणें त्यांना त्यांच्यांच कुळांमधील मिळेल तो अज्ञान मुलगा दत्तक घेणें भाग पडे व अशा अज्ञान मुलाच्या मातांना कोणावर तरी सर्व कारभार सोपवून तीर्थयात्रा करणें आवडे. यामुळें बरीचशी मिळकत अज्ञान व अज्ञानी बायका यांच्या अज्ञानाचा व भोळेपणाचा फायदा घेऊन नाहींशी झाली. रा. नरसोबा नाईक, मोरोबा नाईक, तसेंच रामचंद्र विठ्ठल यांचा उल्लेख पेशवे दप्तरांत सावकार व प्रतिष्ठित नागरिक म्हणून स्पष्ट आला आहे. अलीकडे इंग्रजी अंमल सुरू झाल्यावर सुद्धां रा.रामचंद्र चिमणाजी नाईक तांबवेकर हे वकिलाचें काम करीत. व त्यांचें राहतें घर पुण्यांत सरदार ढमढेरे यांचे बोळांत होते. हल्लीं पुण्यास रा. सखाराम बळवंत तांबवेकर हे त्यांचे जवळचे वंशज आहेत. त्यांचेकडे घर जमिनीवृत्ति पूर्वापार चालू आहे. यांच्यापैकीं एक घराणें पेशव्यांचे काळीं गुजराथेंत गेले व तेथें हल्लीं प्रसिद्ध देवस्थान ' डाकोर ' आहे त्या देवाचें व गांवांचे तें तेव्हांपासून इनामदार असून, त्यास सरदार किताब मिळालेला आहे.

पुण्यांत भांग्यामारुतीसमोर मोठा वाडा आहे व कोथरूड येथें बाग आहे. ती हल्लीं सखाराम बळवंत तांबवेकर यांचेकडे आहे. पुण्याहून रा. दामोदर रामचंद्र तांबेकर हे कापडाचे अडते म्हणून सोलापूरीं आले. त्यांचें बस्तान तेथें बरें होतें, परंतु त्यांच्या अकालीं निधनानें व त्यांची मुलें अज्ञान असलेमुळें त्यांचा धंदा बंद पडला व त्यांच्या मुलांना जेम-तेम शिकून नोकरी पहावी लागली. परंतु अशा अडचणींतूनसुद्धां त्यांचा तिसरा व सर्वांत लहान मुलगा रा. केशव दामोदर तांबेकर यांचे एल्. बी. पर्यंत शिक्षण त्यांचे मधले वडील बंधू रा. मनोहर दामोदर

तांबेकर यांनीं आपल्या तुटपुंज्या नोकरीच्या वेतनांतून केलें. पुढें लवकरच सदरहू केशव दामोदर तांबेकर हे सोलापूर जिल्ह्यांत एक सुप्रसिद्ध वकील झाले व त्यांनीं बराच पैसा मिळविला. कोणतेही सार्वजनिक चळवळींत त्यांचे नांव पुढें असे. रा.ब. मुळें, सर्जन नाडगीर वगैरे त्यांचे सहाध्यायी होते. कांहीं दिवस ते सरकारी वकील होते; परंतु त्यांच्या अकालीं मृत्यू-मुळें सोलापूरची फारच हानी झाली. त्यांचे पश्चात् त्यांचा मुलगा रा. मुकुंद केशव तांबवेकर हा हल्लीं मुंबईस ग्रँट मेडिकल कॉलेजमध्यें शिक्षण घेत आहे.

---

# रावेर येथील राजे देशमुख घराण्याचा संक्षिप्त इतिहास

या घराण्याचा इतिहास जहांगीर–शहाजहान बादशहाच्या वेळेपासून-चा उपलब्ध आहे. शहाजहान बादशहानें रावेर व एदलाबाद या दोन परगण्यांची देशमुखी व देशपांडेगिरीची सनद या घराण्यांतील पूर्वजांस दिलेली असून, त्यावेळेपासून हीं दोन्हीं वतनें वंशपरंपरा या घराण्याकडे चालत आलेलीं आहेत. मूळ सनद नाईक यांच्या नांवाची आहे. सदरहू नाईक घराणें मूळचें बऱ्हाणपूर येथील असून त्यांस बऱ्हाण-पूर येथें " जिझिया कर " माफीची सनद मिळालेली आहे. या नाई-कांच्यापैकीं त्रिंबक नाईक यांस पुत्र–संतान नव्हतें; फक्त एक मुलगी होती; तिचा विवाह रामचंद्रराव बादशाही हलकारे, औरंगाबाद, यांचेशीं झालेला होता. शेवटीं पुत्र–संतान नसल्यामुळें त्रिंबक नाईकानीं आपलें वतन व सर्व मालमत्ता, घरेदारें, बागबागीचे वगैरे सर्व आपले जांव-यास बक्षीस करून दिले, व तेव्हांपासून हे वतन औरंगाबाद येथील

रामचंद्रराव बादशाही हलकारे यांचेकडेस चालू होऊन, त्यांचे वंशजाकडेच अद्याप चालत आलेलें आहे.

२. याप्रमाणें, हें वतन मिळाल्यानंतर, रामचंद्रराव औरंगाबाद सोडून रावेर येथें कायमचे राहण्यास आले; आणि त्यापुढें मग रावेर येथेंच त्यांनीं कायमची वस्ती केली. सदरहू रामचंद्रराव यांचे वडील जगज्जीवनराव यांस निजामउल्मुल्क यांजकडून राजा हा किताब व मनसब मिळाली होती; तशीच पुढें रामचंद्रराव यांसही मिळाली. वर लिहिल्याप्रमाणें मूळ मोंगल बादशहाकडून मिळालेलें हें वतन या घराण्याकडेच नंतर मराठी राजवटींतही चालूं राहिलें, व शेवटीं मराठेशाहीनंतर इंग्रजी अंमल सुरू झाला, तेव्हां इनाम कमिशननें चौकशी करून, नंतर ह्या वतनाची सनद कै. राजे रघुनाथराव जयकृष्णराव देशमुख यांच्या नांवानें दिली; मात्र राजे रघुनाथराव हे या घराण्यांत दत्तक आलेले असून, सदरहू दत्तकास त्यावेळीं ब्रिटिश सरकारची परवानगी न घेतल्यामुळें, रावेर तालुक्यांतील वतन खालसा झालें; व एदलाबाद पेटा त्यावेळीं शिंदे सरकारच्या ताब्यांत असून त्यांच्याकडून दत्तकास परवानगी मिळालेली असल्यामुळें एदलाबाद पेटयांतील वतन कायम राहिलें.

३. देशमुखी व देशपांडेगीरी, याशिवाय पाटिलकी व कुलकर्णीपणाचीं वतनेंही या घराण्यांत आहेत. हल्लीं या सर्व वतनाचे व जिनगीचे वारस सरदार राजे रामचंद्रराव रघुनाथराव देशमुख बी.ए. एलूएल्. बी व राजे जगज्जीवनराव रघुनाथराव देशमुख बी. एस्सी. ( शेतकी ) हे दोघे बंधु आहेत. सरदार राजे रामचंद्रराव यांस दक्षिणेंतील पहिल्या प्रतीच्या सरदारकीचीं वस्त्रें सन १९४० सालांत मिळालेलीं असून, ते पहिल्या वर्गाचे मॅजिस्ट्रेटही आहेत.

गोत्र—भारद्वाज, सूत्र—आश्वलायन.

---

# विंचूरकर [ विंचूर, नाशिक, पुणें ]

विंचूरकरांचें मूळ आडनांव दाणी. यांचें गोत्र मौन. प्रवर ३–मौन, वीतहव्य व सावेतस असें आहेत. सूत्र आश्वलायन, शाखा शाकल. मूळचे सासवड, जि. पुणें येथील राहणारे. तेथें यांजकडे दाणीपणाचें वतन व बराच जमीनजुमला होता. या घराण्यांतील पुरुषांमध्यें वांटणी होऊन ते विभक्त झाले. त्यांपैकीं थोरल्या शाखेंत राजेबहादर ( मालेगांव व नाशिक येथील घराणें—संस्थापक नारो शंकर हे होऊन गेले, व कनिष्ठ शाखेंतील शिवाजीपंत ऊर्फ शिवदेव यांचे पुत्र विठ्ठल हे विंचूरकर घराण्याचे संस्थापक होऊन गेले. शिवदेवराव यांस पुत्र तीन–आबूराव, त्रिंबकराव व विठ्ठलराव. यांपैकीं विठ्ठल शिवदेव यांचा जन्म इ. स. १६९५ मध्यें झाला. विठ्ठलराव शिवदेव हे आपल्या भावाप्रमाणें कांहीं उद्योग करून वडिलांच्या प्रपंचास कांहींच मदत करीत नसल्यामुळें, त्यांस वडिलांनीं घरांतून बाहेर घालविलें. विठ्ठल शिवदेव हे करारी व बाणेदार वृत्तीचे असल्यामुळें, ते घर सोडून साताऱ्यानजीक मढें येथें अमृतस्वामी या नांवाचे मोठे अधिकारी सत्पुरुष होते त्यांजकडे जाऊन राहिले. अमृतस्वामींनीं समाधि घेतल्यानंतर त्यांचे शिष्य पावनबोवा यांजजवळ सेवा करून होते. या पावनबोवांनीं सातारच्या छत्रपति शाहू महाराजांचे एक आश्रित बक्षी म्हणून होते त्यांजकडे विठ्ठल शिवदेवांची शिफारस केल्यावर, बक्षींनीं त्यांस आपल्या घरींच घोड्यांची देखरेख करण्याकरितां नेमिलें. एकदां छत्रपति शाहू महाराजांबरोबर शिकारीकरतां जाण्याची संधि साधून एका रानडुकरास मंडळीच्या मदतीनें घेरलें. तें रानडुक्कर आपणांस वेढणाऱ्या माणसांवर हल्ला करून निसटून जाण्याचा प्रयत्न करीत असतांना, विठ्ठल शिवदेवानें त्यास धरून आपल्या दोन मांड्यांत दाबून ठेविलें व हातांनीं त्याचे कान पकडले. अशा स्थितींत शाहू महाराजांनीं त्या रानडुकराच्या

शरीरांत आरपार भाला खुपसला. याप्रमाणें शिकार यशस्वी झालेली पाहून महाराजांस फार आनंद झाला व त्याबरोबरच विठ्ठल शिवदेव यांचें धैर्य, शौर्य व शक्ति यांबद्दल कौतुक वाटून व बक्षीकडून त्यांस मागून घेऊन आपल्या आश्रयास ठेवून दहा घोड्यांची शिलेदारी प्रथम बहाल केली. विठ्ठल शिवदेव वय वर्षे २१ असतांना त्यांचा विवाह केंजळगांवच्या कुलकर्ण्यांच्या कन्येशीं झाला.

इ. स. १७२० मध्यें जंजिऱ्याचा नबाब शिद्दी साद यांचें बंड मोडण्याकरितां छत्रपतींनीं चिमाजीअप्पा पेशवे यांस पाठविलें. यावेळीं त्यांजबरोबर विठ्ठल शिवदेव यांस पाठविलें. तेथें विठ्ठल शिवदेव यांनीं मर्दुमकी गाजवून त्या नबाबाचें शिर कापलें. हें वर्तमान चिमाजीअप्पांनीं शाहू महाराजांस समक्ष सांगितल्यावरून महाराजांनीं त्यांस पेशवे यांच्या दिमतीस दिले. माळव्याचा सुभेदार दाऊतखान याजवरील स्वारींतहि श्रीमंत बाजीरावसाहेब पेशवे यांजबरोबर जाऊन बऱ्हाणपुरास युद्धांत त्यांस पळवून लावलें. पुढें बाजीरावानें दिल्लीकडे आपला मोर्चा वळविला. तेव्हां हरएक प्रसंगीं विठ्ठल शिवदेव हे पुढाकार घेत असत. त्यांनीं पेशव्याबरोबर व स्वतंत्रपणें उत्तर हिंदुस्थानांत व दक्षिणेंतहि अनेक ठिकाणीं व प्रसंगीं पराक्रम गाजवून, पेशव्यांकडून व दिल्लीपतीकडून कित्येक महालांच्या व गांवांच्या देणग्या मिळविल्या. इ. स. १७४४ मध्यें नंदाजी दरेकर या नांवाच्या एका पेंढाऱ्यानें विंचूर येथें बंड उभारलें होतें, त्याचा बंदोबस्त करण्याकरितां पेशव्यांनीं विठ्ठल शिवदेव यांस पाठविलें. तें बंड त्यांनीं पूर्णपणें मोडलें; म्हणून श्री. नानासाहेब पेशव्यांनीं खूष होऊन तेंच विंचूर गांव त्यांस वंशपरंपरा इनाम म्हणून देऊन चालू केलें. तेव्हांपासून यांचें आडनांव दाणी हें लोपून विंचूरकर म्हणून प्रसिद्धीस आलें. इ. स. १७६७ मध्यें विठ्ठल शिवदेव हे वैकुंठवासी झाले. हे अत्यंत धार्मिक वृत्तीचे होते. लढाईवर जातांना ते श्रीमद्भाग-

वत व महाभारत या ग्रंथांच्या अत्यंत बारीक अक्षरांनीं लिहिलेल्या कागदांच्या वळकुल्या एक उजव्या दंडांत व दुसरी डाव्या दंडांत बांधीत असत; व गळ्यांत नृसिंहकवच, सप्तशती, स्तोत्रें वगैरे भूर्जपत्रावर अत्यंत बारीक अक्षरांनीं लिहिलेलीं चांदीच्या ताइतांत घालून त्या ताइतांचें एक गांठलें करून गळ्यांत घालीत असत. हे ग्रंथ व गांठलें त्यांचे घराण्यांतील विद्यमान वंशजांपैकीं श्रीमंत गिरजाबाईसाहेब भ्रतार शिवदेवराव (ऊर्फ वहिनीसाहेब) विंचूरकर यांजजवळ आहे. आपले गुरु श्री-अमृतस्वामी यांच्या आज्ञेवरून भीमा व नीरा या दोन नद्यांच्या संगमावर असलेलें सुप्रसिद्ध नृसिंहदेवाचें क्षेत्र, नीरा नरसिंगपूर येथील नृसिंह मंदिराचा जीर्णोद्धार विठ्ठल शिवदेव यांनीं पुष्कळ द्रव्य खर्चून केला.

विठ्ठल शिवदेव यांस रुक्मिणीबाई व यमुनाबाई या दोन स्त्रिया होत्या. त्यांस एकंदर पांच पुत्र होते. पहिलीपासून ( १ ) शिवाजी, (२) नरसिंगराव, ( ३ ) मल्हारराव ( ४ ) बाजीराव व दुसरीपासून ( ५ ) खंडेराव. वडील जिवंत असतांनाच शिवाजी विठ्ठल यांनींही पराक्रम दाखवून पेशव्यांकडून स्वतंत्र तैनात व पालखीचा मान मिळविलेला होता. पुढें या पांचहि बंधूंत परस्पर वैमनस्य उत्पन्न होऊन तंटे सुरू झाले. तेव्हां पेशवे सरकारांनीं ज्येष्ठ शिवाजी विठ्ठल यांजकडे सरंजाम वगैरे चालवून इतर बंधूंस नेमणुका वगैरे करून दिल्या. नरसिंगराव विठ्ठल यांस ही योजना पटली नाहीं. अखेर त्यांस माळव्यांतील अष्टें येथें अटक करून कैदेंत ठेविलें. तेथेंच त्यांचा अंत झाला व त्यांच्या स्त्रीनें तेथेंच सहगमन केलें. मल्हाररावहि आपल्या वडिलांच्या पश्चात् लवकरच वारले. त्यांची स्त्री इ. स. १८३७ मध्यें वारली. बाजीराव हे स्वच्छंदी, चैनी व ऐषारामी वृत्तीचे असल्यामुळें चमकले नाहींत. त्यांची स्त्री लवकरच वारल्यामुळें त्यांस धक्का बसून त्यांतच त्यांचा अंत झाला.

खंडेराव विठ्ठल हे अशक्त परंतु बुद्धिमान् होते. ते शिवाजी विठ्ठलांच्या आश्रेत राहून घरचें कामकाज पहात असत.

शिवाजी विठ्ठल यांनींहि वडिलाप्रमाणेंच अनेक प्रसंगीं पराक्रम, शौर्य व मुत्सद्देगिरी दाखवून पेशवे व इतर राजे, महाराजे यांजकडून देणग्या मिळविल्या. ते इ. स. १७९४ मध्यें निपुत्रिक वारले. त्यांनीं खंडेराव विठ्ठल यांचा एकुलता एक मुलगा नरसिंगराव यांस दत्तक घेऊन संस्थान पुढें चालवावें असें कित्येकांनीं त्यांस सुचविलें, परंतु तें त्यांनीं मानलें नाहीं, म्हणून नाना फडणविसांच्या मध्यस्थीनें पेशवे यांस आपला सरंजाम, सरदारी वगैरे आपला कनिष्ठ बंधु खंडेराव विठ्ठल यांजकडे चालविण्या-बद्दल विनंती केली. त्याप्रमाणें शिवाजी विठ्ठल यांच्या मृत्यूनंतर खंडे-रावांचे नांवें सरंजाम व सरदारी वगैरे झाली. त्यावेळीं खर्ड्यांचे लढाईंत इतर सरदारांबरोबर खंडेराव विठ्ठल गेले. परंतु तेथून प्रकृति–अस्वास्थ्या-मुळें ते पेशव्यांच्या परवानगीनें नरसिंगपुरास गेले व तेथेंच त्यांचा अंत सरदारी व सरंजाम मिळाल्यावर दोन महिन्यांतच झाला.

खंडेरावांचे पुत्र नरसिंह खंडेराव यांजकडे सरंजाम व सरदारी पेश-व्यांनी चालू गेली. हेहि चांगलें योद्धे व मुत्सद्दी होऊन गेले. यांनींहि अनेक प्रसंगीं लढाया करून विजय मिळविलें. ते सन १८०८ च्या एप्रिल महिन्यांत निपुत्रिक वारले. त्यांची स्त्री रमाबाई इनें केशवराव नांवाच्या एका मुलास पेंशव्यांचें परवानगीनें दत्तक घेतलें व त्याचें नांव विठ्ठल असें ठेविलें. विठ्ठल नरसिंहांनीं एकनिष्ठपणें पेशव्यांची सेवा केली अनेक अड-चणींच्या प्रसंगीं त्यांस मदत केली. ते वयाच्या ४१ व्या वर्षी १८३६ मध्यें वारले. त्यावेळीं त्यांस तीन पुत्र ( १ ) रघुनाथराव ऊर्फ अण्णा-साहेब. ( २ ) कृष्णराव व ( ३ ) माधवराव असे होते. यांपैकीं रघुनाथ-राव विठ्ठल यांचा जन्म इ. स. १८२४ मध्यें झाला. १८२७ मध्यें त्यांची मातुश्री वारली. १८३५ मध्यें त्यांचा विवाह झाला. १८३६ मध्यें त्यांचे

वडील वारले.त्यांचे धाकटे सापत्न बंधु कृष्णराव विठ्ठल यांचा विवाह १८३८ सालीं झाला. रघुनाथरावांचें दुसरे बंधु माधवराव विठ्ठल हेहि सापत्नच होतें. रघुनाथरावांच्या दोन्ही सापत्न मातुश्रींनीं आपआपल्या मुलांकरितां सरंजामी वगैरे उत्पन्नांतून वांटण्या करून मिळाव्यांत म्हणून इंग्रज सरकारांत अर्ज केले. त्यावरून काम चालून वांटण्या करण्याचें घाटत आलें. इतक्यांत रघुनाथराव हे सज्ञान झाले म्हणून त्यांच्या मालमत्तेची व्यवस्था पूर्वी कारभारी पहात होते त्यांस दूर करून रघुनाथराव ऊर्फ अणणसाहेब हे स्वतः आपल्या उत्पन्नाची व्यवस्था पाहूं लागले त्यांस सरकारांनीं दिवाणी फौजदारी व मुलकी अधिकार दिले. त्यांनीं आपल्या स्वतःच्या नांवाचे स्टांपपेपर करून त्यांचें उत्पन्न स्वतःकडे घेण्याचा अधिकार त्यांस सरकारनें दिला. पुढें हे सर्व अधिकार त्यांनीं आपले बंधु कृष्णराव विठ्ठल यांजकडे दिले. कृष्णरावांनींहि फार चांगलें काम केल्याबद्दल सरकारी अधिकाऱ्यांनीं फार प्रशंसा केली. सन १८५० च्या सुमारास अण्णासाहेबांचे कुटुंब वारलें, त्यामुळें ते फार उदास झाले. नंतर एक वर्षभर त्यांनीं तीर्थयात्रा केल्या व विंचुरास सन १८५१ मध्यें परत आले. याच सुमारास इनाम कमिशन सुरू झालें व त्यानें इनाम सरंजाम वगैरेची चौकशी सुरू केली. जंगम मालमत्तेची वांटणी या तिघा भावांत यथाविभाग केली. १८५२ मध्यें कृष्णराव विठ्ठल यांस पुणें येथें सदर अमीन म्हणून नेमिलें. त्यांचे कनिष्ठ बंधु माधवराव यांनीं कायद्याचा अभ्यास केल्यामुळें सरकारानें त्यांस विंचूर संस्थान जहागिरीचे जज्जाचे अधिकार दिलें. अण्णासाहेब यांस कोपरगांव येथील श्रीशुक्रेश्वर कचेश्वर वासुदेव वगैरे देवस्थान कमिटीचे सरकारनें सरपंच नेमिले. त्याचप्रमाणें श्रीज्ञानेश्वर महाराजांकरितां नानज हा गांव ( जि. अहमदनगर ) इनाम चालत आहे तेंहि अण्णासाहेबाकडे वहिवाटीकरितां सरकारनें दिलें. इनाम कमिशनच्या कामांत अण्णासाहेबांनीं सरकारास फार मदत केली.

इ. सन १८५७ च्या बंडांत माधवरावांनीं सरकारास मदत केली म्हणून
प्रथम त्यांस डेप्युटी मॅजिस्ट्रेट नेमिलें व नंतर खानदेश व अहमदनगर
जिल्ह्यांत पहिला वर्ग माजिस्ट्रेट नेमिले. १८६२ व १८६४ या वर्षी त्यांस
मुंबई कायदे कौन्सिलांत सरकारनियुक्त सभासद नेमिलें. देशमुख, देशपांडे,
देसाई वगैरे परगणे व इतर वतनदारांच्या वतनचौकशींकरितां एक कमिशन
सरकारनें नेमिलें. त्यांत माधवराव एक सभासद होते. रघुनाथराव अण्णा-
साहेब हे दरम्यान तीर्थयात्रेस गेले होते ते परत सन १८६५ मध्यें आले.
१८६५ मध्यें माधवरावांचें नांव पहिल्या प्रतीच्या सरदारपटांत दाखल
केलें. सन १८६६ मध्यें त्यांस अक्कलकोट संस्थानचे दिवाण नेमिलें.

ता. २९-१०-१८६६ रोजीं पुण्यास सरदारांचा मोठा दरबार
भरला होता. त्यावेळीं त्या वेळचे गव्हर्नर सर बार्टल फ्रियर यांनीं
व्हिक्टोरिया राणीसरकारतर्फे अण्णासाहेब विंचूरकरांना " सी. एस्.
आय्. " ( कंपॅनियन ऑफ दि मोस्ट एक्झॉल्टेड आर्डर ऑफ् दि
स्टार ऑफ् इंडिया ) हा किताब बहाल केला. माधवराव हे अक्कलकोटास
गेल्यामुळें त्यांचे येवले येथील मॅजिस्ट्रेटी अधिकार कृष्णराव विठ्ठल यांस
दिले. अण्णासाहेबांचें दुसरें कुटुंब १८८० मध्यें वारलें. त्यामुळें त्यांचें
मन फार खिन्न झालें. विंचूरकरांच्या सरंजामाबद्दल सरकारनें पुष्कळ वार-
काईनें चौकशी करून अखेर रघुनाथराव अण्णासाहेब यांजकडे सुमारें
साठ हजार रुपये उत्पन्नाचा सरंजाम चालवावा असें विलायत सरकारनें
ठरविलें. अण्णासाहेबांस पुत्रसंतति नसल्यामुळें त्यांनीं सरकारकडे दत्त-
काची परवानगी मागितली, परंतु ती नाकारली गेली. १८७७ मध्यें
कृष्णरावांचें दुसरें कुटुंब वारलें. लवकरच माधवरावांची द्वितीय पत्नीहि
वारली. १८७९ च्या सप्टेंबरांत कृष्णराव विठ्ठल हे वारले. त्यांस पुत्र
चार – (१) भगवंतराव (२) नरसिंगराव (३) विठ्ठलराव व
(४) रामराव ऊर्फ बाळासाहेब असे होते. भगवंतराव हे १८६७ मध्यें

वारलें. नरसिंगराव हे निजामसंस्थानांत एक मोठे अधिकारी होते ते १८९० मध्यें वारलें. विठ्ठलराव कृष्णराव ऊर्फ नानासाहेब सन १९०५ मध्यें निपुत्रिक वारले. माधवराव विठ्ठल यांस ( १ ) गणपतराव ऊर्फ आबासाहेब व ( २ ) लक्ष्मणराव ऊर्फ अण्णासाहेब असें दोन पुत्र होते. रघुनाथराव अण्णासाहेब यांनीं रामराव कृष्णराव यांचे एक पुत्र भास्कर-राव यांस सन १८८९ मध्यें विधिपूर्वक दत्तक घेतलें व त्याचें नांव शिवदेवराव ऊर्फ भाऊसाहेब असें ठेविलें परंतु सरकारनें हा दत्तकपुत्र मंजूर केला नाहीं त्यामुळें सरंजाम त्यांजकडे चालू केला नाहीं. रघुनाथराव विठ्ठल हे सन १८८९ मध्यें वारल्यानंतर सन १८५२ व १८५६ च्या विलायतसरकारच्या ठरावाप्रमाणें त्यांचा निम्मा सरंजाम सरकारानें खालसा केला. व बाकीचा निम्मा सरंजाम वशंपरंपरेचा ठरवून कृष्णराव विठ्ठल यांचे ज्येष्ठ चिरंजीव नरसिंगराव व माधवरावविठ्ठल यांचे ज्येष्ठ चिरंजीव गणपतराव यांमध्यें बरोबरीनें वाटला गेला.

नरसिंगराव कृष्णराव हे १८९० सालीं वारले. त्यांचा सरंजाम त्यांचे एकुलते एक पुत्र भगवंतराव यांचे नांवें झाला. परंतु ते १८९५ मध्यें वारले म्हणून तो सरंजाम त्यांचे चुलते विठ्ठलराव कृष्ण ऊर्फ नानासाहेब यांजकडे गेला. तेहि सन १९०५ सालीं वारले. नंतर तो सरंजाम त्यांचे धाकटे सापत्न बंधु रामराव ऊर्फ बाळासाहेब यांजकडे चालू झाला. रामराव ऊर्फ बाळासाहेबांस एकंदर पुत्र तीन–भास्करराव, गोपाळराव व चंद्रशेखर होते. त्यापैकीं भास्करराव हें अण्णासाहेबांच्या मांडीवर दत्तक पुत्र म्हणून गेले. बाकीचे दोघे पुत्र हे अगदीं अल्पवयीं असतां-नाच वारले. त्यामुळें बाळासाहेबांनीं मुंबईचे सुप्रसिद्ध डॉक्टर कृष्णराव दाणी यांच्या एका चिरंजीवास सन १९२६ मध्यें विधिपूर्वक सरकारी परवानगीनें दत्तक घेतलें व त्याचें नांव खंडेराव ऊर्फ बापूसाहेब असें ठेविलें. रामराव कृष्ण हे मनमाड येथें पुष्कळ वर्षें पहिला वर्ग मॅजिस्टेट

होते. ई १९२७ मध्यें पुण्यांत वारले. त्यांच्या पश्चात् त्यांचे दत्तक चिरंजीव खंडेराव रामराव ऊर्फ बापूसाहेब यांनीं वडिलाप्रमाणेंच नांवलौकिक व मानसन्मान संपादन केलेला आहे. ते बी. ए. एलएल. बी. असून पुणें येथें त्यांनीं पहिला वर्ग मॅजिस्ट्रेटाचें काम पांच वर्षें करून तें नुकतेच सोडलेलें आहे. ते अनेक सार्वजनिक व उपयुक्त संस्थांमध्यें काम करीत आहेत. नुकतीच ' कृष्णा शुगर मिल्स, कित्तूर " या नांवाची लिमिटेड कंपनी यांनीं पुढाकार घेऊन काढून तिचे ते एक मॅनेजिंग एजंट आहेत. सदर कंपनीचें काम उत्तम व्यवस्थितपणें यांनीं चालविलें आहे. ट्रस्ट ऑफ इंडिया ॲन्शुअरन्स कंपनी लिमिटेडचे ते मॅनेजिंग डायरेक्टर होते. यांचें नांव वडिलांप्रमाणें दक्षिणेंतील पहिल्या प्रतीच्या सरदारपटांत दाखल झालेलें आहे. यांचा विवाह सन १९२६ मध्यें मिरज (धाकटी पाती) च्या संस्थानिकांच्या एका कन्येशीं झालेला आहे. सरकारी मंजुरीनेंच हे दत्तक घेतले गेल्यामुळें बाळासाहेबांच्या मृत्यूनंतर त्यांचा सरंजाम यांजकडे चालू झाला. ज्ञानेश्वर महाराजांचा गांव नानज याची वहिवाट यांजकडे चालत असून आळंदी देवस्थान कमिटीचे ते एक सभासद आहेत.

वर उल्लेखिलेले माधवराव विठ्ठल यांचे ज्येष्ठ पुत्र गणपतराव माधवराव ऊर्फ आबासाहेब हे विंचूरास पहिला वर्ग मॉजिस्ट्रेट होते. १९०१ मध्यें मुंबई कायदेमंडळांत सरकारनें सरकारनियुक्त सभासद म्हणून निवड केली. ते परमपूज्य बादशहा सातवे एडवर्ड यांच्या राज्याभिषेकसमयीं इंग्लंडांत हिंदुस्थानचे एक प्रतिनिधि म्हणून गेले होते. त्यावेळीं त्यांस एक चांदीचें पदक दिलें. यांचे धाकटे बंधू लक्ष्मणराव हे सन १९०४ मध्यें निपुत्रिक वारले. गणपतरावांनीं, पुत्रसंतती नसल्यामुळें रावबहादूर तात्यासाहेब कुमठेकर यांचे कनिष्ठ चिरंजीवास सरकारी परवानगीनें विधिपूर्वक दत्तक घेतलें व त्याचें नांव नारायणराव ऊर्फ भय्यासाहेब असें

ठेविलें. आबासाहेब वारल्यावर सरंजामी वगैरे उत्पन्न भय्यासाहेबांकडे चालू झालें, नारायणराव ऊर्फ भय्यासाहेब बरीच वर्षे नाशिक व विंचूर येथें पहिला वर्ग मॅजिस्ट्रेटचे काम करीत आहेत. ते सन १९३६ सालीं डेक्कन सरदार, इनामदार मतदार संघातर्फे सभासद म्हणून बिनविरोध मुंबई कायदेमंडळांत निवडून आले. नाशिक डिस्ट्रिक्ट लोकलबोर्डाचे ते प्रेसिडेंट होते. अनेक सरकारी, निमसरकारी व सार्वजनिक उपयुक्त संस्थांमध्यें ते प्रामुख्यानें भाग घेत आहेत. यांचें नांव पहिला वर्ग सरदारपटांत दाखल झालेले आहे त्यांच्या या सार्वजनिक कामगिरीवर खूष होऊन सरकारनें त्यांस नुकताच "सी. बी. ई." हा किताब बहाल केला आहे. हे मुंबई युनिव्हर्सिटीचे ग्रॅज्युएट असून त्यांनीं एक वर्षपावेतों एल्‌एल्. बी. चाहि अभ्यास केला. परंतु तो अभ्यासक्रम त्यांस पुरा करितां आला नाहीं. यांस दोन पुत्र आहेत. त्यांची नांवें गणपतराव ऊर्फ आबासाहेब व लक्ष्मणराव ऊर्फ अप्पासाहेब अशीं आहेत. आबासाहेब विमानखात्यांत शिक्षण घेऊत हल्लीं लष्करी पायलट म्हणून काम करीत आहेस. धाकटे अप्पासाहेब हे हल्लीं शाळेत शिकत आहेत. भय्यासाहेब हे कोपरगांव येथील शुक्रेश्वर कचेश्वर वासुदेव वगैरे देवस्थान कमिटीचे सरपंच आहेत. त्यांच्या पत्नी श्री. सौ. लक्ष्मीबाईसाहेब या सुविद्य असून अनेक सार्वजनिक कार्यांत त्या प्रामुख्यानें भाग घेत असतात.

वर उल्लेखिलेलें शिवदेवराव रघुनाथ ऊर्फ भाऊसाहेब विंचूरकर हे मुंबई युनिव्हर्सिटीचे ग्रॅज्युएट होते. क्रिकेट, टेनिस वगैरे खेळांत ते फार प्रवीण होते. पुणें येथील पी. वाय्. सी. हिंदु जिमखान्याच्या संस्थापकांपैकीं ते एक प्रमुख होते. ते अत्यंत लोकप्रिय असून दिलदार अंतःकरणाचे होते. श्रीमंत पंत सचीव ( यांचे सासरे ) यांनीं मुंबईचे गव्हर्नर नामदार लॉर्ड नॉर्थकोट यांस एक ॲट्‌होम पार्टी दिली; त्यावेळीं भाऊसाहेबांस नामदारसाहेबांनीं दिल्ली दरबारचें पदक

अर्पण केलें. इंदूर संस्थानांत मुलकी खात्याच्या मंत्र्याचे मदतनीस व सुभेदार होते. तिकडेच कामावर असतांना अगदीं अल्पवयांतच त्यांनीं इहलोक सोडला. त्यांस तीन कन्याच फक्त होत्या. त्यापैकीं एक दक्षिण हैद्राबादचे श्री. राजे शामराज राजवंत बहादर रायरायान यांना दिलेली आहे. दुसरी भोरसंस्थानचे युवराज राजे भाऊसाहेब पंत सचीव यांस दिलेल्या युवराज्ञी म्हणून आहेत. तिसरी अल्प वयांतच वारली. भाऊसाहेबांचे पश्चात् त्यांची द्वितीय पत्नी श्री. गिरजाबाईसाहेब ऊर्फ वहिनीसाहेब ह्या आपल्या उत्पन्नाची व्यवस्था आपल्या मुखत्यारामार्फत उत्तम रीतीनें पहात असतात. त्यांजकडे विंचूर व सायखेडें या इनाम गांवांतील $\frac{1}{3}$ हिस्सा व इतर वतनी उत्पन्न मिळून सुमारें रु. १२००० चें आज चालू आहे. याशिवाय श्रीनरसिंगपूर देवस्थानाची व्यवस्था पहाण्याचे काम परंपरेनें याजकडे असल्यानें सरकारी नक्त नेमणूक दरसाल रु. ५६५५ ची सरकारी तिजोरींतून यांस मिळत असते. श्री. वहिनीसाहेब ज्येष्ठशाखेच्या प्रतिनिधि असल्यामुळें वडीलकीचे हक्क, मानपान, वहिवाट वगैरे त्यांजकडे चालू आहेत.

---

# विंचुरकर ( दाणी ) घराण्याचा वंशवृक्ष

- विठ्ठल शिवदेव (१६९५–१७६७)
  - शिवाजीराव १७२७–९४
    - अमृतराव
    - गणपतराव
  - नरसिंगराव
  - मल्हारराव
  - बाजीराव
  - खंडेराव १७९५
    - नरसिंगराव (१७८३–१८०८)
      - विठ्ठलराव तात्यासाहेब(दत्तक)१७९६-१८३६
        - रघुनाथराव १८२४-१८८९
          - शिवदेवराव १८८४-१९१८ पत्नी गिरजाबाई
        - कृष्णराव १८२८-१८७९
          - भगवंतराव १८६७
          - नरसिंहराव मृ.१८९०
            - भगवंतराव १८९५
          - विठलराव १९०५
          - रामराव १९२७
            - खंडेराव (द१९२६)
        - माधवराव १८३२-
          - गणपतराव
            - नारायणराव(द)
              - गणपतराव
              - लक्ष्मणराव
          - लक्ष्मणराव

# मुजुमदार ( प्रभुणे ), पुणें.

मुजुमदार हें आडनांव अधिकारावरून पडलेलें आहे. मूळचें उपनांव प्रभुणे असें आहे. गोत्र अगस्ति. अगस्ति, दार्ढच्युत व इध्मवाह हे तीन प्रवर. ऋग्वेदी, देशस्थ, सूत्र–आश्वलायन, शाखा–शाकल, मूळ संपादक नारो गंगाधर व विनायक गंगाधर यांनीं मौजे लोणीभापकर ता. भिमथडी, जि. पुणें येथील कुळकर्णपणा व ज्योतिषपणा असें संपादन केलें. या घराण्याच्या कुलदेवता ( १ ) लोणीभापकर येथील श्रीबहिरोबा, ( २ )मोरगांव येथील श्रीगणपति ( ३ )तुळजापूर येथील श्रीभवानी व ( ४ ) जेजुरी येथील श्रीखंडोबा अशा चार आहेत.



श्री. सरदार गं. ना. ऊर्फ आबा-साहेब मुजुमदार, सी. आय्. ई. पुणें

मुजुमदार या अपभ्रष्ट शब्दाचा मूळ शब्द मजमुअदार ( Auditor of Accounts, Chancellor of the Exchequer) असा असून तो फारशी भाषेंतील आहे. ' मुजुमदार ' याचा संस्कृत पर्याय शब्द ' अमात्य ' असा आहे. प्रथम सर्व राज्याची जमाबंदी-उत्पन्नाची व्यवस्था पहाणें हें काम होतें. परंतु पुढें तें बदलून कोणत्याहि राजपत्रावर, सनदेवर व आज्ञापत्रावर शेवटीं मुजुमदारांचें निशाण 'आज्ञाप्रमाण' हें मजमूदस-

रांत बार करून, स्वहस्तानें लिहावयाचें याप्रमाणें हें काम श्रीशाहू-महाराजांपासून पेशवाई अखेरपावेतों याच घराण्याकडे अव्याहत चालत आलें. मजमूदप्तर फार मोठें होतें. परंतु तें इनामचौकशीच्या वेळीं सरकारनें नेलें. तें हल्लीं पुणें येथील 'पुणें दप्तर व एलिनेशन आफीस' यांत महालवार लागलेलें आहे.

शहाजीराजे भोसले यांस सुपें व पुणें प्रांतांची जहागीर विजापूरच्या बादशहाकडून मिळाल्यानंतर,त्यांनीं नारो गंगाधर ऊर्फ अयाबा मुजुमदार यांच्या पूर्वजांस सुपें प्रांताच्या मजमूचा अधिकार दिला होता असें तत्कालीन पत्रव्यवहारावरून दिसतें. पुढें श्रीशिवाजीमहाराजांचे नातू शाहूमहाराज दिल्लीहून परत महाराष्ट्रांत आले त्यावेळीं श्रीमंत ताराबाई राज्यकारभार करीत होत्या व त्यांचा सेनापति धनाजी जाधव हा मोठा बलाढ्य सरदार होता. त्याच्या आश्रयास असलेले बाळाजी विश्वनाथ भट यांस भेटून त्यांशीं मसलत करून धनाजीस मोगलाईंत पाठवून दिलें.नंतर नारो गंगाधरांनीं बाळाजी विश्वनाथाची भेट शाहूमहाराजांशीं करविली.महाराजांबरोबर साताऱ्यास जाऊन राज्याचा बंदोबस्त करून व्यवस्था पाहूं लागले. त्यावेळीं बहिरोपंत पिंगळे हे पेशवे होते. त्यांजवर महाराजांची कांहीं कारणामुळें गैरमर्जी झाली म्हणून त्यांनीं बाळाजी विश्वनाथ यांस इ. स. १७१४ मध्यें पेशवाईचा अधिकार वस्त्रें दिलीं. त्याच वेळीं नारो गंगाधर यांस सबंध राज्याच्या मजमूचा अधिकार व वस्त्रें दिलीं. नारो गंगाधर ऊर्फ अयाबा मुजुमदार हे सन १७५४ मध्यें वारले. त्यांचे पुत्र नीलकंठ नारायण ऊर्फ अन्याबा मुजुमदार हे सन १७६१ मध्यें वारले. त्यांचे पुत्र नारो नीलकंठ ऊर्फ तात्या मुजुमदार यांची कारकीर्द इ. स. १७६१ ते १८३३ पर्यंत झाली. नारो नीलकंठ यास पुत्र तीन= ( १ ) नीलकंठ ऊर्फ रावसाहेब हे वडील हयात असतांनाच वारले. ( २ ) जीवनराव ऊर्फ अण्णासाहेब व ( ३ ) गणपतराव याप्रमाणें होते.

जीवनराव **नारायण** हे वारल्यानंतर त्यांचे पुत्र **मोरेश्वरराव ऊर्फ** बाळासाहेब होते, ते इ. स. १८८० मध्यें वारले. त्यांची विधवा स्त्री सन १९१८ मध्यें वारली. त्यांस पुढें संतति नाहीं. **गणपतराव नारायण** यांस एक पुत्र **लक्ष्मणराव** नांवाचा होता परंतु ते दोघेहि वारले. पुढें संतति नाहीं. नारो नीलकंठ यांचे ज्येष्ठ पुत्राचे पुत्र **कृष्णराव नीलकंठ ऊर्फ भाऊसाहेब मुजुमदार** यांची कारकीर्द इ. स. १८३३ ते १८७१ पर्यंत झाली. त्यांचे चिरंजीव **नारायणराव ऊर्फ तात्यासाहेब** हे १८ वर्षांचे असतांनाच इ. स. १८८७ सालीं वारलें. नारायणरावांची स्त्री ( श्री. सरदार बाळासाहेब चंद्रचूड यांची कन्या ) श्री. लक्ष्मीबाईसाहेब यांनीं भाऊबंद प्रभुणे घराण्यापैकीं श्रीधर पांडुरंग प्रभुणे वय वर्षें ६ यांस सरकारमंजुरीनें शास्त्रविधिप्रमाणें सन १८९२ सालीं दत्तक घेतलें व त्याचें नांव **गंगाधरराव** ऊर्फ **आबासाहेब** असें ठेविलें. हेंच या घराण्याचे विद्यमान प्रतिनिधि असून त्यांस तीन पुत्र आहेत. त्यांचीं नांवें ( १ ) नारायणराव ऊर्फ रावसाहेब, ( २ ) नीलकंठराव ऊर्फ दादासाहेब व (३)गणपतराव ऊर्फ बाळासाहेब. याप्रमाणें आहेत. यांचें शिक्षण अनुक्रमें मॅट्रिक, बी. ए. व एम्. एस्सी. याप्रमाणें झालेलें आहे. इंग्रज-सरकारानें प्रथम सन १८२७ मध्यें पेशवाईतील संस्थानिक, सरंजामदार, इनामदार, वतनदार यांचे त्यावेळच्या परिस्थितीवरून वेगवेगळे गट करून, त्या त्याप्रमाणें त्यांचीं नांवें पहिल्या, दुसऱ्या व तिसऱ्या प्रतींच्या सरदारपटांत दाखल केलीं. त्यांत मुजुमदार घराण्याच्या प्रतिनिधींचीं नांवें दक्षिणेंतील दुसऱ्या प्रतीच्या सरदारपटांत वेळोवेळीं दाखल करण्यांत आलीं. श्री. गंगाधरराव ऊर्फ आबासाहेब यांचें नांव १९०८ सालीं दुसऱ्या प्रतीच्या सरदारांत प्रथम दाखल केलें गेलें. परंतु पुढें त्यांच्या अनेक क्षेत्रांतील सार्वजनिक व उपयुक्त कामगिरीवर नजर देऊन सरकारानें त्यांचें नांव सन १९२८ मध्यें पहिल्या प्रतीच्या सरदारांत

दाखल केलें. इतकेंच नव्हें तर पुढें सन १९३५ च्या जानेवारीच्या पहिल्या तारखेस त्यांस सी. आय्. ई. हा दुर्मिळ किताब बहाल केला. श्रीमंत आबासाहेब यांचा संबंध सुमारें १०८ निरनिराळ्या क्षेत्रांतील सार्वजनिक उपयुक्त संस्थांशीं अध्यक्ष, उपाध्यक्ष, कार्याध्यक्ष, सल्लागार, विश्वस्त ( Trustee ), कार्यकारी मंडळाचे सभासद, चिटणीस इत्यादि नात्यांनीं होता व आहे. डेक्कन सरदार व इनामदार मतदारसंघातर्फें मुंबई कायदे-कौन्सिलांत दोनदां सन १९२३ व १९२६ सालीं ते निवडून आले. याप्रमाणें ते सात वर्षें सदर कायदेमंडळांत सभासद होते. त्यानंतर १९३० सालीं दिल्ली–सिमला येथील मध्यवर्ती कायदेमंडळांत मुंबईइलाखा सरदार व इनामदार संघातर्फें सभासद म्हणून बिनविरोध निवडले गेले. तेथेंहि त्यांनीं १९३१ ते १९३४ अखेर चार वर्षें, मुंबई कायदेमंडळामध्यें केल्याप्रमाणें, आपल्या मतदारसंघाची उत्कृष्ट व सर्वमान्य अशी सेवा केली. या संधीमुळें वतन, इनाम, सरंजाम, जमीनसत्ताप्रकार, त्यांचे अनेक पोटभेद इत्यादि विषयांचा अभ्यास व व्यासंग त्यांस फार घडला. या बाबतींत त्यांचें मत व माहिती प्रमाण म्हणून मानली जाते. श्री. आबा-साहेबांचा संगीतशास्त्र व कला यांचा व्यासंग जबरदस्त आहे. याहि बाब-तींत ते एक मोठे अधिकारी गणले जातात. इतिहाससंशोधनाचें कार्य ते आज सतत ३२ वर्षें करीत आहेत व त्याकरितां त्यांनीं फारशी भाषेचाहि अभ्यास केलेला आहे.

---

## मुजुमदार ( प्रभुणे ) घराण्याचा वंशवृक्ष

नारो गंगाधर ऊर्फ अयाबा
| मृ. १७५४
नीळकंठ ऊर्फ अन्याबा
| मृ. १७६१
नारायण ऊर्फ तात्या
| मृ. १८३३

- नीळकंठराव (रावसाहेब)
  - कृष्णराव (भाऊसाहेब) — मृ. १८७१
    - नारायणराव ( तात्यासाहेब ) — मृ. १८८७
      - गंगाधरराव ऊर्फ आबासाहेब ( विद्यमान )
        - नारायणराव
          - माधवराव
          - प्रतापराव
        - नीळकंठराव
        - गणपतराव
- जीवनराव (अण्णासाहेब)
  - मोरेश्वर (बाळासाहेब) — मृ. १८८०
- गणपतराव
  - लक्ष्मणराव

# शिरवळकर देशपांडे घराणें



माहिती देणार–गोविंद पांडुरंग देशपांडे, पुणें पेठ शनवार, घर नं. ६५ऐतिहासिक घराणें शिरवळकर देशपांडे. नरसो तुकदेव ऊर्फ बजाबांदादा देशपांडे शिरवळकर यांची श्री. पेशवे दरबारांतील महत्वाची कामगिरी सन १७७३ ते सन १८२८.

हें देशपांडे घराणें भोर संस्थानमधील शिरवळ गांवचें आहे. यांचा पंधरा पिढ्यांचा वंशवेल उपलब्ध आहे. तो या सोबत दिला आहे. त्यावरून हें घराणें सुमारें ४०० वर्षांपूर्वीचें जुनें असावें. मूळ पुरुषापासून झालेल्या सर्व पिढ्या, औरस संततीच्या आहेत. मूळ पुरुषापासून १० वे पुरुष, "नरसो तुकदेव ऊर्फ बजाबादादा शिरवळकर," हे पेशवाईत, श्री. सवाई माधवराव यांचे कारकीर्दीत विशेष प्रसिद्धीस आले होते. पेशवेदरबारांत [1]मुत्सद्दी, फौजेचें काम व अरब सिबंदीचें काम पाहात होते. त्यावेळच्या झालेल्या महत्त्वाच्या सर्व घडामोडींत व राजकारणांत, व नानाफडणीस यांचे सर्व कारस्थानांत हे प्रामुख्यानें असत. हे नानाफडणीस यांचे उजवे हात व सरकारी सल्लागार असून त्यांच्यावर नानांचा फार विश्वास होता. त्याप्रमाणें कै. बजाबा

शिरवळकर यांनीं फार मोठीं महत्त्वाचीं कामें पार पाडलीं आहेत. नानाफडणीस यांचेबरोबर यांनाही तुरुंगवास भोगावा लागला. हे मोठे बुद्धिमान्, धोरणी, मुत्सद्दी, स्वामिनिष्ठ व निःस्वार्थी असे होते. (१) महाडचें[2] कारस्थान ( २ ) [3]नानाफडणीस व तत्पक्षीय मंडळीस कैद, व त्यांचीं घरें, इस्टेट वगैरे जप्ती. ( ३ ) श्री. अमृतराव[4] यास पेशवेपदप्राप्ती संबंधीं कारस्थान. ( ४ ) प्रसिद्ध बारभाईचें[5] कारस्थान (१७७३) या सर्व कारस्थानांत हे होते हें सिद्ध होतें. सदर बजाबादादा हे प्रस्तुत लेखकाचे चुलत पणजे होत.

शिवाय कै. बजाबादादा शिरवळकर यांचे हातचीं लिहिलेलीं कांहीं पत्रें उपलब्ध झालीं आहेत. त्यांपैकीं इंग्रजी अधिकारी यास एक पत्र इ. सन १८२६ चें ( यादी असें म्हटलें आहे ) इंग्रज अधिकारी यास. असें आहे कीं, नानाफडणीस पुण्यांत त्यांचे वाड्यांत वारले (सन१८००) त्यावेळीं त्यांचें प्रेत नेण्यास त्यांचेजवळचे अरब सिबंदी, यांनीं त्यांचे पगाराचे थकबाकी येणेंबद्दल त्यांचें प्रेत आडवून ठेवलें. त्या वेळेस कै. रा. बजाबादादा शिरवळकर, हे स्वतः देण्यास जामीन रोख एकतीस हजार पांचशें ३१५०० यास राहून रु. ३१५०० देऊन प्रेत सोडविलें. सदर रुपये कै. नानाफडणीस यांचे कुटुंबाकडून वसूल करून मिळावें.

पत्र दुसरें मोडी नक्कल मि. फाल्गुन व॥ ५ सन सबातिसैन. श्री. शंकरराव रघुनाथराव पंत सचीव यांचें रा. परशराम कृष्ण गोसावी यांस " सुा तिसा तिसेन मयाव अलफबद्दल देणें, त्यास राजेश्री नरसो तुकदेव याजकडील ऐवज रो १३००० घेऊन कर्जपटीचे भरण्यास दिला.

( १ ) सरदेसाईकृत पेशवे दप्तरांतील नि. कागद, ऐतिहासिक घराणीं नं. ४४ ( अनुक्रम नं. २२ ), ( २ ) स. दे. कृत मराठी रियासत उ. भाग पान ३३, ६२, ६३. ( ३ ) स. कृ. उ. भाग, पान ६४, ७३, ७४, १४३. ( ४ ) सदर पान २०८, २०९, ५६१, ( ५ ) सानेकृत पेशव्यांची बखर आवृत्ति ५ पानें १८७, १९९.

पत्र तिसरें नक्कल श्री. अश्वीन शु॥ १० शके १७४३ नरसो तुकदेव यांचे श्रीमंत पंतसचीव यास. श्री. पंत प्रधान यांचे सरकारकडून, संस्थानवर कर्जपटीबद्दल वराता झाल्या त्याचे भरणा झाला, त्याबद्दल खुलासा. नानाफडणीस यांचे मृत्यूनंतर (सन १८००) श्री. बाजीराव पेशवे यांनीं, बजाबादादा शिरवळकर यास नानांचे पक्षाचे म्हणून कैद करून (ही दुसरी कैद) पुरंदर किल्यावर ठेवलें तेथें सोळा वर्षे होते. त्याची सर्व इस्टेट, कागदपत्र वतन वगैरे सर्व जप्त करण्यांत आलें. नंतर पुढें इंग्रजी अंमलाच्या सुमारास सुटून घरीं आलें. व त्यास दरमहा रुपये १०० [1]पोलीटीकल पेनशन त्यांच्या हयातीपर्यंत मिळत होतें. पुढें त्यांचे पश्चात् त्याच्या कुटुंबाच्या नांवें रुपये २० वरील प्रमो मिळत होते. यांची जन्म व मृत्यु वेळ सांपडली नाहीं. परंतु सन १८३० चे सुमारास अगर पुढें लवकरच यांचा अंत झाला असावा. आणखीहि निंबाळकर, फलटण, घोरपडे, थोरात, वाळवे वगैरेंचा पत्रव्यवहार आहे.

यांचे धाकटे बंधु नारोपंत तुकदेव ऊर्फ काका (वंशवेल नं. १०) (लेखकाचे सख्खे पणजे) हे वडील बंधूस मदत करीत असून घरीं शिरवळास होते. शिवाय शिरवळ व वाई प्रांताचे सुभे म्ह. कलेक्टर या दर्जावर होते. पेशवाईत व अव्वल इंग्रजींत होते. सर्व न्यायनिवाडे यांचेकडून होत असत. त्यांचे धाकटे पुत्र केशवराव (वं. वे. नं. १२) हे प्रस्तुत लेखकाचे आजे. त्यांना पुत्र दोन, पांडुरंग (प्रस्तुत ले. वडील) व ) सिताराम (चुलते) हे दोघेही अनुक्रमें पोलीस खात्यांत पो. इ. व इंजीनियरखात्यांत सबइंजिनीयर अशा मोठ्या हुद्यावर होते. उभयतांनीं समाजांत मोठेपण नांवलौकिक व उच्च दर्जा मिळविला. उभयतांनीं शिरवळ येथील श्रीराममंदिराचा मंडप; लोखंडी खांब वगैरे सोपे व

(१) पहा. सरदेसाईकृत ऐतिहासिक घराणीं पुस्तक नं. ४४ क्रमांक नं. २२ पेशवे दप्तरांतील नि. कागद पत्र ता. २७-१०-१८४३.

नगारखाना असें सर्व बांधून देवालयाचा जिर्णोद्धार केला. सदर काम प्रस्तुत लेखकानें स्वहस्तें करून घेतलें.

प्रस्तुत लेखक गोविंदराव पांडुरंग ( वं. वे. नं. १३ ) हे वरील पांडुरंगपंत यांचे तिसरे चिरंजीव आहेत. यांचें चालू वय वर्षें ७३ वें आहे.

जन्म—जानेवारी स. १८७२ शिरवळ सं. भोर.

शिक्षण—मराठी सहा इयत्ता व इंग्रजी मॅट्रिकपर्यंत पुणें न्यू. इं.स्कूल.

व्यवसाय—नौकरी पी. डब्ल्यू. डी. सुपरींटेंडींग इंजिनियर पब्लीक हेल्थ ऑफिस क्लार्क पगार रु. ७५; नौकरी वर्षें २४ टेंपररी; १९३१ सालीं सेवानिवृत्त.

सार्वजनिक सेवाः—दे. ऋ. ब्रा. संस्था स्थापन करणारांपैकीं एक, व कार्यकारी मंडळाचा सभासद म्हणून काम करीत आहे. पुणें जॉली क्लब स्थापणारांपैकीं एक आहे. शिरवळ गांवानजीक तीन मैलांवर असलेल्या पांडव दरींत; जुन्या बुद्धकालीन असलेल्या लेण्यांचा शोध लावला. त्या मातीनें बुजल्या होत्या. तेव्हां त्याचे सर्व खनन करून मोकळ्या केल्या. हीं लेणीं सुमारें १५ आहेत. त्यांत एकांत बुद्धाचा स्तूप आहे. हल्लीं हें फार रमणीय व प्रेक्षणीय स्थळ झालें आहे. सदर लेणीं बघण्यास श्रीमंत सरकार राजेसाहेब पंतसचीव हे आपल्या दरबार मंडळीसह पाहण्यास आले होते. खर्चाबद्दल रुपये ५०० दिले आहेत. रा. ब. काशिनाथ नारायण दीक्षित व रा. आळतेकर इ. संशोधक बनारस हिं. कॉलेज हे येऊन लेणीं पाहून गेले. शिरवळ गांवीं श्री. देवीच्या देवालयाचा मंडप पुढाकार घेऊन बांधला.

---

## शिरवळकर देशपांडे घराण्याची वंशावळ

१ महादाजीपंत– २ विठ्ठलपंत– ३ लुखोपंत– ४ कान्होपंत– ५ लुखोपंत– ७ भीमाजीपंत– ८ भगवंतपंत याप्रमाणें क्रमानें पुत्रसंतति असून त्या पुढील वंशज खालीलप्रमाणें आहेत.



# पारसनवीस, पुणें.

फारशी भाषा लिहिणारा तो फारशीनवीस--या घराण्याकडे पूर्वी
चाकणचा किल्ला होता. परंतु तो पुढें लुटला गेला. त्यावेळीं त्यांच्या-
जवळ असलेले जुने कागदपत्र सर्व नष्ट झाले, त्यामुळें त्या कालाचा इति-
हास उपलब्ध नाहीं. या घराण्याचा वंशवेल शेवटीं दिला आहे. त्यांतलि
बनाजी माधव ऊर्फ निरंजन हे मोठे राजकारणी सत्पुरुष होऊन गेले. त्यांची
कविता छापून प्रसिद्ध झालेली आहे. या निरंजन माधवाचे ज्येष्ठ बंधू
भीमराव तिमाजी हे छत्रपति शाहु महाराजांकडे आश्रयास जाऊन फारशी
भाषेंतील पत्रव्यवहार करण्याकरितां राहिले. तेव्हांपासून यांचें आडनांव
फारशीनवीस—पारसनवीस असें पडलें. श्रीमंत बाजीराव बल्लाळ पेशवे
यांनीं भीमराव बापूजींचे चिरंजीव बापूजी भीमराव यांस फारशी लिहि-
ण्याचे कामाकरितां छत्रपति महाराजांकडून मागून घेतलें. तेव्हां ह्या
घराण्याचे पुरुष पुण्यासच स्थाईक झाले. तेव्हांपासून पेशवाईअखेर-
पावेतों फारशीनवीसाचें काम अव्याहत याच घराण्याकडे चालत आलें.
पेशवेकालीं फारशी भाषेंत पत्रव्यवहार फार मोठा चालत होता. तो सर्व
या पारसनवीसामार्फतच होत असे. या घराण्यांत फारशी भाषा जाणणारे
महापंडित होऊन गेले. त्यामुळें यांचें वजन फार असे.

पारसनीस यांजकडे मूळ मौजे रामडोह, तालुका नेवासे, जि. अहमद-
नगर, या गांवची कुलकर्णी वृत्ति असे. पुढें इनामें व जहागिरी संपादन
केल्या गेल्या.

पारसनवीसांचें मूळ आडनांव एकबोटे, देशस्थ ऋग्वेदी, गोत्र विश्वा-
मित्र, प्रवर तीन विश्वामित्र, अघमर्षण व कौशिक याप्रमाणें आहेत.
कुलदेवता–तुळजापूरची भवानी व बदामीची बनशंकरी अशा दोन
आहेत. उपासना विष्णु–कृष्णाची आहे.

या घराण्यांतील विद्यमान वंशजापैकीं श्री. कृष्णराव केशवराव ऊर्फ बाळासाहेब पारसनवीस हे मुख्य सरंजामदार असून; त्यांचा ज्योतिष-शास्त्राचा व्यासंग व अभ्यास फारच दांडगा आहे. त्यांनीं सांगितलेलें फलित-भविष्य शेंकडों लोकांना पटलेलें आहे. हें ज्ञान त्यांनीं धंदा म्हणून संपादन केलेलें नसून केवळ ज्ञानलालसेनें व हौसेनें केलेलें आहे. यांच्या संग्रहीं असलेल्या जुन्या अमूल्य फारशी पत्रसंग्रहापैकीं कांहीं पत्रें (ब्रिटिश ईस्ट इंडिया कंपनीचे अधिकारी, गव्हर्नर, कर्नल, कॅप्टन, रेसिडेंट वगैरे यांनीं पेशवे दरबारकडे अस्सल फारशी सही शिक्यानिशीं पाठविलेली ) त्यांचें श्री. सरदार आबासाहेब मुजुमदार, सी. आय्. ई. चिटणीस भारत इतिहास संशोधक मंडळ पुणें. यांनीं मराठींत रूपांतर करून मूळासह छापून; सुमारें वीस वर्षांपूर्वीं एका ग्रंथांत प्रसिद्ध केलेलें आहे. ज्योतिष व अध्यात्म विषयास धरून श्री. बाळासाहेब एक मराठी सुबोध काव्यरचना करीत आहेत. तें काव्य फार प्रसन्न, सुगम व माहितीनें भरलेलें असें आहे. तें अद्याप अपूर्ण आहे. हा त्यांचा प्रयत्न अत्यंत स्तुत्य आहे.

## पारसनवीस घराण्याचा वंशवृक्ष



- *बापुजी भिमसिंग
  - कृष्णराव
    - भगवंतराव नक्कल
    - नारायणराव
      - भगवंतराव (अ.मयत)नक्कल
      - बापूजी (दत्तक)
        - कृष्णराव
          - रामराव
            - लक्ष्मण
            - यशवंतराव
          - नारायणराव
            - केशवराव
              - कृष्णराव
                - शामराव
                - शरदचंद्र
                - गोपाळराव
                - गोविंदराव
            - गोविंदराव (द.बनाजीस)
            - नरसिंगराव
            - रामचंद्र
          - विश्वासराव
            - वामन
              - (म)माधवराव
          - बनाजी (काकासाहेब) दत्तक गोविंदराव
            - नारायणराव
              - विष्णु
              - भगवान
              - रावसाहेब
            - बापूराव
              - विनायक
              - शशिकांत
  - भिवराव
    - तिमाजी(न)
    - बापूजी (द.दिले)
    - विश्वास (नकल)

# पुरंदरे ( सासवड, पुणें )

सासवडच्या पुरंदरे घराण्याच्या अनेक शाखा आहेत. त्यांपैकीं फक्त अंबाजी त्रिंबक यांच्या धाकट्या शाखेपुरतीच अत्यंत संक्षिप्त माहिती देण्यांत येत आहे.

जंजिऱ्याचा नबाब हबशी याच्या राज्यांत बाळाजी विश्वनाथ भट हे जमीनदार देशमुख होते. त्यांच्या घराण्यांतील एका कर्त्या पुरुषास हबशीनें गोणपाटांत घालून समुद्रांत बुडविलें. अशा उपद्रवामुळें बाळाजी विश्वनाथ हे कोंकण सोडून चिपळूणबाजूनें फिरत फिरत सासवडास आले. अंबाजी त्रिंबक पुरंदरे यांनीं त्यांस आश्रय व दिलभरंवसा देऊन, सासवडास राहण्याकरितां जागा देऊन सर्व तजवीज केली. उभयतांचें अकृत्रिम प्रेम परस्पराबद्दल होतें. उभयतांनीं एकविचारें धनाजी जाधवाकडे जाऊन रोजगारास राहिले. छत्रपति शाहू महाराज दिल्लीहून परत आल्यावर त्यांची व धनाजी जाधव यांची परस्पर दिलजमाई या उभयतांनीं करून दिली. त्यामुळें महाराजांनीं बाळाजीस सर-सुभेदारी दिली. तें काम त्यांनीं मर्जीप्रमाणें उत्तम केलें म्हणून त्यांस सेनाकर्ते हा किताब दिला व मोकासे गांव दिलें. व अंबाजी त्रिंबक गांवगन्ना वराता देऊन योगक्षेम चालवीत होते. पुढें इ. स. १७१४ मध्यें बाळाजी विश्वनाथास महाराजांनीं पेशवाईचीं वस्त्रें दिलीं; त्यावेळीं अंबाजी त्रिंबक यांस पेशवाईची दिवाणगिरी व हुजूरची मुतालिकी हीं दोन्हीं कामें नेमून वस्त्रें दिलीं व जातीस सरंजाम दिला. त्या सुमारास दमाजी थोरात हिंगणगांवकर व इतर घंडवाले यांच्या उपद्रवामुळें बराच प्रदेश उजाड पडला. पंचवीस तीस कोसावर वस्ती जुजबी राहिली. सरकार आमदनी होईना. म्हणून पेशवे व पुरंदरे यांनीं विचार करून रयत लोकांस कौल देऊन आपण मुलखांत फौज व सरंजामासह फिरूं लागले. त्यामुळें रयतेस भरंवसा

वाटून वसाहत जवळ जवळ होऊन मुलुखाची लावणी होऊन सरकारांत
जमाबंदी उत्पन्न येऊं लागलें. दरम्यान दमाजी थोरातानें पेशवे व पुरं-
दरे यांस धरून व कैदेंत ठेवून फार छळ करूं लागला. तो सर्व सहन
करून कांहीं कारस्थान रचून ते दोघे सुटून पळून आले, व फौज जमा
करून हिंगणगांवीं दमाजीवर चालून जाऊन त्यांस कैद करून आणलें.
त्याची गढी पाडून गांवावरून नांगर फिरविला. याप्रमाणें दमाजीचें बंड
मोडल्यामुळें रयतेस फार सुख झालें. पेशवे व पुरंदरे यांनीं मोंगलाई व
कर्नाटक येथील संस्थानिकांशीं लढाया करून मुलूख काबीज केला.
बुंदेलखंडाचा राजा छत्रसाल यांजवर संकट आलें, तेव्हां श्रीमंत बाजीराव
पेशवे यांजबरोबर अंबाजीपंत पुरंदरे यांनीं जाऊन छत्रसालावर चालून
आलेल्या फौजेचा पराभव केला. त्यामुळें बुंदेले यानें तिजाई वांटणीचा
मुलूख लाखों रुपयांचा सरकारांत दिल्हा. पुढें अंबाजीपंत हे काशी-
यात्रेस जातांना त्यांनीं आपले पुतणे (बंधू तुको त्र्यंबक यांचे पुत्र)
मल्हार तुकदेव ऊर्फ दादोबा यांस आपल्या मोबदल्यांत छत्रपति महा-
राजांजवळ मुतालिकीच्या कामावर ठेविलें. पुढें ते यात्रेहून परत आल्यावर
सन १७३४ मध्यें वारले.

अंबाजीपंताच्या पश्चात् त्यांचे धाकटे पुत्र महादाजी ऊर्फ दादोबा
पुरंदरे व नातू (वडील पुत्र सदाशिवराव यांचा पुत्र) त्र्यंबकराव सदा-
शिव यांजकडे सरंजाम व नेमणुकी, आसाम्या वगैरे पूर्ववत् चालू झाल्या.
अंबाजीपंतांनीं केलेली एकनिष्ठ सेवा मनांत घेऊन पुरंदरे घराण्यांतील
पुरुषांस चिरंजीव अशी पदवी पत्रव्यवहारांतून पेशवे लिहीत असत.

बाजीराव साहेबांच्या मृत्यूनंतर महादाजी अंबाजी यांस, नानासाहेब
पेशव्यांस पेशवाईचीं वस्त्रें दिलीं तेव्हां, दिवाणगिरीचीं व हुजुर-मुतालि-
कीचीं वस्त्रें छत्रपतिनीं दिलीं. महादाजी यांनीं त्रिंबक सदाशिव ऊर्फ
नाना पुरंदरे यांस छत्रपतीजवळ मुतालिकीच्या कामावर ठेवून आपण

पुण्यास आले. निजामुल्मुख मरण पावल्यावर नासरजंगावर मोठा विकट प्रसंग आला, तेव्हां महादाजी अंबाजी यांस सरदारी देऊन फौजेचा सरंजाम दिला व आपणांबरोबर स्वारीस नेलें. महादाजीचे पुत्र नीळकंठ यांस पुणें प्रांताचा सुभा दिला.

सन १७६० मध्यें महादाजी अंबाजी यांच्या मृत्यूनंतर त्यांचे पुत्र नीळकंठ महादेव ऊर्फ आबा पुरंदरे यांस पुढें सरंजाम वगैरे चालूं झाला व त्यांस दिवाणगिरीचीं व मुतालिकीचीं वस्त्रें महाराजांनीं दिलीं. नीलकंठ महादेव यांनीं राक्षसभुवनाच्या लढाईत फार शौर्य दाखविलें. त्यामुळें त्यांस आणखी होन हजार फौजेचा सरंजाम मिळाला. नीलकंठरावांची प्रकृति फार बिघडली. त्यांस पुत्रसंतति नव्हती. म्हणून त्यांनीं त्र्यंबक सदाशिव पुरंदरे यांचे नारायण नांवाच्या धाकट्या पुत्रास दत्तक घेऊन लवकरच ते सन १७६५ मध्यें वारलें. त्यांचे पुत्र महादाजी नीलकंठ ऊर्फ बाबा पुरंदरे यासहि दिवाणगिरीचीं व मुतालीचीं वस्त्रें महाराजांनीं दिलीं व पूर्वीचा सर्व सरंजाम वगैरे चालूं केला. यांनींहि हिंदुस्थानांत अलीबहादूर याच्या पथकाबरोबर गुलाम कादर यांजवरील लढाईत शिकस्तीनें मेहनत केली. महादाजीस औरस पुरुषसंतति नसल्यामुळें पेशव्यांच्या परवानगीनें दत्तक पुत्र घेऊन त्यांचें नांव नीलकंठराब महादेव ऊर्फ आबा पुरंदरे असें ठेविलें. व ते सन १७९१ त वारले. होळकरांची धामधूम झाली त्यावेळीं श्रीमंत बाजीराव पेशवे वसईस गेले; त्यावेळीं त्याजबरोबर हे आबा पुरंदरे गेले होते. पुढें पेशवाई गेल्यानंतर इंग्रजसरकारांनीं यांजकडे सुमारें रु. ६०००० उत्पन्नाचा सरंजाम–गांवें चालूं केली. आबा पुरंदरे हेहि निपुत्रिक म्हणून त्यांनीं दत्तक पुत्र घेण्याबद्दल इंग्रजसरकारची परवानगी घेऊन दत्तक पुत्र घेतला व त्याचें नांव माधवराव असें ठेविलें. ते सन १८२६ मध्यें वारले. माधवराव नीलकंठाचे दत्तकपुत्र नीलकंठ– त्यांचे औरसपुत्र माधवराव त्यांचे दत्तकपुत्र सदाशिवराव माधवराव ऊर्फ

आबासाहेब पुरंदरे हे आज हयात आहेत. यांस एक औरस चिरंजीव आहेत. त्यांचें नांव राघवेंद्रराव ऊर्फ बाळासाहेब. बाळासाहेबांस पुत्र ७ आहेत त्यांची नांवें-( १ ) अरविंद ( २ ) माधव ( ३ ) श्रीकृष्ण ( ४ ) नीलकंठ ( ५ ) श्रीनिवास ( ६ ) खंडेराव ( ७ ) यशवंत.

श्री. सदाशिवराव माधवराव ऊर्फ आबासाहेब पुरंदरे बरींच वर्षें दिवाणी व फौजदारी अधिकार चालवीत होते. श्री. राघवेंद्रराव ऊर्फ बाळासाहेब पुरंदरे मुंबई युनिव्हर्सिटीचे ग्रॅज्युएट असून पुणें येथें पहिला वर्ग मॅजिस्ट्रेटचे अधिकार चालवीत आहेत. सरदार व दुमालदार सभेचे अनेक वर्षें चिटणीस होते. पुणें येथील देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण शिक्षण-संस्थेचे ते आरंभापासून अध्यक्ष आहेत. इतर सार्वजनिक उपयुक्त संस्था-मध्यें अनेक नात्यानें ते कामें करीत असतात. ते फार मनमिळाऊ व निगर्वी आहेत. त्यांचें अंतःकरणहि फार उदार आहे. त्यांचें हल्लींचें ( द्वितीय ) कुटुंब बी. ए. असून फार सुशील व योग्य आहेत. त्याहि स्त्रियांसंबंधीं सार्वजनिक बाबींत मोठ्या उत्साहानें भाग घेत असतात.

पुरंदरे हे मूळचे सासवडचे कुळकर्णी व देशपांडे होते. यांचें गोत्र भारद्वाज. प्रवर तीन-आंगिरस, बार्हस्पत्य व भारद्वाज. सूत्र आश्वलायन, शाखा शाकल.

---

## पुरंदरे घराण्याचा वंशवेल

( अंबाजी त्र्यंबक यांच्या शाखेपुरता वंशवेल )



# या ग्रंथकाराचे इतर ग्रंथ



### धार्मिक

| | |
|---|---|
| १ संध्या | ऽ२ |
| २ ब्रह्मयज्ञ | ऽ२ |
| ३ वैश्वदेव | ऽ२ |
| ४ पूजा | ऽ३ |
| ५ श्राद्धप्रयोग | ऽ१० |
| ६ गणेशाथर्वशीर्ष | ऽ२ |
| ७ हरिपाठ | ऽ२ |

### संस्कार

| | |
|---|---|
| १ उपनयनसंस्कार | ऽ४ |
| २ विवाहसंस्कार | ऽ१२ |
| ३ समावर्तनसंस्कार | ऽ२ |
| ४ चौलसंस्कार | ऽ२ |
| ५ शुद्धिसंस्कार | ऽ४ |
| ६ यज्ञोपवीतसंस्कार | ऽ२ |

### तात्विक

| | |
|---|---|
| १ हिन्दुधर्मतत्वसंग्रह | ऽ२ |
| २ धर्मशिक्षण (शिल्लक नाहीं) | ऽ२ |
| ३ सर्वश्रेष्ठ हिंदुधर्म | ऽ१२ |
| ४ ऋग्वेदकालीन समाजस्थिति | |
| ५ वेद व उपवेद यांचा परिचय | ऽ४ |
| ६ प्राचीन चरित्रकोशाचीं दोन परिशिष्टें ( कालनिर्णय, भूगोल व दोन नकाशे ) | ऽ८ |

### भाषांतर

| | |
|---|---|
| १ ऋग्वेदाचें संपूर्ण मराठी भाषांतर (शिल्लक नाहीं) | रु. १२ |

### कोश

| | |
|---|---|
| १ प्राचीन चरित्रकोश | रु. १२ |
| २ मध्ययुगीन चरित्रकोश | रु. १२ |
| ३ अर्वाचीन चरित्रकोश (छापत आहे) | रु.१२ |

### पुढील ग्रंथ

१ ऋक्प्रातिशाख्यम
उवटाचार्यकृत भाष्यसहितं चित्रावशास्त्रिप्रणीतया टीकया सहितं च ।
२ ऋग्वेदाचा उपसंहार
३ संस्कृत भाषेतील शास्त्रांचा इतिहास.
४ उच्चारशास्त्र

पत्ता—**सिद्धेश्वरशास्त्री चित्राव,** ५८ शनवार, पुणें २